[illegible]स्तम् ।

[illegible]

# श्रीकृष्णजयन्तीव्रतोत्सव-भजन.

( सुंदर चित्रें, चारित्ररूप विस्तृत प्रस्तावना, प्रबंधपर्यालोचन व
व्रताचरणविधि वगैरे

[illegible]

भवौषधाच्छ्रोत्रमनोभिरामात् ।
क उत्तमश्लोकगुणानुवादात्
[illegible] विनापशुघ्नात् ॥ १ ॥




प्रकाशक,
सुब्राव गोपाळ [illegible]कर,
११८ सुलतानपेठ, बेंगळूर-सिटी.

मुद्रक
आबाजी रामचंद्र सावंत,
श्रीरामतत्व-प्रकाश छा० बेळगांव.

शके १८३५ ) किंमत १ रुपया. ( सन १९१४ इ०

ॐ नमो भगवते वासुदेवाय !

# अर्पणपत्रिका.

" मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि युक्त्वैव मात्मानं मत्परायणः ॥

भ. गी. अ. ९।३४.

| जन्म | | निधन |
|---|---|---|
| शक | | शक |
| १७४२ | | १८३४ |
| फाल्गुन | | भाद्रपद |
| शु. ३ | | व. १२ |
| मंगळ. | | सोमवा. |
| तारीख | | ता. २३ |
| ६ मार्च | | सप्टेंबर |
| १८२१ | | १९१२ |
| इ. | | इ. |



ह. भ. प. शांता नारायण उभयकर.

वयाच्या १८ व्या वर्षी श्री आपली महाराज माळा-मुद्राधिकार मिळाल्यानंतर सतत ६१ वर्षे श्रीरामवल्लभदास-सांप्रदायिक श्रीकृष्णजयन्तीव्रतोत्सव, ज्यांनीं मोठ्या प्रेमानें चालविला ते माझे परमपूज्य पितृव्य कै० ति. स्व. शान्ता नारायण उभय-कर यांच्या सेवेसी हें पुस्तक अर्पण केलें असे.

वा० ती० स्व. **शांता नारायण उभयकर** हे सरकारी नोकरींत होते. त्यांना सन ८८१ इ. त पेनशन मिळालें. तें त्यांनीं ३१ वर्षें एकसारखें घेतलें! त्यांची प्रकृति सदृढ होती. पेनशन घेण्यापूर्वींच त्यांची पत्नी, दोन मुलगे व एक मुलगी वारली. पेनशन घेतल्यापासून श्री **आवडीमठांत** गुरुपरंपरेनुसार श्रीकृष्णउपासनेंतच राहून ते शके १८३४ वामन द्वादशी रोजीं पंचत्व पावले. त्यांची निष्कलंक भोळी भक्ति पाहून सर्व लोक त्यांना देवासारखे मानीत असत. त्यांची स्मशानयात्रा गांवच्या लोकांनीं, वाजंत्री लावून भजन करीत मोठ्या समारंभानें केली. शांता नारायण यांनीं वार्धक्यास्तव आपले पुतणे म्ह. माझे प्रिय वडील बंधु **नारायण गोपाळ** यांस शके १८२७ त आपल्या आवडीमठाचा माळा–मुद्राधिकार दिला. त्या वेळेपासून तिकडील व्रतोत्सव कंकणबद्ध होत्साते हेच चालवितात. यांनीं आपल्या त्या भीष्मतुल्य पुण्यशील वृद्ध चुलत्याची परम पवित्र सेवा त्यांच्या वृद्धापकाळीं व अर्धांगवायूनें पराधीन झालेल्या समयीं, परम श्रद्धेनें केली, हें त्यांस अत्यंत श्रेयस्कर आहे.

**आवडीमठांतील माळा–मुद्राधिकारी यांची परंपरा**—(१) श्रीरमावल्लभदासांची शिष्या **आवडीबाई**; (२) **शांतय्या उभयकर**; (३) **नारायणप्पा उभयकर** (४) **शांतय्या उभयकर**; (५) **नारायणप्पा उभयकर**; (६) **शांता नारायण उभयकर**; (७) नारायण गोपाळ उभयकर (हल्लींचे माळामुद्राधिकारी.)

याप्रमाणें उपरि निर्दिष्ट माझे पूर्वज व मातापिता आणि सद्गुरु यांचें स्मरण व स्तवन करून हा अल्प अर्पणपत्रिका लेख पुरा करितों.

**पद** (राग––धनाश्री, आदिताळ.)

शेवटाची दीन विनवणी, रामा तुजला मी करितों। सर्वकाळीं मन्मनिं राहो, दिव्य रामध्यास तो ॥ १॥ आनंदु रे आजी, महानंदु रे। आनंदसागरीं बुडोनी, रामीं तन्मय झालों रे ॥ ध्रु० ॥ तनुमनधन परिग्रह सर्वही, तुझ्या पायीं अर्पियला। तुझ्या असंग साक्षीरूपीं, राहतों सदा गोपाळा ॥ २ ॥ प्रारब्धानुसार आधी, व्याधी येऊं जाऊं दे। निर्विकार असंग सच्चिदानंदीं मन राहूं दे ॥ ३ ॥ पिता **गोपाळानें** श्रवणीं, 'रामकृष्ण' बीज पेरिलें। श्रीसद्गुरुकृपेनें चित्तीं, फलद्रूप तेंचि झालें ॥ ४ ॥ अंतकाळीं **रुक्मिणि** माता, शिवस्मरणें शिवीं मीनली। **सिद्धारूढ**-दयें आईनें, निदिध्यास गति दाविली ॥ ५ ॥ धन्य माता धन्य पिता, धन्य **नारायण** भ्राता। धन्य साधु **शांता** संतां, वंदुनी मीही धन्य आतां ॥ ६ ॥ रामकृष्ण हरि वासुदेव, **कृष्णदासा** हाचि छंद। निरुपाधिक झालों मी सदा, चिंतुनि साक्षी गोविंद ॥ आनंदु रे० ॥ ७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ **यत्कृतं तु मया देव तत्सर्वं न मया कृतं। त्वया कृतं तु फलभुक् त्वमेव मधुसूधन ॥ १ ॥**

**सु. गो. उभयकर.**

---

चित्रशाळा प्रेस, पुणें.

चिंतामणिश्चिंतितमेव दत्ते । सा कामधुक्कामितमेव दोग्धि ।
कल्पद्रुमः कल्पितमेव सूते । श्रीदत्तसेवा सकलं प्रसूते ॥ १ ॥



ॐ श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः

दत्त दत्त म्हणे वाचें । काळ पाय वंदी त्याचे ॥ १ ॥ दत्तचरणीं ठेवी वृत्ती । होय वृत्तीची निवृत्ती ॥ २ ॥ दत्तरूप पाहे डोळां । वंद्य होय कळीकाळा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दत्त । हृदयीं वसे सदोदित ॥ ४ ॥

# राघवदासकृत श्रीदत्तात्रेय-स्तुति.



(ओंव्या) जयजया श्रीदत्तात्रेया । अत्रिसुता गुरुराया । तुझी माता अनसूया । मुनिवर्या तेजोराशी ॥ १ ॥ तुझें निजतेज प्रकाशे अवनीं । ..वनीं दहनीं पवनीं । सूर्य चंद्र तारा व्यापुनी । चिद्गगनीं लखलखित ॥ २ ॥ तूं अजन्मा अयोनी जन्मसी । काया माया नातळसी । छाया नाहीं तुझ्या रूपासी । विदेहत्वें वर्तसी अवधूता ॥ ३ ॥ तुझें जो करी सदा भजन । तो लाहे तुझें निज सदन । महापातकें होती दहन । केल्या स्मरण पैं तुझें ॥ ४ ॥ तुझ्या दर्शनाची जो धरी आस । तया भेटसी नाना वेषें । तुवां रमावल्लभदासास । कोल्हापुरीं प्रत्यक्ष दिधली भेटी ॥ ५ ॥ अखंड एकांतवासीं । निजबोध सांगतां लक्ष्मीसी । तेव्हां रमावल्लभदासासी । सवें बैसाविसी स्वानंदें ॥ ६ ॥ नमस्कारितां चरणासी । मस्तकीं हस्तक ठेविसी । कृपादृष्टीं न्याहाळिसी । निजसुख देसी दासांतें ॥ ७ ॥ तुझ्या निजप्रसादाकारणें । दास उभे कर जोडून । तूं देसी स्वानंदें करून । तें सुख संपूर्ण अनुपम्य ॥ ८ ॥ ज्या ज्या काळीं जें जें बोलणें । तें तें बोलिलासि अबोलपणें । देहीं वसोनि विदेही खूण । दाविली संपूर्ण स्वभक्तांसी ॥ ९ ॥ ऐसा सहवास बहुकाळ । एकान्तीं घडला सोज्ज्वळ । तो प्रगट संप्रदायमेळें । ते सुखसोहळे काय वानूं ॥ १० ॥ तैसेंचि कृष्णाजी गोसावी यास । दर्शन दिधलें सावकाश । तुवां नाम ठेविलें भगवद्गीतेस । 'चमत्कारी' टीका म्हणोनी ॥ ११ ॥ पुस्तक आपुले हातींचें । तुवां दिधलें जी साचें । पूजन करावें याचें । म्हणोनि वाचें बोलिलासि ॥ १२ ॥ कोणे एक दिवशीं । तैल न मिळे कृष्णाजी गोसावी यासी । तुवां होऊनि संन्यासी । न कळतां त्यासी दिधलें घरीं ॥ १३ ॥ तुवां दर्शन दिधलें दासोपंतासी । आणि दत्ताबा नाइकासी । जनार्दनपंत एकोपंतासी । अनेक भक्तांसी युगानुयुगीं ॥ १४ ॥ हें एकेक महिमान सांगूं किती । तूं पूर्ण कृपा करिसी ज्याप्रती । त्यांच्या अष्ट महासिद्धी दासी होती । पायां लागती चारी मोक्ष ॥ १५ ॥ तुझें निजरूप सबराभरित । गुरुकृपें झालें जी प्राप्त । आतां तुझा अवतारदर्शनाचा हेत । आहे बहुत दास राघवा ॥ १६ ॥ इति श्रीराघवगोसावीकृत श्री दत्तात्रेयस्तुतिः संपूर्णा ॥ ६ ॥



नंदनंदन मुरलीवाला । याच्या मुरलीचा वेध लागला ॥
प्रपंच धंदा नाठवे कांहीं । मुरलीचा नाद भरला हृदयीं ॥



समाधि उन्मनी तुच्छ वाटती । मुरलीनाद ऐकतां मना विश्रांति ॥
एकाजनार्दनीं मुरलीचा नाद । ऐकतां होती त्या सद्गद ॥

' आणितांचि कंसें मारावया नेली । अंतराळीं ठेली ' कृष्णमाया ' ॥
कृष्णमाया म्हणे अरे कंसासुरा । तुझा वैरी खरा अन्य स्थळीं ॥ '



वसुदेवानें श्रीकृष्णास नंदाच्या घरा ठेवून तेथें जन्मलेल्या महामायेस मथुरेंत आणिलें. इत मुलांप्रमाणें तिलाही आपटून मारावें म्हणून कंसानें उचलली, तों ती निसटून विद्युल्लतेप्रमाणें आका शांत चमकून ' तुझा वैरी गोकुळांत नांदत आहे ' असें म्हणाली व गुप्त झाली.

# कृष्ण-रक्षा ( दृष्ट ).

' सर्वां रक्षी हा श्रीपति । त्यासी रक्षा गोपी करिती ॥ '



श्रीकृष्णानें पूतनेचें प्राणहरण केल्यानंतर पूतनेचें अक्राळविक्राळ स्वरूप पाहून कृष्ण भ्याला असेल अशी शंका यशोदेस आली, तेव्हां इतर गौळणींनी त्याची विधिपुरःसर दृष्ट काढली. हें या चित्रांत दाखविलें आहे.

लक्ष्याचें जें लक्ष्य तो दिसे अलक्ष्य । तो असे प्रत्यक्ष नंदाघरीं ॥
बाळरूप गोजिरें वाळे वांकी साजिरे । पाहतां दृष्टीचें पुरे कोड सर्व ॥



यशोदा, कृष्ण व राधा.

राधेसी म्हणत यशोदा सुंदरी । यासी क्षणभरी नेईं आतां ॥
आपुले मंदिरा 'घेऊन' जाय यासी । ऐकूनि मानसीं संतोषली ॥

शेषादिक श्रमले न कळे ज्याचा पार । वेदांसि निर्धार न कळेचि ॥
तें हें बाळरूप यशोदे वोसंगा । पाहतां दोष भंगा जाती त्या ॥ ६ ॥



यशोदा गो-दोहन.

योगमुद्रा साधन योगी साधिताति । त्यांसी नोहे प्राप्ति हेंचि रूप ॥
जयाचेनि होय तृप्ति पैं सर्वांसी । तो मागे यशोदेसी धेनुदुग्ध ॥
एका जनार्दनीं न कळे वैभव । दावीतसे भाव भोळ्या जनां ॥

'अक्षर अविनाश माया विरे ज्यांत । तें रूप साक्षात गोपाळाचें ॥
विश्वमुखें भोक्ता पाहतां सिद्धान्त । तें रूप साक्षात गोपाळाचें ॥'



श्रीकृष्ण मृत्तिका-भक्षण.

'मृत्तिका भक्षिताहे, यशोदा मुख पाहे । विश्वरूप दाविताहे, तो हा कृष्ण
आपुल्या अंगीं कैसा, दावीविश्वाभास । रमावल्लभदास तो हा कृष्ण ॥'

'नंदाच्या नंदना, मनाच्या मोहना। तुजवांचुनी ताप जाईना।
तूं ये रे कान्हा। भेट देई रे मधुसूदना ॥ तूं० ॥'



राधा-माधव.

'संसारयातना, आतां मी सोसेना। शोक अनेक दुःखमोचना ॥ तूं० ॥
जीवाच्या जीवना, सुखाच्या निधाना। श्रीरामवल्लभीं दास मायेना ॥
तूं ये रे कान्हा। भेट देई रे मधुसूदना ॥ ६ ॥' —(पृष्ठ. ६१)

# वसुदेवदेवकीबंधमोचन.

राज्यीं स्थापियेला उग्रसेन तेव्हां । देवकी वसुदेवा सोडविलें ॥



श्रीकृष्णानें मुष्टिक-चाणूरादि दुष्टांचा नाश करून दुरात्म्या कंसमामासही ठार मारिलें. नंतर बंदीशाळेंत जाऊन आपल्या मातापित्यांच्या पायांतील बेड्या तोडविल्या. त्या वेळीं आनंदानें गहिंवरून जाऊन देवकीनें कृष्णाला आलिंगून त्याचें चुंबन घेतलें व वसुदेवानें बळिरामास प्रेमानें पोटाशीं धरिलें, असें या चित्रांत दर्शविलें आहे.

ॐ तत्सत् ।

श्रीसद्गुरु प्रसन्न.

# श्रीरमावल्लभदासचरित्र.

" मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।
यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥१॥ " ( भ. गी. अ. ७।३)—

हजारों-लाखों मनुष्यांमध्यें एखादाच ज्ञानासिद्धीकरितां प्रयत्न करितो; व अशा प्रयत्न करणाऱ्या हजारों-लाखों आत्मज्ञानसिद्ध पुरुषांमध्येंही एकादाच मला ' यथार्थत्वानें ' जाणतो, असें भगवान् गीतेंत सांगतात. " **आस्थेच्या महापुरीं । रिगताति कोडियरी । परी प्राप्तीच्या पैलतीरीं । विपाइला निगे ॥** " असें श्रीज्ञानेश्वरमहाराज वरील श्लोकाच्या टीकेंत ह्मणतात. अशा अत्यंत विरळा पुरुषांपैकींच **श्रीरमावल्लभदास** हे एक होत.

वैराग्य हें परम भाग्य आहे. तें भगवंताच्या षड्गुणैश्वर्यांपैकीं प्रथम ऐश्वर्य आहे. भगवंत ज्याचेवर प्रसन्न होतो, त्यालाच हें त्याजकडून मिळतें. ह्या ऐश्वर्यानें प्रथम त्याचें हृदयमंदिर शोभायमान करून मग ही त्रिभुवनपतीची स्वारी आपल्या समग्र ऐश्वर्यासहित त्या मंदिरांत वास करणेस येते; एऱ्हवीं नाहीं.

इतर ( नाशवंत ) ऐश्वर्यें देण्याला त्या कमलावराला अनंत हस्त आहेत, त्याप्रमाणें वरील ऐश्वर्य भक्ताला अर्पण करण्यास त्याला अनंत मार्ग आहेत. कोणत्या मार्गानें, कोणा भक्ताला, कसें व केव्हां हें ऐश्वर्य तो देईल, याची कल्पना कोणालाही करवणार नाहीं. त्याची लीला अगम्य आहे. संतांचीं चरित्रें पाहिलीं असतां याची सत्यता दिसून येते.

हें भगवदैश्वर्य भोगणारीं नररत्नें ज्या देशांत जन्मास आलीं, तो देश धन्य होय. ज्या कुळांत जन्मास आलीं, तें कूळ धन्य होय व ज्या मायबापांच्या उदरीं तीं जन्मलीं, ते मायबापही धन्य होत. **अंबाजीपंत** ( ऊर्फ यमाजीपंत ) **राळेरासकर** हे अशा धन्य पुरुषांपैकींच एक होत. औरंगाबादेपलीकडे देवगिरी ( दौलताबाद ) नामक इतिहासप्रसिद्ध किल्ला आहे. तेथें शालिवाहन शकाच्या १६ व्या शतकांत एका म्लेंच्छ राजाची राजधानी होती. त्या राजाचा अंबरखान नांवाचा प्रधान असून अंबाजीपंत ह्मणजे आमच्या चरित्रनायकाचे वडील, हे त्याचे कारभारी होते. ह्यांना पोटीं पुत्रसंतान नव्हतें, त्यासाठीं ह्यांनीं कुळदेवतेची एकनिष्टपणें आराधना केली. कुल-

देवतेनें प्रसन्न होऊन यांना स्वप्नांत दृष्टांत दिला; त्याप्रमाणें जगदंबेच्या कृपेनें अंबाजीपंताची साध्वी स्त्री हें जगदुद्धारक पुत्ररत्न प्रसवली. दीर्घ तपाचें अमृतमय फळ प्राप्त झाल्यामुळें अंबाजीपंतांना अत्यंत आनंद होऊन त्यांनीं हत्तीवरून साखर वांटली. मुलाचें नांव **तुकोपंत** असें ठेविलें. मुलाचें तेजःपुंज रूप व चपलता पाहून सर्वांस मोठें कौतुक झालें. सातवे वर्षीं व्रतबंध होऊन बारावे वर्षीं लग्नसमारंभ झाला. कन्या सुंदर व श्रीमंताच्या घरची मिळाली. हत्तीवरून वरात निघाली. याप्रमाणें सर्वत्र आनंदीआनंद झाला.

वयाच्या १८ व्या वर्षीं तुकोजीपंतांला वडिलांचा कारभार मिळाला. तो त्यांनीं अंगच्या हुशारीनें उत्तम रीतीनें चालविला; पण इतक्यांत तुकोजीपंताचे संसारदोषजनक मलीन कर्म मागें पडलें व भगवत्प्रसादप्रापक शुद्ध कर्म फलोन्मुख झालें आणि 'त्यामुळेंच' असें ह्मणण्यास हरकत नाहीं, तिकडील राजावर परचक्र आलें.

किल्ल्यास शत्रूनें वेढा दिला. त्यांचें सैन्य बारा हजार घोडेस्वार व तेरा हजार पायदळ मिळून एकंदर २५ हजार होतें. राजा तें पाहून अगदीं घाबरून गेला. त्यानें अंबरखान प्रधानास बोलावून आणून मसलत चालविली. अंबरखान हा शूर व चतूर होता. मरावें किंवा मारावें यांशिवाय तिसरा उपाय त्यास सुचेना. परसैन्याशीं टक्कर देण्यास राजाचें सैन्य ७०० घोडेस्वार व १५०० पायदळ मिळून अवघें बावीसशें होतें. वेदान्ताच्या व युद्धाच्या गोष्टी बोलणें सोपें असतें, पण प्रसंगास टिकणारे विरळा सांपडतात. अंबरखान प्रधानानें राजाचा निरोप घेऊन आपल्या सैन्यास बोलावलें व ज्या वेळीं सैन्य येऊन उभें राहिलें, त्या वेळीं प्रधानानें निष्ठुरपणें व निर्वाणीच्या शब्दानें सांगितलें, कीं:—

"ज्यांसि संसाराचि आशा असे। तेणें परतावें गृहास ॥ स्वामीकार्यालागून।
जया असेल जीव अर्पण ॥ संसारममता सांडोन। यावें तेणें युद्धासी ॥ इ०"

हें ऐकतांच ३०० घोडेस्वार व ५०० पायदळ मागें परतलें; व स्वामीकार्याकरितां जिवावर उदार झालेले चारशें घोडेस्वार व एक हजार पायदळ मारूं किंवा मरूं या निर्धारानें शत्रुसैन्यावर तुटून पडलें. त्यांत आमचे चरित्रनायक तुकोपंतही होते. जिवावर उदार झालेला एक शूर शिपाई हा भाडोत्री शंभर शिपायांपेक्षांही अधिक असतो. अशा त्या चारशें घोडेस्वारांनीं शत्रूच्या बारा हजार घोडेस्वारांची फळी फोडून त्यांची दाणादाण करून सोडली. त्याचप्रमाणें एक हजार पायदळानें लहानमोठ्या टोळ्या करून शत्रूच्या १३ हजार पायदळावर अशा युक्तीनें व निकरानें हल्ला चढविला कीं, त्यांना दे माय धरणी ठाय होऊन गेलें.

"धीर ते वीरमोक्ष पावती। अधीर दांतीं तृण धरिती। कोणी अश्व
सांडूनि पळती। कोणी मागती जीवदान ॥ कोणी शस्त्रास्त्र त्यजिती।
दीनत्वें पायां लागती। कोणी घायाळ कुंथिती। प्राण सोडिती भयें

कोणी ॥ देखतां शस्त्रांचा लखलखाट । आणि अस्त्रांचा सणसणाट । यंत्रांचा घडघडाट । भयें पोटें फुगलीं कोणा ॥ ”

याप्रमाणें शत्रुसैन्याचा पराभव झाल्यावर, अंबरखानाचें पूर्वीचें परतून शेंदाड शिपाई, जे दुरून लपून लढाई पहात होते, तेही धांवत आले.

“ तंव मागील तीन शत स्वार । पंचशत पायनर । तेहीं येऊनि सत्वर । बुणगबाजार नागविला ॥ ”

ह्या लुटींत शत्रूचें हत्ती घोडे व पुष्कळ चांगलीं चांगलीं हत्यारें त्याना मिळालीं. कित्येकांस हिरे माणिक मोत्याचे व सोन्याचांदीचे दागिने सांपडले. पण काय चमत्कार कोण जाणे, आमच्या तुकोपंतासः—

“ एकादशस्कंध एकतीस अध्याय । एका जनार्दनीं टीका अन्वयें । जें मुमुक्षूंचें मोक्षधन स्वयें । सांपडलें पाहे भागवत ॥ ”

हें पाहून तुकोपंतास फारच विस्मय वाटला. त्यांनीं त्यास शिरसा वंदन करून घोड्याच्या पाठीवर बांधिलें व प्रधानाबरोबर ते गांवांत यावयास निघाले. ह्या विजयी सैन्याचा राजानें व नागरिकांनीं मोठा सन्मान केला. वाजत गाजत गांवांत साखर वांटली, गोरगरिबांस खैरात केली व राजानें सैनिकांस योग्य बक्षिसें देऊन घरीं जाण्यास परवानगी दिली. विजयश्रीनें शोभणारे आमचे तुकोपंतही आपल्या घरीं आले. त्यांचें अंतःकरण भगवत्प्रसादानें अथवा प्रसादाच्या उत्कट वासनेनें भरून गेल्यामुळें त्यांच्या मुखावर अवर्णनीय सात्विक तेज झळकूं लागलें. घरीं आल्याबरोबर त्यांनीं मातापित्यांस प्रथम वंदन केलें; व घोडयावरील एकनाथी भागवताची पोथी सोडून देवगृहांत देवासमोर ठेवून सद्गदित मनानें साष्टांग नमस्कार घातला व ते बाहेर आले. त्यांना पाहून घरच्या माणसांस व आप्तइष्टांस अतिशय आनंद झाला. लढाईच्या वेषांत असलेले शिपाई घरीं जात असतां अमक्यास अमूक मिळालें, तमक्यास तमूक मिळालें, हाच गांवांत जिकडे तिकडे पुकारा चालला होता. त्यास अनुसरून अंबाजीपंतांनींहि आपल्या पुत्रारायास तुला काय सांपडलें, असा मोठ्या उत्सुकतेनें प्रश्न केला.

“ तंव दास ह्मणती श्रीभागवत । आह्मां सांपडलें जी निश्चित । भाग्य आमुचें परमाद्भुत । श्रीभगवंतें कृपा केली ॥ ”

असें सांगून तें भागवत पुस्तक सोडून पित्यासमोर ठेविलें. परंतु त्यानें पित्यास संतोष वाटला नाहीं, त्याचा उत्साहभंग व निराशा झाली. त्या वेळीं तेथें जमलेले इतर प्रापंचिक लोकही तुकोपंताची थट्टा करूं लागले ‘ कोणास हत्ती, घोडे, सोनें, रुपें व रत्नेंही मिळालीं; आणि यांना नुसती एक पोथी सांपडली. हें एक यांचें नशीबच, ’ असें ते लोक ह्मणूं लागले. पण कांहीं सज्जन होते; ते उघडपणें ह्मणाले:—

"...प्राप्त झाल्या निजमोक्षधन । जो न मानी सुखसमाधान । तो भाग्यहीन जाणावा ॥ अनायासें परीस सांपडला । तो पाषाण म्हणोनि झुगारिला । तैशी दशा यमाजीपंताला । नाहीं जिव्हाळा परमार्थी ॥ अथवा कामधेनु प्राप्त झाली । ते पशू म्हणोनि दुरी मोकली । आदरें सेवी विषयवल्ली । तो भवजळीं बुडाला ॥ जया नावडे श्रीभागवत । तोचि जाणावा अभक्त । जया आवडे श्रीभागवत । तो परमभक्त श्रीहरीचा ॥ जया देशीं वसे भागवत । धन्य धन्य तो देश परम मुक्त । हें व्यासो-नारायणोक्त । श्रीशुक सांगत परीक्षितीसी ॥ परीक्षितीनें भागवतश्रवण । सप्तदिन करितां जाण । तात्काळ हरिलें जन्ममरण । मोक्षनिधान पावला ॥ युगानुयुगीं अनंत भक्त । श्रवण करितां भागवत । लाधले गुरुभजन-पंथ । जीवन्मुक्त पैं झाले ॥ आतां पुढें जे जे श्रवण करिती । ते ते जीवन्मुक्त होती । येथ संशय नाहीं निश्चितीं । महिमा त्रिजगतीं अनिवार ॥ भागवत असे जया मंदिरीं । तेथें भगवंत वस्ती करी । निजभक्ताचा सहाकारी । विघ्नें निवारी अति दुर्घट ॥ जरी न घडे श्रवण पठण । तरी भावें कीजे पूजन । कृपा करील नारायण । ऐसें सज्जन वदती पैं ॥ "

याप्रमाणें भागवताचें माहात्म्य सज्जन मुखांतून श्रवण करून तुकोपंतानें त्या ग्रंथाचें नित्यपठण मोठ्या श्रद्धेनें चालविलें. तुकोपंताबरोबर त्याचा बाळमित्र कृष्णाजी-पंत त्यासही त्या प्रासादिक ग्रंथाचें श्रवण घडलें. असा क्रम चालला असतां तुकोपंताचें लक्ष्य प्रपंचांतून हळूहळू कमी होऊं लागलें. भागवत वाचण्यास बसलें कीं, प्रहर दोन प्रहर एकसारखें वाचतच बसावयाचें. " **ऐकें तें आपण अंगें होय** । " या एक-नाथांच्या वचनाप्रमाणें ते तद्रूप व्हावयाचे, त्यांना जेवणाखाण्याचें देखील भान रहा-वयाचें नाहीं, असें होऊं लागलें. अशा स्थितींत नोकरीवर जाणें व तिकडील सरकारी काम करणें याचें स्मरण कोठून असणार ? ही स्थिति अर्थात् घरच्या माणसांस आव-डली नाहीं. आईबाप व इतर सुहृज्जन, त्यांना असें करूं नये, तसें करूं नये, प्रपंच साधून परमार्थ करावा, नोकरीचाकरीवर जात येत असावें व रिकाम्या वेळीं देवाचें नांव घ्यावें, किंवा ' कामांत कामा भज रामनामा ' असें करावें, यांतच जन्माचें सार्थक आहे, वगैरे वगैरे उपदेश करूं लागले. पण भगवंतानें ज्याला आपलें पहिलें ऐश्वर्य ( वैराग्य भाग्य ) दिलें, त्याला हा उपदेश कसा रुचणार ? दीपकलिका लहान असते ती वाऱ्याच्या झुळूकीनें विझून जाते, परंतु पेटलेलें कोलीत असतें, त्यास वारा लागावा तितकें तें अधिकच पेट घेतें, त्याप्रमाणें तुकोपंताचा वैराग्याग्नि घरच्याच्या प्रतिरोधानें रुद्ध न होतां अधिकच धडाडला.

" प्रऱ्हादनें पिता त्यजे, भरतनें अपनी माय । बिभीषणनें भाई त्यजे, श्रीरामके कार्य ॥ " अथवा " भगवंतीं जेणें घडे अंतराय । हो कां बापमाय त्यजावे ते ॥ "

ह्या संतवचनांप्रमाणें तुकोपंतांस अंतरांतील गोडीची झुळुक लागून [illegible] लागल्यामुळें ते संसारांत दिवसेंदिवस विशेष उदासीन होत चालले [illegible] दिवशीं सद्गुरुशोधास्तव घराबाहेर पडले. तीर्थयात्रा करीत करीत संतांचे पंढरपूर तेथें येऊन त्यांनीं संतपदरजांत लोळण घेतली. व संतमुखानें भगवत्कथा [illegible] झाल्यामुळें भगवत्प्रेमा उत्कट वाढला, व साक्षात्कारासाठीं सद्गुरु-दर्शनाची विशेष उत्पन्न झाली. हरिप्रसादानें संतसंगाची आवड, संतकृपेनें गुरुपदाची जाड व गुरुकृपेनें हरिपदाची ( आत्मस्वरूपाची ) प्राप्ति व त्यानंतर हरीची—परमात्म्याची **परमा भक्ति,** अशी ही परंपरा आहे. **तुकोपंतांला** हा लाभ क्रमशः झाला.

'कन्येपूर्वीं तिच्या पतीतें' ब्रह्मदेव निर्माण करीत असतो, असें ह्मणतात, त्याप्रमाणें शिष्यापूर्वीं गुरूचीं योजना परमेश्वरानें करून ठेवलेली असते. **नियत गुरु** व **अनियत गुरु** असे दोन प्रकारचे गुरु असतात. अनियत गुरु पुष्कळ होतात; त्यांपासून मुमुक्षूंची दैवी संपत्ति पक्वदशेला येण्यास मदत होते. नियत गुरूपासून 'तत्त्वमसि' वाक्याचा उपदेश होऊन पूर्णत्व येतें. आमच्या तुकोपंतांची भूमिका संतसमागमानें अगदीं तयार झालेली होती. त्यांना **गो**दातटाकावर परम वैराग्यशील **लक्ष्मीधरदास** नांवाचे ( पूर्वीचें नांव **अमरनाथ** ) गुरु भेटले व त्यांनीं **तुकोपंतांचा** अधिकार पाहून त्यांजवर अनुग्रह केला. त्यानंतर **तुकोपंत** हे **श्रीरमावल्लभदास** या नांवानें प्रसिद्धीस आले. त्यांनीं आपल्या नांवाच्या अर्थासंबंधानें एका पदांत असें ह्मटलें आहे:—

'श्री' नामें शोभा येत । 'रमा' नामें भुक्ति देत । 'वल्लभ' नामें मुक्ति घेत ।
'दास' नामें प्रेम लेत ॥५॥ 'श्रीरमावल्लभदास' ध्या ध्या या नामें अर्थास॥ध्रु०॥

श्रीरमावल्लभदासांनीं **श्रीशंकराचार्यकृत बृहद्वाक्यवृत्ति** नांवाच्या लहानशा ग्रंथावर विस्तृत टीका केली आहे. त्यांत त्यांनीं आपली गुरुपरंपरा खालीं लिहिल्याप्रमाणें दिली आहे.

"प्रगट पैं गुरुपरंपरा । कळल्यावीण साच नरा । मुक्ति नाहीं भ्रमाच्या घरा । जाणें होय साचार ॥२१॥ साचार गुरु नारायण । श्रीभगवान हें नामउच्चारण । सर्वज्ञ करिती आपण । स्वयें भगवान होउनी ॥ २२ ॥ होऊनी श्रीभगवान । गुणीं गुण निरसुन । प्रथम ब्रह्मा समाधान । पावोनि श्रीनारदा सांगे ॥२३॥ सांगे श्रीनारद व्यासासी । व्यास सांगे श्रीशुकासी श्रीशुक सांगे परीक्षितिरायासी । तेथूनि संन्यासपद्धति ॥२४॥ पद्धती संन्यासाची बरी । श्रीगौडपादाचार्य करी । तो संपूर्ण आत्मज्ञान धरी । श्रीगोविंदपादाचार्य ॥ २५ ॥ श्रीगोविंदपादाचार्यापासून । श्रीविवरणाचार्य होऊन । तेणें विवरण पूर्ण

घेऊन । श्रीशंकराचार्य समवेत ॥२६॥ समवेत षडाचार्य । श्रीशंकरबोधें उदार्य । वादीं जिंकोनी भट्टाचार्य । दिग्विजय पैं केला ॥ २७ ॥ केला चहू आचार्यां सहवास । चहूं दिशीं सावकाश । तथूनि संन्यासी दशनामास । पावते साच पैं जहाले ॥ २८ ॥ जहाले दोघे परम उदास । आचार्य जगीं सावकाश । हस्तामलक श्रीधर वास । सर्वत्र त्यांचा पैं असे ॥ २९ ॥ असे श्रीमद्भागवत । श्रीधरमुखें विस्तारित । टीका भावार्थदीपिका मत । वेदान्तशास्त्र धरोनि ॥ ३० ॥ धरोनि अभेद हरिगुरु–भजन । बहुत संत झाले ज्ञानघन । माजीं विज्ञानाश्रम पावन । तच्छिष्य आनंदाश्रम बोलिजे ॥३१॥ बोलिजे त्यावरी श्रीलक्ष्मीधर । तो अस्मादिकासि गुरुवर । भिक्षुकवृत्ती परी मनोहर । 'नैराश्यलक्ष्मी' साच 'धरी' ॥ ३२ ॥ धरी नैराश्यलक्ष्मी बरी । जे लक्ष्मीवल्लभ श्रीनारायण हरी । ह्मणोनि रमावल्लभ सबराभरी । मग दासपणें तोचि दिसे ॥ ३३ ॥"

यानंतर अनुग्रहाचें ठिकाण, काळ व उपासनेचें नांव त्यांनीं पुढें लिहिल्याप्रमाणें सांगितलें आहे:—

"जोडला गुरु तोचि जाण । श्रीलक्ष्मीधर नाम सुजाण । तो अवतरला निगमराणा । आपणांस आपण अनुग्रहा ॥ ४० ॥ अनुग्रहास गौतमीतट । दुसरी प्रवरा नदी चोखट । दोहीं संगमीं प्रगट । सिद्धेश्वर महादेव ॥ ४१ ॥ महादेव गुप्त तो प्रकटला । गुरुदेवाजीस भेटला । मग उपदेश करावा वाटला । अर्धोदयीं पर्वकाळीं ॥ ४२ ॥ पर्वकाळीं श्रीगोपाळविद्या । उपासना देतांच सुविद्या । प्रगटली, गेली अविद्या । स्फूर्ति होऊं लागली ॥ ४३ ॥" ——(वा. वृ. टी. वि. ११)

याप्रमाणें सद्गुरूकडून श्रीगोपाळमहाविद्येची प्राप्ति होऊन ब्रह्मसाक्षात्कार घडला व साडेतीन हात देह तो मी, हा आकुंचित भाव नष्ट होऊन अनंत कोटि ब्रह्मांडाला व्यापून असणारें जें ब्रह्म तें मी, हा भाव तेथें दृढ स्थापित झाला.

"आपण सर्व जाहला । श्रीगुरुपदा शरण आला । श्रीगोपाळ-उपासनें
रिघाला । जें महावाक्याचें जिव्हार ॥" (वा. वृ. टि. वी. १०।१४२)

धन्य होत ते पुरुष, कीं, ज्यांनीं नरजन्माचें सार्थक अशा रीतीनें करून घेतलें. असो.

याप्रमाणें सद्गुरुप्रसादप्राप्तीनें कृतार्थ झाल्यानंतर ते पुन: तीर्थयात्रेस निघाले. प्रथम त्र्यंबकक्षेत्रीं जाऊन तिकडून नासिकपंचवटीस आले. तेथें त्यांना गोपाळ गोसावी भेटले. ते मोठे अधिकारी पुरुष होते. त्यांनीं रमावल्लभदासांस सांगितलें:—

" .. ब्रह्म होऊनि ब्रह्मपदें गावीं । श्रीकृष्ण अवतारांचीं ॥ ४५ ॥ - अवतारांचीं अवतारपणें । चरित्रें गावीं विश्वतारणें । विश्वरूपें आपणासि देखणें । आपुलें कल्पित चराचर ॥ ४६ ॥ चराचर सहजाचि उद्धरे । जें आपणा आपण अनुसरें । ऐसें श्रीगोपाळ गोसावी बरे । समाधानी भेटले ॥ ४७ ॥ "
—( वा. वृ. वि. ११ )

गोपाळ गोसावी व रमावल्लभदास यांचें समानशीलत्वामुळें अत्यंत प्रेम जुळलें व पुढें पुष्कळ वर्षेपर्यंत त्यांनीं एकमेकांस सोडलें नाहीं. याप्रमाणें 'लागली संतसंगाची चट । ब्रह्मनिरोपण आवडे चोखट ।' असें झाल्यानंतर त्यांनीं आपला आयुःक्रम अशाच रीतीनें घालविण्याचा निश्चय केला व '**म्लेंच्छसेवा टाकून देऊन निःस्पृह हरिभक्त होऊन**' ते गोदातीरींच राहिले. तिकडे त्यांचा बाळमित्र कृष्णाजीपंत येऊन त्यांना भेटला, व दोघांनीं तेथें सटीक भागवत दशम व एकादश स्कंधांचें वाचन केलें. त्या वेळीं '**वाचितां दोघांचें दोनीपण । जाऊनि वाढला बोधसण**' याप्रमाणें दोघांचें देहभान जाऊन ते हरिरंगीं पूर्ण रंगून गेले. ही दशमस्कंधावरील प्राकृत टीका बहिरंभट यांची असून एकादशावरील टीका एकनाथमहाराजांची होती, असें रमावल्लभदासांनीं आपल्या 'दशकनिर्धार' नामक लहानशा ग्रंथांत सांगितलें आहे. हे दोन्ही ग्रंथ वाचून झालेल्या आपल्या स्थितीचें वर्णन त्यांनीं त्याच ग्रंथांत असें केलें आहे:—

" ... अर्थांतरें मी झालों तुष्ट । सद्भाव अष्ट दाटले ॥ ७८ ॥ स्वेद रोमांच उभे राहिले । अर्धोन्मीलित नेत्र प्रवाहिले । बाष्पें स्फुंदनें वाचें मोहिलें । आणि लाहिलें कंपातें ॥ ७९ ॥ कंपित देहगात्रें विकळें । मूर्च्छा आली मज मी न कळे । तेव्हां प्रज्ञा दिधली अकळें । चिन्हें सकळें तो जाणे ॥ ८० ॥ " इ.

त्यानंतर कांहीं दिवसांनीं रमावल्लभदासांस शोधीत शोधीत 'बापूशिष्य एकसरें । पूर्ण भक्त भेटों आला. ॥' त्याला यांच्या संगतींत भगवत्साक्षात्कार घडून तो कृतार्थ झाला.

वरील कृष्णगोसावी गोदातीराहून दक्षिणेकडे फिरत फिरत विराट देशांत ( वांईक्षेत्रास ) आला. तेथें कांहीं दिवस राहून तो कोंकणांत हरिहरेश्वराचें दर्शन घेऊन दालभ्यपुरीं आला. तेथें त्यानें पुष्कळ लोकांस श्रीकृष्णभक्तीला लाविलें. रमावल्लभदासांच्या कृष्णभक्तिपर कवितांनीं त्या लोकांना वेडच लागून गेलें व ते त्यांच्या दर्शनाविषयीं अत्यंत उत्कंठित झाले. त्या लोकांच्या आग्रहावरून रमावल्लभदासांना तिकडे घेऊन जाण्याकरितां कृष्णगोसावी हा घाट चढून देशांत वांईक्षेत्रीं आला. तेथें रमावल्लभदासही फिरत फिरत सहजगतीनें आले व त्या दोघांची तेथें

भेट होऊन परस्परांस आनंद झाला. त्या ठिकाणीं आणखीही कांहीं सद्भक्त रमावल्लभदासांना भेटले. त्यांपैकीं नृसिंह आप्पाजी, गोविंद वांकडा, मल्हारी, राघवदास व उमावल्लभदास यांचीं नांवें, त्यांनीं वाक्यवृत्तिग्रंथांत शेवटीं किंचित आत्मचरित्र लिहिलें आहे, त्यांत आणिलीं आहेत. ( राघवदासाची विशेष माहिती पुढें दिली आहे. )

वरील संतांपैकीं उमावल्लभदास हे पूर्ण शिवभक्त होते. शंकराच्या नांवाशिवाय दुसऱ्याचें नांव ते घेत नसत व शंकराच्या मूर्तीशिवाय दुसऱ्या मूर्तीला पहात किंवा नमस्कार करीत नसत. ' नामघोषें जग तरे । हें निरोपण ज्याचेनि पसरे । तो उमावल्लभदास त्वरें । शिव शिव ह्मणतां शिवरूप ' असे उद्गार रमावल्लभदासांनीं त्यांचेविषयीं वाक्यवृत्तिग्रंथांत काढले आहेत. उमावल्लभदास हे जसे कट्टे शिवोपासक होते, तसेच रमावल्लभदास हे कट्टे कृष्णभक्त होते. ते कोणत्याही प्रतिमेला ' **जय गोपाळ** ' असें ह्मणून वंदन करीत असत. आपल्या उपास्य दैवताला सर्व चराचरीं पहाणें हें उपासनेचें अंतिम लक्षण अथवा ध्येय होय. रमावल्लभदासांनीं उमावल्लभदासाच्या देवालयांत ते पूजा करीत असतां सर्व संत मंडळीसह येऊन ' जय गोपाळ ' असें ह्मणून नमस्कार केला. त्या वेळीं असा चमत्कार झाला कीं, तेथें शंकराच्या ऐवजीं श्रीकृष्णाची शंख-चक्र-गदा-पद्मधारी चतुर्भुज सुंदर मूर्ति दिसूं लागली. हें पाहून सर्व संतमंडळीस व उमावल्लभदासांसही परमाश्चर्य वाटलें. त्यांच्या अंतःकरणांत दिव्यज्ञानाचा प्रकाश पडला व त्यांनीं उठून सन्निध उभे असलेल्या वैष्णववीरांस ह्म. रमावल्लभदासांना साष्टांग नमस्कार घातला.

" * * जय गोपाळ ह्मणतां पाहे । जाहला स्वयें लाघवी हरि ॥ ६४ ॥
तो मी मी तो हरि । मी तूं नाहीं याउपरी ॥ "—( वा-वृ-वि-११ )

याच प्रसंगाचे उद्गार त्यांनीं त्या वेळच्या शंकराच्या आरतींत गोंविले आहेत. ते असेः—

" हृदयमंदिरीं पूर्ण कृष्ण भरला । दुसरा वर्णावया ठावचि नुरला ॥
तथापि संतआज्ञा वानूं शिवाला । चिंतन करितां स्वयें कृष्णचि तो झाला
॥ १ ॥ जयदेव जयदेव जय जाश्वनीळा । अर्धांगीं पार्वती शोभे वेल्हाळा ।
मस्तकीं गंगा अतिपुण्यशीळा । ब्रह्मादिक वरदा हरहर दयाळा ॥ ध्रु० ॥
* * * * उमाशंकर ऐसिया आरति गातां । पूर्ण ध्याना मूर्ति आली
तत्त्वतां । **सर्वांचि कृष्ण तो** परतोनि पाहतां । रमावल्लभदासां विस्मयो चित्ता "

हा अद्भुत चमत्कार घडल्यानंतर रमावल्लभदासांची कीर्ति देशभर पसरली व त्यांना पुष्कळ सद्भक्त लोक भेटण्यास येऊं लागले. कृष्ण गोसावी हा तर त्यांना कोंकणांत दाल्भ्यपुरास घेऊन जाण्याकरितां येऊन बसलाच होता हें वर सांगितलें आहे. त्याप्रमाणें त्याची इच्छा पूर्ण करण्याकरितां ते त्याजबरोबर कोंकणांत निघून गेले.

त्यांना पाहून तिकडील लोकांना हा आपला भाग्यसूर्यच उगवून आला, असें वाटूं लागलें. कृष्णभक्तिपर कवितांनीं व भजनकीर्तनानें पुष्कळ जडमूढ व नास्तिक लोकही भगवद्भक्तीला लागले. कांहीं उच्च अधिकारी भक्तांसाठीं आचार्यकृत बृहद्वाक्यवृत्ति नामक ग्रंथावर प्राकृत टीका करून निरूपण करण्याचा क्रम श्रीक्षेत्र वांई येथें सुरू केला होता. तो पुढें तसाच चालून सदरहू टीका कोंकणांत दाल्भ्यपुरांत संपूर्ण झाल्याबद्दल त्यांनीं टीकेंत लिहिलें आहे.

"निजभक्त सुखाकारणें । श्रीशंकराचार्यें बोलणें । ते वाक्यवृत्तीची टीका करणें । जाहलें प्रेरणें गुरूचें ॥१२४॥ गुरूचें वचन करावें । महावाक्यरहस्य प्रगटावें । ब्रह्मज्ञान भक्तांसी होआवें । वैराग्यभक्तीसहित ॥१२५॥

*　　*　　*　　*

"...संपूर्ण आणावें मन कानीं । दृष्टि वक्त्याचे लावी जो ध्यानीं । श्रवण करावया अवधानीं । जें ऐकावें तें अंगीं होणें ॥ १७३ ॥ होणें ऐकती वाचती । निःसंदेह सर्व चित्तीं । हा दाळभ्यपुरीं उचिती । केला ग्रंथ लवणाब्धितीरीं १७४ ॥ तीरीं कृष्णेचे आरंभिला । मग दाल्भ्येश्वरीं संपविला । सत्पुरुषांसि समर्पिला । श्रीरमावल्लभदासानें ॥ १७५ ॥" ( वा. वृ. वि. १० )

श्रीरमावल्लभदासांच्या हातून याप्रमाणें अनेक अद्भुत चमत्कार घडले आहेत. त्यांतील एक दोन पुढील चरित्रभागांत दिलेही आहेत. पण चमत्कार हे संतांच्या योग्यतेचे खरे दर्शक नव्हेत आणि कांहीं लोक खरे संत हे चमत्कार करीत नसतात असें ह्मणतात, तेंही त्यांचें ह्मणणें खरें नव्हे. चमत्कार योगसिद्धीपासून होतात; पण ह्या योगसिद्धी संतांकडे न बोलावतां त्यांच्या सेवेची अपेक्षा करीत येऊन राहतात व संतांच्या सहज बोलण्यावरून त्यांचा हेतु परभारेंच पूर्ण करीत असतात. योगसिद्धींचे जे कोणी दास बनतील त्यांना त्यांपासून पदच्युतीची भीति असते; पण योगसिद्धी या उलट संतांच्या दासी होऊन राहतात, त्यामुळें संतांच्या चरित्राला अधिकच शोभा येते. संत सर्वकाळ निरपेक्ष असतात. यासंबंधानें एकनाथ महाराज भगवंताचे उद्गार वर्णन करितात—

"सिद्धींची अपेक्षा ज्यांचे चित्तीं । सिद्धी त्यांकडे न थुंकिती । निरपेक्षाचे पायींची माती । सिद्धी वंदिती सर्वदा ॥ ज्यासी प्राप्त माझें निजसुख । त्यासि सिद्धी तुच्छप्राय देख । न देखती जन्ममरणांचें मुख । माझा पूर्ण हरिख कोंदाटे ॥ जे नेणती माझें निजसुख । ऐसे जें कां केवळ मूर्ख । त्यांसीच सिद्धींचें कवतुक । अलौलिक भोगलिप्सा ॥ सकळ सिद्धींचें मी जन्मस्थान । माझेनि सिद्धींचें थोर महिमान । सिद्धींसी मजमाजीं निदान । यापरी मी जाण स्वामी त्यांचा ॥ जो सकळ सिद्धींचा ईश्वर । तो

मी लागे त्यांची पूजा करूं। तेथें लाजोनि सिद्धींचा संभारु। घेऊनि निज वेव्हारु पळताती ॥ ज्या साधावया महा सिद्धी । योगी शिणताती नानाविधीं। त्या प्रगटल्या त्रिशुद्धी। भक्त सद्बुद्धी नातळती ॥ ठसावल्या माझी भक्ति। सकळ सिद्धींची होय प्राप्ति। संदेह नाहीं ये अर्थीं। जाण निश्चितीं उद्धवा ॥ "—( एकनाथी भागवत अ. १५।१४ )

याप्रकारें सकळ सिद्धींना अंकित करून सोडणारे श्रीरमावल्लभदास ह्यांनीं भगवद्भक्तीचा डांगोरा सर्व देशभर पिटिला. जसें नामदेवादि संतांचें उपास्य दैवत श्रीविठ्ठल व रामदासांचें श्रीराम, तसें रमावल्लभदासांचें उपास्य दैवत **श्रीकृष्ण** हें होतें. इतर अवतारही परमात्म्याचेच होत. पण श्रीकृष्णअवतारांत कांहीं विशेष आहे. कृष्णावताराचें रहस्य अलीकडील विद्वान लोकांना हळू हळू कळत असून पाश्चात्य लोकांतही श्रीकृष्णभक्तीचें बीज बंगाल्यांतील विद्वद्रत्न भगवद्भक्तांनीं पेरलें आहे. राधाकृष्णाचें व इतर गोपींचें प्रेम जें कांहीं दिवसांपूर्वीं सदोष वाटत होतें, तेंच आतां निर्दोष व अत्युच्च प्रकारचें असल्याबद्दल विद्वानांची खात्री पटत चालली आहे. सगुणभक्त कबीरदास यांनीं एका दोह्यांत—

" क्या कहते कबीर कबीर, जावो जमुनातीर ।
एकेक गोपीके प्रेममे, बहगये कोट कबीर ॥ "

असें जें ह्मटलें आहे, त्याचा अर्थ आतां कळूं लागला आहे, आणि हें एक सुदैवच समजलें पाहिजे. परमोच्चकोटीचे भगवद्भक्त श्रीएकनाथमहाराज यांनीं तर कृष्णावतारमहिमा आपल्या ग्रंथांत ठिकठिकाणीं गायिला आहे आणि त्याचेंच प्रतिबिंब आमच्या रमावल्लभदासांच्या अंतःकरणांत व चारित्र्यांत पूर्णपणें उमटलेलें दृष्टीस पडतें. एकनाथ महाराज श्रीकृष्णाविषयीं ह्मणतातः—

" बहुतीं अवतारीं अवतरला देवो। परी या अवतारींचा नवलावो। देवां न कळे अभिप्रावो। अगम्य पहा वो हरिलीला ॥ ८६ उपजतांचि मायेवेगळा। वाढिन्नला स्वयें स्वलीळा। बाळपणीं मुक्तीचा सोहळा। पूतनादि सकळां निजांगें अर्पी ८७ मायेसी दाविलें विश्वरूप। गोवळां दाविलें वैकुंठदीप। परी गोवळेपणाचें रूप। नेदीचि अल्प पालटों ८८ बाळ बळियातें मारी। अचाट जगादेखतां करी। परी बाळपणाबाहेरीं। तिळभरी नव्हेचि ८९ ब्रह्म आणि चोरी करी। देवो आणि व्यभिचारी। पुत्रकलत्र आणि ब्रह्मचारी। हेही परी दाविली १९० अधर्में वाढविला धर्म। अकर्में तारिलें कर्म। अनेमें नेमिला नेम। अति निःसीम निर्दुष्ट ९१ तेणें संगेंचि सोडिला संगु। भोगें वाढविला योगु। त्यागेवीण केला त्यागु। अति अव्यंगु निर्दोष ९२ कर्मठां होआवया बोधु। कर्मजाड्याचे तोडिले भेदु। भोगामाजीं मोक्षपदु। दाविलें विशदु प्रगट करोनि ९३ भक्ति भुक्ति

मुक्ति। तीन्ही केलीं एक पंक्तीं। काय वानूं याची ख्याती। खाऊनि माती विश्वरूप दावी १९४ ”
—( ए. भा. अ. १ )

“ स्त्रीपुत्रादि गृहवासी। असोनि, नित्य संन्यासी। हेंही लक्षण हृषीकेशी। येणें अवतारेंसीं दाविलें १४५ अंगीं दाविलें गोवळेंपण। सर्वेचि स्वामित्व आलें पूर्ण। शेखीं सेवक जाहला आपण। तरी पूर्णत्वपण मैळेना ४६ एकाचे घरीं उचिष्टें काढी। एकाचीं अंगें धूतसे घोडीं। तरी पूर्णत्वाचिये जोडीं। उणी कवडी नव्हेचि ४७ एकाचीं निमालीं आणलीं बाळें। एकाचीं समूळ निर्दाळीं कुळें। इहीं दोहींपरीं ज्ञान न मैळे। हेंही प्रांजळें प्रकाशिलें ४८ एकाचा जाहला कैवारी। एकाचा जाहला पूर्ण वैरी। परी एकात्मता चराचरीं। अणुभरीं ढळेना ४९ एकीं उद्धरलीं चरणीं लागतां। तोही एकाचे चरणीं ठेवी माथा। बाप ज्ञानाची उदारता। न्यून पूर्णता तरी न घडे १५० इतर ज्ञाते ज्ञानास्थितीं। बोल बोलोनि दाविती। तैसी नव्हे ही कृष्णमूर्ति। आचरोनि रीति दावी अंगें ५१ अतिगुह्य ज्ञानलक्षणें। आचरोनि दाविलीं श्रीकृष्णें। परी अणुमात्रही उणें। नेदीच पूर्णपणें अंगीं लागों ॥ ५२ ॥
—( ए. भा, अ-३१ )

**“ श्रीकृष्ण नव्हे अवतार। हा अवतारी चिन्मात्र। त्याचें अति अतर्क्यचरित्र। ब्रह्मादि रुद्र नेणती ॥ १०१ ॥**

अशा रीतीनें श्रीकृष्णावताराचा महिमा ज्या एकनाथमहाराजांनीं (ए० भा० अ० ३१ पहा ) संपूर्ण वर्णन केला आहे, त्यांच्या कृष्णभक्तीची सीमा कोण वर्णन करूं शकेल बरें? भक्तीची शक्ति अनिवार आहे, किंबहुना भगवंतालाही ती अगम्य आहे. भगवान उद्धवास सांगतातः—

“ चहूं मुक्तींहूनि वरती। उल्हासें नांदे माझी भक्ति। माझे भक्तीची अनिवार शक्ति। तिसी निश्चितीं आकळलों ३७५ माझें स्वरूप अनंत अपार। तो मी भक्तीनें आकळलों साचार। यालागीं निजभक्तांचें द्वार। मी निरंतर सेवीतसें ७६ भक्तीनें आकळलों जाण। यालागीं मी भक्ताधीन। माझिये भक्तीचें महिमान। मजही संपूर्ण कळेना ३७७ ”

ह्या आपल्या वचनांप्रमाणें भगवान श्रीकृष्ण आपले पूर्णभक्त एकनाथमहाराज यांच्या घरीं बारा वर्षे गंगेचें पाणी कावडीनें भरण्यास व इतर सर्व कामें करण्यास राहिले. भगवतांच्या अगम्य मायेनें एकनाथासही त्याच्या खऱ्या स्वरूपाचें तात्विक ज्ञान झालें नाहीं. ( ‘ ईश्वरीमाया अनिवार। एकनाथ नोळखे इंदिरावर ’— भ. ली. अ. २० ) बारा वर्षांनंतर, द्वारकेंत एक ब्राह्मण श्रीकृष्णाच्या प्रत्यक्ष दर्शनाकरितां तप करीत असतां रुक्मिणीमातेचा दृष्टान्त होऊन जेव्हां तो पैठणास आला,

तेव्हां श्रीखंड्याच्या स्वरूपाचें ज्ञान एकनाथमहाराजांस झालें; व जगद्गुरु श्रीकृष्णपरमात्म्याला आपण कष्टविल्याबद्दल त्यांना फारच पश्चात्ताप झाला. ( 'एकनाथासी अनुताप जीवीं । ह्मणे शेषशायी कष्टविला '—भ. ली. अ. २० )- ही गोष्ट सर्वप्रसिद्धच आहे. एकनाथमहाराजांनीं जी अत्युत्कट गुरुसेवा केली होती, त्याचें ओझें देवावर होऊन तें उतरण्याकरितांच देवानेंही अशा रूपानें एकनाथाच्या घरीं सेवा केली. तीही एकनाथास अतिशय जड झाली यांत संशय नाहीं. त्या वेषधारी ब्राह्मणमुलास ( श्रीखंड्यारूपी श्रीकृष्णास ) ठेवून घेतांना मागाहून लग्न करितों, अशा करारानें ठेवून घेतलें होतें. तो करार वेष प्रगट झाल्यानंतर पुरा होण्याचा संभव नाहीं ह्मणून ज्या वेळीं एकनाथमहाराज खेद करूं लागले, त्या वेळीं रुक्मिणीस्वयंवर वर्णन करण्याविषयीं भगवंतांनीं आज्ञा केली व आपल्या लग्नाच्या करारपूर्ततेची पावती दिली. त्याप्रमाणें एकनाथमहाराजांनीं रुक्मिणीस्वयंवर रचून ती सेवा पुरी केली व पुढें कृष्णभजनाचा क्रम चालू ठेवला. पण तेवढ्यानें त्यांची समाधानी झाली नाहीं, ह्मणूनच कीं काय कोण जाणें, त्यांनीं **रमावल्लभदासाच्या रूपानें पुन्हा प्रगट होऊन कृष्णोपासनाव्रत चालविलें** व तो एक **सांप्रदायच** सुरू केला. प्रेमळ आजाआजींचा त्याग करून श्रीजनार्दनस्वामींच्या दर्शनाकरितां एकनाथ लहानपणींच ज्या देवगिरीगडावर आले, तेथेंच यांचा जन्म झाला. एकनाथमहाराजांनीं गुरुसेवेंत असतांना सुमारें १८ वर्षें वयाच्या वेळींच लढाईस जाऊन परचक्राचा विध्वंस केला होता, त्याप्रमाणेंच रमावल्लभदासही त्याच वयाच्या सुमारास लढाईत यशस्वी होऊन आले. इतर शत्रू एकाच जन्मांत एखाद्याच वेळीं त्रास देतात, परंतु जन्मोजन्मीं व घटकोघटकीं त्रास देणारे जे संसाररणमैदानांतील षड्रिपू-कामक्रोधादि महा वैरी—यांच्याशीं लढाई करून पूर्णपणें यशःश्री संपादण्याकरितांच रमावल्लभदासांना आपलें पूर्ण भांडार अथवा हत्यार ( एकनाथी भागवत ) या लढाईत सांपडलें. *

ज्या सृष्टिनियमानें चंद्रसूर्यादिकांचे अस्तोदय होत असतात, त्याच नियमानें

* या प्रसंगीं पुढील गोष्ट द्यावीशी वाटल्यामुळें देत आहों. बंगाल्यांतील प्रसिद्ध विद्वान, श्रीमान, धर्मनिष्ट व दानशूर गृहस्थ देवेंद्रनाथ टागोर ज्यांला महर्षी असें तिकडील लोक ह्मणतात, ते एकदां आपल्या माडीवर बसले असतां वाऱ्यानें उडत उडत एक कागदाचा तुकडा येऊन त्यांच्या हातीं पडला. त्यावर ' **मा गृधः कस्यचिद्धनं** ' हा ईशावास्योपनिषदांतील श्लोकाचा चरण लिहिलेला होता. तो वाचून त्यांना अत्यंत आश्चर्य वाटलें व त्यांची मति एकदम पालटली. त्यांनीं त्यानंतर संस्कृत शिकून उपनिषदांचा अभ्यास सुरू केला, वगैरे गोष्टी विद्वानांस माहीत असतीलच. पुढील त्यांच्या चरित्राची उपपत्ति कोणीं कशीही लाविली तरी उपनिषद्वाक्याचा तो कागद त्यांच्या हातीं वाऱ्यानें येऊन पडणें याचें कारण नेहमीं गूढच राहील. यालाच आपल्या शास्त्रांत अदृष्ट अथवा पूर्वजन्मऋणानुबंध असें ह्मणतात.

लहानमोठ्या योग्यतेच्या जीवांचे अभ्युदय व त्यांचीं कारणें घडून येतात. तीं व मानवी बुद्धीला अगम्य असतात यांत संशय नाहीं. रमावल्लभदासांचा जन्म देव गडावरच कां? त्यांना लढाईतील लुटींत एकनाथी भागवतच कां सांपडावें? व त श्रीकृष्णउपासनेकडेच ओढा कां व्हावा? या गोष्टींचा विचार केला असतां यांत जन्मऋणाचे अनुबंध घेतल्यावांचून गत्यंतरच दिसत नाहीं. श्रीएकनाथमहाराज समाधि शालीवाहन शके १५२१ या वर्षीं झाली व श्रीरमावल्लभदासाचा जन्म **शके १५२२ या वर्षीं झाला** (ही गोष्टही विसरतां कामा नये). त्यानंतर–' पित्याचा कारभार समस्त । आवरिला अष्टादश वर्षांत । तंव परसैन्य युद्धार्थ । आलें त्वरित राज्य घ्यावया ॥ ' या राघवदासाच्या ओंवीवरून त्यांनीं आपल्या वयाच्या अठरावे वर्षीं ह्मणजे शके १५५० सालीं बापाचा कारभार आपल्या हातीं घेतला; इतक्यांत परसैन्य आल्यामुळें लढाई करून त्यांत आत्मयशाबरोबर भगवद्यश ह्मणजे भागवत मिळविलें. त्याच्या वाचनानें त्यांला उपरति होऊन ते निघून गेले इत्यादि गोष्टी मागें सांगितल्याच आहेत. देवाचे जसे अनंत अवतार, तसे संतांचेही जगदुद्धारार्थ अनेक वेळां अवतार होतात. त्याप्रमाणें श्रीएकनाथमहाराजांनीं रमावल्लभदासरूपानें दुसरा अवतार घेणें असंभवनीय नसून त्यांच्या योग्यतेस कमीपणा आणणारेंही नाहीं. तथापि या प्रेमाच्या उत्प्रेक्षेबद्दल संतसज्जन मला क्षमा करोत अशी मी प्रार्थना करितों. असो.

रमावल्लभदासांनीं सद्गुरुकृपा संपादन करून भगवत्साक्षात्कार मिळविल्यानंतर लोकोपकारार्थ कांहीं ग्रंथ केले. त्यापैकीं वाक्यवृत्ति टीका हा ग्रंथ त्यांनीं कोंकणांत दाल्भ्यपुरांत केल्याबद्दलचा उल्लेख मागें आलाच आहे. पण त्यांत त्यांनीं कालाचा उल्लेख केलेला नाहीं. तरी त्यांनीं इतर कांहीं ग्रंथ केले आहेत, त्या बहुतेकांत शक संवत्सर घातलेले आढळतात. '**दशकनिर्धार**' नांवची भागवत दशम स्कंधातील कृष्णजन्माध्यायावर लहान ओंवीबद्ध टीका केली आहे. त्यांत त्यांनीं कालाचा व स्थलाचा उल्लेख असा केला आहे:—

'' श्रीमत् शालिवाहन । शतें पंधरावरी पंचावन्न । श्रीमुख संवत्सर गहन । मास पावन मार्गशीर्ष १ श्री चतुर्दशी शुक्ल पक्ष । श्रीदत्त-जयन्ती अलक्ष्य । श्रीबुधवार प्रत्यक्ष । श्रीगुरुलक्ष्य लागलें २ तें टीका ' निर्धारदशकाची ' । झाली वरून वाणी श्रीशुकाची । जेथें झाली त्या स्थळाची । नाम्ना पापाची वाढ मोडी ३ कृष्णा ( नदी ) कृष्णतनु साक्षात । वेण्या महेश्वर निभ्रांत । उभयसंगमीं जो सुस्नात । तो निवांत मुक्ति पावे ४ दक्षिणप्रयाग नाम धरी । विराटदेशाभीतरीं ( वांईक्षेत्रीं ) । महाबळेश्वरधौम्य कुसरी । तयाउपरी मेरुलिंग ५ मेरुलिंगाचे दक्षिण बाहीं । यवतेश्वर जागृत पाहीं । सर्वथा पैं करंजिये कांहीं । दुरी नाहीं तो ग्राम ६ येथें काशीभट्ट अनुष्ठानीं । श्रीगोविंदभट्ट भागवतव्याख्यानी । हे बंधुद्वय निराभिमानी । समाधानी गुणग्राही ७ ग्राही बोळाविककर?

व या संगीचे (व्यासंगीचे ?) । तत्वानंद पूर्णपद मिळणीचे । शंकर गोविंद मल्हारी जीवीचे । साधु प्रीतीचे आळुके ८ आळुके अन्य बंधुद्वय । नृसिंह आप्पाजी अद्वय । कथाश्रवणीं अति तन्मय । होवोनि निःसंशय हरिभक्त ९ या संतापें चातुर्मासी झाली । ' निर्धार टीका ' वाचें आली । एकान्ती वृत्ति श्रवणीं घाली । ग्रंथीं लागली वृत्ति त्याची १० साधकाच्या हिताकारणें । श्रीकृष्णें मज बोलणें । श्रीरमावल्लभदासपणें । ग्रंथ करणें संपूर्ण ११"

( वरील ओंव्यांमधून ज्या ज्या संतसज्जनांचीं नांवें आलीं आहेत, त्यांच्याविषयींची अधिक माहिती मिळवून कोणी शोधक प्रसिद्ध करतील तर बरें होईल. परमेश्वर तशी प्रेरणा करो. )

याशिवाय रमावल्लभदासांनीं भगवद्गीतेवर ' चमत्कारी ' नांवाची टीका केली आहे. गुरुमाहिमापर ' गुरुवळी ' नामक लहानसें प्रकरण आहे, त्यावर शके १५५८ धातृनामसंवत्सर, असा उल्लेख आहे. येथें श्रीएकनाथमहाराजांची पुनः अशाकरितां आठवण होते कीं, त्यांनींही एके वेळीं भगवद्गीतेवर टीका करण्यास आरंभ केला होता; परंतु भगवंतांनीं त्यांना चमत्कारिक वेषानें व चमत्कारिक कृतीनें ती न करण्याचा बोध केला. म्हणून एकनाथांनीं तें काम सोडून दिलें. ( ही गोष्ट त्यांच्या चरित्रांत प्रसिद्धच आहे. ) पण मागें अनुवाद केल्याप्रमाणें श्रीकृष्णोपासनेची क्षुधा रमावल्लभदासरूपानें जशी त्यांनीं तृप्त करून घेतली, त्याचप्रमाणें भ. गीतेवर टीका करणेची त्यांची वासना याच म्हणजे रमावल्लभदास अवतारांत त्या आपल्या ग्रंथावर टीका करवून पुरविली, असें आम्हांस प्रेमानें म्हणावेंसें वाटतें. भ. गीतेवर टीका करून संपल्यावर श्रीदत्तदेवांनीं दर्शन देऊन त्या ग्रंथाला वर दिल्याचा व त्या टीकेला ' चमत्कारी ' हें नांव दिल्याचा उल्लेख राघवदासांनीं आपल्या कवितेंत केला आहे, ( या प्रकरणाचे शेवटील आरती पहा. )

रमावल्लभदास कोंकणांत जाऊन आल्यावर वांईक्षेत्रांत कांहीं दिवस राहिले होते. याबद्दलची हकीकत वर आलीच आहे. त्यानंतर ते कृतकृत्य होत्साते फिरत फिरत परत आपल्या गांवीं जाऊन कुटुंबांत राहिले असावें असें वाटतें; परंतु तो इतिहास खात्रीलायख सांपडत नाहीं. असो.

याप्रमाणें हे वैष्णववीर नाम निजधीर गर्जून कळिकालाला कंपायमान करीत फिरत असतां आपले शिष्य व मित्र कृष्णाजी गोसावी, गोपाळ गोसावी, राघवदास, गंगाधरदास, नरहरी गोसावी वगैरे सह दक्षिण कर्नाटक प्रांतांत आले. ते आले म्हणण्यापेक्षां एका उत्तम अधिकारी जीवाच्या सुप्रारब्धसूत्रानें त्यांना आकर्षून आणलें म्हणण्यास हरकत नाहीं. संत हे त्रिगुणाच्या पलीकडे गेलेले असतात व इतर मनुष्य हे त्रिगुणांत गुरफटलेले असतात. त्यामुळें संताची चर्या–चालचलणूक–ही त्यांच्या दृष्टीनें कशीशीच भासते. गुणातीतांची परीक्षा गुणबद्धांस कशी होईल? साधारण लोक तर असोत, पण मोठ्या बुद्धिमान्‌संतांसही त्यांच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान होणें शक्य नाहीं. त्यांनींच कृपा

करावी. तेव्हां त्यांच्या स्वरूपाचें ज्ञान होतें. ‘ श्रद्धा ’ ही दिव्य दैवी शक्ति आहे. अंतःकरणांतील ही शक्ति उत्तम प्रकारें जागृत करण्याकरितांच संत नानातऱ्ह करीत असतात. आणि त्यांच्या कृपेनें एकदा अंतरांतील श्रद्धाशक्ति जागृ ह्मणजे मग जिवात्म्याच्या उद्धाराचा मार्ग आपोआप खुला होत जातो. चमत्कार ’ हेही ही शक्ति जागृत होण्यास केव्हां केव्हां कारण होतात. प हे अद्भुत चमत्कार गारुड्याप्रमाणें स्वार्थासाठीं नसून केवळ परोपकार बुद्धीचे, उद्धारासाठींच असतात. रमावल्लभदास हे उत्तर कानडा जिल्ह्यांतील पुरा० गोकर्णक्षेत्रीं आले. तेव्हां शिवरात्रीच्या वेळीं समुद्रस्नानास गेले असतां तेथें हजारो जत्रा जमलेली होती. त्या यात्रेंत स्नान करीत असतां लक्ष्मीबाई नांवच्या एका सारस्वतब्राह्मण स्त्रीचें कर्णफूल पाण्यांत पडलें, त्या वेळीं ती परम चिंताक्रांत होऊन शोधूं लागली. पण समुद्रांत पडलेला जिन्नस एके ठिकाणीं थोडाच राहणार ! बरोबरच्या बायाही तिजकरितां शोधूं लागल्या; पण कोणास कांहीं थांग लागेना. शेवटीं ती खिन्न झाली. सुदैवानें रमावल्लभदासांची स्वारी तेथें जवळच होती, त्यांनीं ‘ समुद्राची प्रार्थना कर, ह्मणजे तो दागिना तुझाच असल्यास तुला मिळेल, ’ असें त्या बाईस सांगितलें. बाईनें त्यांच्या वाणीवर विश्वसून समुद्राचा धांवा केला व आश्चर्य हें कीं, तिला तो दागिना लगेंच मिळाला. हा चमत्कार पाहून लोकांस मोठा अचंबा वाटला व हा कोणी तरी महापुरुष आहे, अशी त्यांची खात्री झाली. लक्ष्मीबाई तर ह्या उपकृतीनें वेडीच होऊन गेली. तिनें सद्गदित अंतःकरणानें त्या महापुरुषांच्या पायावर मस्तक ठेवलें. तिची भावशक्ति जागृत झाली. त्यामुळें तिची अंतःस्थिति एकदम पालटली व तिनें आपल्या रमावल्लभदासांना ‘ मल्लापूर ’ गावीं येऊन यथाशक्ति सेवेचा अंगिकार करण्याबद्दल अत्यंत नम्र भावानें प्रार्थना केली.

गुरुशिष्य संबंध हा ईश्वरीसूत्राप्रमाणें पूर्वीच ठरलेला असतो हें मागें सांगितलेंच आहे. केव्हां केव्हां शिष्य गुरूच्या शोधास जातात व केव्हां केव्हां गुरु हें शिष्याच्या शोधार्थ येतात, अशींही उदाहरणें आढळतात. सोहिरोबा आंबिये हे यांपैकींच होत. वासरांच्या भुकेच्या वेळीं त्यांना पान्हा देण्याकरितां जशी गाय धांवून येते, तशी सद्गुरु माउली शिष्यांवर योग्य वेळीं अनुग्रह करण्याकरितां शिष्याच्या घरीं चालून येते. लक्ष्मीबाईचेंही असेंच घडलें. तिची परमार्थविषयीं ‘ आवड ’ पाहून सद्गुरुनाथ तिच्या घरीं चालून गेले व तिला भक्तिरहस्याचा उपदेश करून श्रीदत्तमंत्र व वासुदेवद्वादशाक्षरीमंत्र देऊन अनुग्रह केला आणि तिचें नांव ‘ आवडी ’ असें ठेवलें. त्या वेळेपासून ती आवडी या नांवानेंच पुढें प्रसिद्धीस आली. श्रीकृष्णोपासनाव्रत ह्मणजे आपलें निजभक्ति--आपली धनदौलत-भांडार पूर्णपणें स्वाधीन करण्याकरितां रमावल्लभदासांनीं आपल्या इतर पुत्रांपेक्षां आपल्या ह्या कन्येचीच अधिक निवडणूक केली व श्रीकृष्णजयन्तीचा त्या चातुर्मासांतील उत्सव तिच्या

घरीं करण्याचें ठरविलें. ( त्या वेळीं त्यांनीं दिलेली कालियामर्दन कृष्णाची प्रतिमा अद्याप आवडी मठांत आहे. ) श्रीगुरुमहाराजांनीं उत्सवाचा बेत आपल्या घरीं केल्यामुळें तिला परमानंद झाला; पण जवळ पैसा नसल्यामुळें उत्सवाचा खर्च कसा निभावेल अशा चिंतेंतही ती पडली. तिजजवळ पतिरायानें बाहेरगांवीं जातांना चार होन (कोणी एक होन ह्मणतात) देऊन ठेवले होते (होन ह्मणजे सुमारें ३॥ रुपये किंमतीचें त्यावेळचें एक सोन्याचें नाणें होय. ) तिचा चिंतातूर चेहरा पाहून रमावल्लभदासांनीं हास्यमुद्रेनें तिला विचारलें व ते होन मागून घेतले आणि एका ताइतांत मंत्राक्षता घालून त्यांत ते ठेवले व गरज लागेल त्याप्रमाणें त्यांतून एकेक होन काढून घेत जा, ताईत मात्र पालथा करूं नको असें तिला सांगितलें. तिनेंही त्याप्रमाणें श्रद्धेनें केलें व श्रावण शु. ५ पासून श्रावण वद्य १३ दिवशीं अवभृतस्नान गोपाळ काला वगैरे होईपर्यंत श्रीकृष्ण जन्मोत्सव मोठ्या थाटानें झाला. भजनपूजनाचा थाट दिवाबत्तींचा लखलखाट व नामस्मरणाचा घडघडाट पाहून व ऐकून सज्जनांचीं अंतःकरणें प्रेमानें उचंबळूं लागलीं, त्याबरोबरच दुर्जनांचीहीं अंतःकरणें रागद्वेषानें खळबळूं लागलीं. निंदकांनीं कोणत्याही युगांत अथवा काळांत सज्जनांस सोडलें नाहीं, हा अनादिकाळापासूनचा अनुभव आहे. लक्ष्मीबाईचे पति नारायणअप्पा गांवीं केव्हां येतील व बायकोनें चालविलेला हा भजनकीर्तनाचा धांगडधिंगा त्यांच्या कानावर केव्हां घालूं व तिला शासन करावयास लावूं असें त्यांना होऊन गेलें होतें. याप्रमाणें संधी साधून नारायणअप्पा गांवीं येतांच त्यांस वाटेवरच गांठून दुष्ट लोकांनीं बायकोविरूद्ध त्याचे कान भरून टाकले. त्याबरोबर त्याचें मन कलुषित होऊन ते घरीं आले व बायकोवर रागें भरून आपण दिलेले होन कुठें आहेत?तूं ह्या गोसावड्याच्या नादीं लागून काय बंड माजविलें आहेस ? वगैरे विचारूं लागले. तेव्हां त्या साध्वी स्त्रीनें नम्रपणें गुरुमहाराजांनीं दिलेला तो होनाचा ताईत आणून पतिरायाच्या हातीं दिला. तो घेऊन घाईनें त्यांनीं पालथा करितांच त्यांतून त्यांनीं पूर्वीं दिलेले चार होन खालीं पडले. ते पाहून लक्ष्मीबाईस फार वाईट वाटलें. तिनें सर्व वृत्तांत नम्रभावानें निवेदन केला. तो ऐकून आपल्या घाईबद्दल व अश्रद्धेबद्दल त्यांलाही फार वाईट वाटलें. त्या अवतारी सत्पुरुषांच्या महिमेबद्दल त्यांची खात्री होऊन ते त्यांनां अनन्यभावें शरण गेले. " साधवो दीनवत्सालाः " दीन होऊन शरण आलेल्यास तारणें हें संतांचें ब्रीदच आहे. रमावल्लभदासांनीं लक्ष्मीबाईच्या भ्रतारावरही पूर्ण अनुग्रह करून त्यास श्रीकृष्णभक्तीस लाविलें. त्यानंतर श्रीहरिगुरुकृपेनें लक्ष्मीबाई ( ऊर्फ आवडीबाई ) चे भ्रतार **नारायणआप्पा** हे ह्मैसूर राज्यापैकीं **नगर** संस्थानचे दिवाण झाले. ओघानुसार आलेली ही लक्ष्मीनारायणाची हकीकत येथें देणें अप्रासंगिक होणार नाहीं. हें लक्ष्मीनारायणाचें दांपत्य याप्रमाणें मल्लापूर ( ता. कुमठा, जि. कारवार ) येथें गुरूपदिष्ट सांप्रदायाप्रमाणें भगवद्भक्तींत मोठ्या आनंदानें कालक्रमण करीत होते. चंदावर नांवचा गांव तेथून जवळच एका ओढ्यापलीकडे आहे. तो गांव त्या वेळीं नगर संस्थानाखालील एका मुसलमान

सरदाराचा होता. अद्यापि तेथें मुसलमानांचीच वस्ती जास्त आहे. एक आकास्मक गोष्ट अशी घडून आली कीं, नगरचा राजा व त्याचा बंधु यांजमध्यें कांहीं कारणानें वैरभाव उत्पन्न झाला व राजबंधु त्यामुळें आपली राजधानी सोडून चंदावर येथील किल्ल्यांत येऊन राहिला. ( या किल्ल्याच्या सांप्रत थोडयाशा खाणाखुणा मात्र दिसतात. ) आमचे नारायणआप्पा त्या वेळीं कांहीं गांवचे कुलकर्णी होते व ते बुद्धिबळाचा डाव खेळण्यांत फारच पटाईत असत. चंदावरच्या किल्ल्यांत येऊन राहिलेल्या राजबंधूसही तें व्यसन असल्यामुळें नारायणआप्पाचा व त्यांचा स्नेह जमला. नारायणआप्पा रोज त्याच्याकडे बुद्धिबळें खेळण्यास जात असत. एके दिवशीं डाव अगदीं रंगांत आला असतां डोकीवर पाल चुकचुकली. पल्लीशब्द व शकुन यांचेही नारायणआप्पास चांगलें ज्ञान होतें. पालीचा शब्द ऐकून विस्मयानंदमुद्रेनें क्षणभर ते डोळे झांकून स्तब्ध बसले व आपलयाशींच खालीं मान घालून ह्मणाले ' राजाला राज्य मिळालें ह्मणून बटकीचें दळणें चुकत नाहीं; चालूं द्या, महाराज डाव. ' हें ऐकून राजबंधूलाही यांत कांहीं तरी आहे असें वाटून ' तुह्मी असें कां ह्मणतां ? ' असा त्यानें मोठ्या जिज्ञासेनें प्रश्न केला. त्यावर नारायणआप्पा ह्मणाले, ' मी ह्मणतों तें खरेंच आहें. तुह्मी उद्यां राजा झाला तर मज गरीबाची आठवण तुह्मांस कोठून होणार ? ' परंतु ह्या ह्मणण्याचा अर्थ त्याला नीट समजेना, ह्मणून त्याचा खुलासा करण्याकरितां त्यानें विनंति केली. त्या वेळीं नारायणआप्पा ह्मणाले, ' तुमचा बंधु मरण पावला असून गादीवर बसण्याकरितां लवकरच तुह्मांस आमंत्रण येईल, असें पालीच्या शब्दावरून मी सांगतों. ' पण हें त्याला कांहीं खरें वाटेना. तरी तो ह्मणाला—' हें तुमचें भविष्य खरें ठरलें, तर तुह्मांला मी माझा कारभारी करीन. थोडे दिवसांनीं नारायणआप्पांनीं सांगितलेल्या भविष्याचा प्रत्यय आला. राजबंधूला बोलावून नेण्याकरितां पालखी छत्र चामरें वगैरे राजचिन्हें आलीं, त्याबरोबर तो गादीवर बसण्याकरितां आपल्या परिवारासह तावडतोब निघून नगरास गेला. व ठरल्याप्रमाणें तो तेथील राजा झाला. नारायणआप्पा आपल्या सकाळच्या भजनपूजनाच्या नित्यनियमांतून मोकळे झाल्यावर त्यांना ही बातमी लागली. कांहीं दिवसांनीं नारायणआप्पा स्वतः नगरास राजदर्शनाकरितां गेले. त्याबरोबर राजानें सन्मानपूर्वक त्यांस आपल्याजवळ बसवून घेऊन त्यांला आपला मंत्री केलें. कांहीं दिवसांनीं राजगुरु व नारायणआप्पा यांजमध्यें थोडा बेबनाव आला, तेव्हां ते परत आपल्या घरीं यावयास निघाले. त्या वेळीं राजानें कृतज्ञतापुरःसर कांहीं जमिनीचीं इनामें करून दिलीं. शिरावर धारण करण्याकरितां त्यांना एक सुंदर अक्षरें व वेलबुट्टी कोरलेला रुप्याचा पट्टा दिला. त्या वेळीं तो एक बहुमानाचा प्रकार होता. त्या वेळेपासून त्यांना तेथें ' लप्पट्टे नारायणआप्पा ' असें ह्मणूं लागले. तसेंच नारायणआप्पा बाहेर निघते वेळीं त्यांच्या डोक्यावर आत्तागिरी धरण्याकरितां होन्नावर तालुक्यांतील हळदीपूर येथील जमीन तोडून दिली. अद्यापि त्या जमिनीला तेथील भाषेंत '' पक्के वुंबळी '' ह्म० आत्तागि-

रीची इनाम जमीन ह्मणतात. याप्रमाणें नारायणआप्पा आपल्या गांवीं येऊन राहिल्यानंतर नगराधिपतीकडून त्यांना गेरसप्पा व चंदावर या उभय प्रांतांचा कारभार मिळाला व त्यामुळें लोक त्यांना उभयकर असें ह्मणूं लागले. हेंच उपनांव त्यांच्या वंशांत आज चाललें आहे.

उभयकर नारायणआप्पा यांनीं श्रीहरिगुरुकृपेंकरून प्रपंच व परमार्थ उत्तम रीतीनें साधला. नारायणआप्पा हे प्रपंचांत अगदीं कमी पायरीवरून मोठ्या पायरीवर चढले. ज्यांनीं भगवंताची कांस संतसद्गुरूंच्या द्वारानें धरिली, त्यांचें कल्याण असेंच व्हावयाचें. नारायणआप्पा एक साधारण कुलकर्णी होते ते ईश्वरकृपें एका राजाचे मंत्री झाले. ' ऋण तरि मुष्टि पोहे तीच्या व्याजांत हेमनगरी ती '. ज्यानें सुदाम ब्राह्मणाला दिली, त्याला कुलकर्ण्याचा राजमंत्री करणें काय बरें अशक्य आहे ! ' तो हा न करी तें कायी । कां रे लीन व्हाना पायीं ' ? पण त्यास बळकट विश्वास पाहिजे. पहिल्या कृष्णजन्मोत्सवाच्या वेळीं आवडीबाईस खर्चाची अडचण सद्गुरुरायानें आपल्या गुप्त कृपेनें मुळींच भासूं दिली नाहीं. पण शेवटीं ती अडचण भ्रतारास राजमन्त्री करून प्रगटपणें व कायमची दूर केली. श्रीकृष्णजन्मोत्सव मोठ्या थाटानें व प्रेमानें ते प्रतिवर्षीं करूं लागले. या उत्सवमंदिरास आवडीचा मठ असें नांव पडलें, तें अजून तसेंच चालत आहे. नारायणआप्पा योग्यतेस चढले तरी त्यांचा विनय कमी झाला नव्हता. श्रीकृष्णजयंतीव्रत गुरुसांप्रदायविधीप्रमाणें चालविण्यांत त्यांनीं अगदीं कसूर केली नाहीं. ( हा व्रताचा विधि पुढें दिला आहे. ) सद्गुरुनाथ श्रीरमावल्लभदास यांनीं दूर देशांत असतां त्यांना पत्रें पाठविलीं आहेत. त्यांत एका पत्रांत त्यांनीं असें ह्मटलें आहे.

" ... ह्मणोनि गुरुभक्ता भाविका । नारायणा परम सात्विका । चतुरांमाजीं चतुर निका । जाणसी वेवेका शास्त्रमार्गें ॥ शास्त्रमार्गें प्रवृत्ति । प्रतिपाळिसी गुरुभक्ति । गुरुवचनीं प्रेमप्रीति । नाहीं स्थिति इतरांसी ॥ इतरांसि हा भजनमार्ग । सर्वथा नव्हे चांग । श्रीरमावल्लभदास सांगे । ह्मणोनि अभंग असावें ॥ " —( प्रबोधचंद्रिका-लिखित ८ वें. )

महासाध्वी श्रीमती सौ० आवडीबाई हिला उद्देशून सद्गुरुनाथांनीं एका पत्रांत लिहिलें आहे.—

" ... आवडीस ऐसें रहा ह्मणा । जाणा विश्वासाच्या खुणा । तेणें कार्य साधेल बहु जाणा । श्रीकृष्णगुरुभजनासी ॥ अवस्था अंतरींच घोटावी । बाह्य प्रपंचीं प्रीति दावावी । सावध असावें गुरुअनुभवीं । लोकांमध्यें लोकसें ॥ या स्थितीनें आवडी । असतां आह्मां बहु गोडी । जाण भक्तिप्रौढी । गोपाळनामें वाढेल ॥ विश्वास बैसे श्रवणीं । जरी होय करणी । आवडीवेगळें पूर्णपणीं । काय लिहूं बहुसाल ॥ जरी वेगळेपण असावें । तरी कृपा असोंदे ह्मणावें । आवडीस सांभाळावें । हेंही लिहिणें नलगे ॥

इति ओंविया एकवीस । येणें स्वरूपीं होय समरस । ह्मणे रमावल्लभदास । आवडीस वाचावें ॥ —( प्रबोधचंद्रिका–लिखित ११ वें. )

या उपदेशांत किती प्रमेयें भरलीं आहेत, हें विद्वान व मर्मज्ञ वाचकच जाणतील. आवडीचा अधिकार केवढा होता, हेंही यावरून लक्ष्यांत येण्यासारखें आहे. आवडीबाईला सद्गुरुदर्शनाचा लाभ ज्या कर्णफुलानें घडवून आणला, त्या कर्णफुलाचें नांव अद्याप सर्वांच्या मुखीं आहे. कांहीं हरवलेली वस्तु सांपडली ह्मणजे 'आवडीबाईचें कर्णफुल तें' अशी ह्मणच त्या प्रांतांत ( दक्षिण व उत्तरकानडांत ) पडून गेली आहे. श्रीमती आवडीबाईनें श्रीहरिगुरुभक्तीनें आपलीं उभय कुळेंही धन्य केलीं.

'ज्याचे वंशीं कुळधर्म रामसेवा । त्याचे वंशीं मज जन्म देगा देवा ।'

ह्या संतवचनाप्रमाणें तिच्या पवित्र कुळांत मला जन्म दिल्याबद्दल परमेश्वराचे फारच उपकार वाटतात.

येथें प्रेमभरामुळें हेंही लिहावेंसें वाटतें कीं, माझे प्रिय चुलत बंधु **सर नारायणराव चंदावरकर** –पूर्वीचे न्यायमूर्ति व हल्लीं इंदूरचे दिवाण– हेही याच पवित्र कुळांत जन्मले आहेत. यांचें उपनाम उभयकर पण प्रवेशपरीक्षेच्या वेळीं यांनीं चंदावरकर असें लाविलें होतें तेंच पुढें चालू झालें. भगवद्भक्ति व विशिष्ट तेजस्विता हे गुण लहानपणींच त्यांच्या ठिकाणीं दिसून येत होते. आपण एक वरिष्ठ अधिकारी होऊन बाकीच्या लोकांना आपल्यापेक्षां वडिलांना सुद्धां, हाताखालीं घेऊन कचेरी भरविण्याचा खेळ हे खेळत असत. तसेंच '**देवाची धोंगडी**' म्हणून घेऊन बरोबरच्या मुलांबरोबर भजन करीत नाचत असत. याप्रमाणें भक्तीचें बीज लहानपणींच त्यांच्या मनोभूमिकेंत रुजलें गेलें आहे. त्यांच्या पत्नीही तशाच सुशील व परमार्थाच्या अधिकारी आहेत. परमेश्वरकृपेनें त्यांनां ऐहिक सुखसंपत्तीची सीमा प्राप्त झाली आहे, त्याचप्रमाणें त्यांचा अव्यभीचार भक्तिवृक्षही प्रफुल्लित होऊन त्याला उत्तम अपरोक्षज्ञानफल–हृदयभुवनांतील **निरतिशयानंद** प्राप्त होवो व हें **लक्ष्मीनारायणाचें** जोडपें आपल्या **पूर्वज लक्ष्मीनारायणाच्या** ( **आवडीबाई व नारायणआप्पा** यांच्या ) दंपतीप्रमाणें कृतकृत्य व साधुमान्य होवो अशी मी सर्वांतर्यामी सच्चिदानंदस्वरूप श्रीकृष्णपरमात्माच्या चरणीं अनन्यभावें प्रार्थना करितों. असो.

रमावल्लभदास हे पूर्ण ज्ञानी होते ते केवळ अवतारी पुरुष होते. त्यांनीं सहस्रावधि जीवांचा उद्धार केला. एकनाथ महाराजानंतर रामदास तुकारामादि संतश्रेष्ठांनीं महाराष्ट्रांत भागवतधर्माचा प्रसार करून तेथें धर्मजागृती केली. परंतु त्यांतून दक्षिण व उत्तर कर्नाटक प्रांत भाषाभिन्नत्वामुळें ह्मणा अथवा आणखी कशामुळें ह्मणा, वगळून राहिला होता. ही उणीव भरून काढण्याकरितांच श्रीरमावल्लभानें दासरूपानें आपल्या भक्तीचा प्रसार ह्या प्रांतांत केला असें ह्मणण्यास हरकत नाहीं. अद्वैत–मतप्रवर्तक आद्य श्रीशंकराचार्य यांनीं षट्पदी स्तोत्रांत ह्मटलें आहे:—

'सत्यपिभेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम्।' याला त्यांनीं सुंदर दृष्टांतही दिला आहे:-' सामुद्रोहि तरंगः क्वच न समुद्रो न तारंगः ॥'

श्रीरमावल्लभदासांनींही ज्ञानोत्तर भक्तीचे उद्गार आपल्या वाक्यवृत्तीच्या टीकेंत दृष्टांतपुरःसर एके ठिकाणीं असे काढले आहेत-' येथें दास्यत्व घ्यावयासी हेंचि कारण। जे भक्तीचें होआवें संरक्षण । भक्तीवीण विचक्षण । ज्ञान अळवणी बोलती ॥ यालागी दास आपण । ह्मणतां काय दूषण । शरीरीं लेतां भूषण । करसेवन ( सेवा ) करितातीं ॥ सेवा नेत्राची पातीं करिती । तेणें नेत्र शोभा धरिती । तसें दासपणाची रीति । ज्ञानरत्नासि कोंदण॥' हा नेत्राचा व त्यावरील पात्यांचा दृष्टांत फारच गोड व समंजसपणाचा आहे.

'मीचि देवो मीचि भक्तु । पूजोपचार मी समस्तु। मीच मातें पूजितु। ही इत्थंभूत उपासना ॥ ', ( ए. भा. ) अशा प्रकारची श्रेष्ठ उपासना रमावल्लभदासांनीं कर्नाटकप्रांतीयांना दाखविली. तरी मागचा इतिहास पाहिला असतां असें दिसून येतें कीं, अशा अवतारी सत्पुरुषाची कीर्ति अजरामर करण्याकरितां त्याच्याबरोबर कोणीतरी एखाद दुसरा महान अधिकारी शिष्य उत्पन्न होतोच व त्याच्यामुळेंच संप्रदाय पडून पुढें परंपरा चालू होते. जनार्दनस्वामीचे एकनाथ, निवृत्तिनाथाचे ज्ञानदेव, रामदासस्वामीचे कल्याण व शिवाजी, रामकृष्ण परमहंसाचे विवेकानंदस्वामी, याचप्रमाणें रमावल्लभदासाचें स्मरण ह्म. त्यांनीं लावून दिलेली श्रीकृष्णोपासनापद्धति ही अजरामर करण्याकरितां राघवदास व आवडीबाई उभयकर ह्यांचा जन्म झाला होता, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. यांपैकीं आवडीबाईचें अल्पसें चरित्र मागें दिलेंच आहे. तशी राघवदासांचीही ओळख करून देणें इष्ट वाटतें. रमावल्लभदासांच्या चरित्रावर ग्रंथ व पदें रचून त्यांच्या कीर्तीचा विस्तार राघवदासांनींच केला. त्यांनीं रमावल्लभदास बिरुदावळी नामक ग्रंथ लिहिला असून त्यांत त्यांचें सविस्तर चरित्र वर्णन केलें आहे. त्या बिरुदावळीचा पहिला अध्याय रमावल्लभदासकृत बृहद्वाक्यवृत्तिटीका पुस्तकांत छापला आहे. ( पुढील ग्रंथ मिळविण्याची आह्मीं पुष्कळ खटपट केली, परंतु अद्याप मिळाला नाहीं हें लिहिण्यास फारच वाईट वाटतें ) ह्या बिरुदावळीशिवाय त्यांनीं श्रीदत्तात्रेयस्तुति, रमावल्लभदासमाहिमान वगैरे लहान लहान प्रकरणेंही केलेलीं आढळतात. राघवदास हे उत्तम गुरुभक्त तसेच चांगले विद्वान व गवईही होते. ह्यांना पुष्कळ भाषा अवगत होत्या. ह्यांनीं मराठी, कानडी व हिंदुस्थानी भाषेंत निरनिराळीं सुंदर सुंदर पदें, ध्रुपदें, गजली, ठुंबऱ्या वगैरे केलेल्या आहेत. ह्यांनीं कानडी भाषेंत रचिलेला 'गुरुबोध' नामक लहानसा ग्रंथ फारच गोड व गुरुप्रेमानें ओतप्रोत भरलेला आहे. यांनीं शिराली ( चित्रापूर ) येथें आपला मठ स्थापन केला. त्यास 'राघवगोसावी मठ' ( ह्यास आतां 'हरिदास मठ' असें ह्मणतात. ) या मठांत त्यांनीं रमावल्लभदासांविषयीं केलेले सर्व ग्रंथ होते. कांहीं वर्षांपूर्वीं वृद्ध मठाधिकारी कैलासवासी झाल्यानंतर बालवयी मठाधिकाऱ्यांकडून त्या

पुस्तकांची हेळसांड झाली. बरेच ग्रंथ वाळवी लागून व दुर्दैवानें एकदां देवळास वि लागला त्या वेळीं त्यांत जळून गेले ! आतां थोडासा भाग तेथें राहिला आहे, त्य थोड्याशा श्रमानें नक्कल काढून तो तरी ते जपून ठेवण्याची काळजी घेतील, तर : पितृसेवा केल्याचें पुण्य त्यांस लागणार आहे. परमेश्वर त्यांस तशी बुद्धि देवो, ह मी मागतों. मला मिळालेल्या श्रीरमावल्लभदासांच्या कवितांच्या संग्रहापैकीं अर्ध... भाग येथचाच आहे व याबद्दल त्या मठाधिकाऱ्यांचा मी ऋणी आहें.

राघवदास हे रमावल्लभदासांचे प्रत्यक्ष शिष्य नसून त्यांच्या शिष्यपरंपरे- पैकीं एक होते. तरी ह्यांचें आपल्या परम–परातपर–गुरु रमावल्लभदासांविषयींचें प्रेम व पूज्य बुद्धि पराकाष्टेची होती, हें त्यांच्याविषयीं त्यांनीं ठिकठिकाणीं काढलेल्या उद्गारावरून स्पष्ट होतें. ते आपल्या ' विरुदावळी ' ग्रंथांत ह्मणतात.

श्रीरमावल्लभाचे दास । श्रीरमावल्लभचि प्रत्यक्ष । दासरूपें चिद्विलास । धरू- नि नरवेष अवतरले ॥ १ ॥ आपलें अनन्य भजन सुख । आपण भोगा- वया देख । आणि तरावया सत्साधक । निजकौतुकें अवतरले ॥ २ ॥ कलियुगीं जनास । लावूनि नवविधा भक्तीस । खंडावया भवपाश । रमावल्लभदास अवतरले ॥ ३ ॥

राघवदासाचें श्रीरमावल्लभदास स्तुतिविषयक एक पदः–

रमावल्लभदास समर्थ । त्याचा न कळे हो परमार्थ जी ॥ ध्रु० ॥ जेथ पर- तल्या वेदश्रुति । तेथ काय वानुं मी स्थिती जी ॥ १ ॥ ऐसा अनुभव जाणती संत । जाणनेणपणाविरहित जी ॥ २ ॥ चिदंबरीं रहिवास केला अखंड सावकाश जी ॥ ३ ॥ सहजीं सहज स्थिति त्याची । अनिर्वा- च्यपणें साची जी ॥ ४ ॥ रमावल्लभस्वामी भेटी । ऐसी राघवीं पडली मिठी जी ॥ ५ ॥

रमावल्लभदासांना कोल्हापुरास श्रीदत्तात्रेयाची प्रत्यक्ष भेट झाली, याबद्दल राघवदासांनीं श्रीदत्तात्रेयस्तुतीमध्यें असें वर्णन केलें आहेः–

" तुझ्या दर्शनाची जो धरी आस । तया भेटसी नाना वेषें । तुवां रमा- वल्लभदासांस । कोल्हापुरीं प्रत्यक्ष दिधली भेटी ॥ १ ॥ अखंड एकांतवासी निजबोध सांगतां लक्ष्मीसी । तेव्हां रमावल्लभदासांसी । सर्वे बैसविसी स्वानंदें ॥ २ ॥

रमावल्लभदासांनीं भगवद्गीतेवर टीका केली व त्या टीकेला ' चमत्कारी ' हें नांव श्रीदत्तदेवांनीं दिलें. तसेंच त्यांनीं आचार्यांच्या बृहद्वाक्यवृत्तीवर टीका केली असून **वैष्णवगति** नांवाचाही एक स्वतंत्र ग्रंथ केला आहे; ह्याबद्दल राघवदासांची वाणी अशी सांपडते.

**( आरतीचें चरण ) " ग्रंथ थोर ' चमत्कारी ' । टीका पूर्ण संपतां ॥ श्रीगुरुदत्तदेवें । दिली भेटी तत्त्वतां ॥ ' वैष्णवगति ' आणि । वाक्य-**

**वृत्ति पूर्णता ॥ एवं ग्रंथत्रय कथियले समर्था ॥ जय रमावल्लभा जी। परमेष्ठी गुरुराया "॥ इ० ॥**

या तीन ग्रंथांपैकीं वाक्यवृत्ति टीका ग्रंथ छापला असून गीता चमत्कारी टीका ग्रंथाची एक लेखी प्रत मिळविली आहे. (ह्या प्रतींत लेखकाचे हस्तप्रमाद पुष्कळ झाले असल्यामुळें दुसरी एखादी प्रत मिळविण्याबद्दल खटपट चालू आहे.) 'वैष्णवगति' ग्रंथाचाही शोध चालविला आहे. परमेश्वरकृपेनें हे ग्रंथ मिळतील तो सुदीन. राघवदासांनीं रमावल्लभदासांना 'परमेष्ठी गुरु' असें वरील आरतींत म्हटलें आहे; ही गोष्टही त्यांच्या नात्यासंबंधानें लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे.

**राघवदास** हे श्रीकृष्णजयन्तीव्रतोत्सव सांप्रदायाप्रमाणें चालवीत असतां शेवटच्या दिवशीं कीर्तनांत श्रीरमावल्लभदासाचें आख्यान लावीत असत. हें आख्यान त्यांनीं फारच चांगलें बांधलें आहे. यांत विशेषेंकरून रमावल्लभदासांचें महिमान वर्णिलें असून त्यामध्यें त्यांच्या संबंधानें व त्यांच्या इतर शिष्यांचीही निवडक कविता आहे. त्यापैकीं पुढें दिलेल्या ओंव्यांत सर्व वेदान्ताचें सार त्यांनीं ग्रथित केलेलें आहे. त्यावरून राघवदासाचा अध्यात्म-अधिकारही दिसून येतो.

"श्रीरमावल्लभदास नित्य निरामय। परंज्योतिःस्वरूप चिन्मय। विश्वव्यापक विश्वमय। हे भावना लय होय जेथें ॥ १ ॥ तेथ देव ना भक्त रिक्त ना भरित। बद्ध ना मुक्त व्यक्त ना अव्यक्त। कैंची शब्द निःशब्दाची मात। सहज उर्वरित रमावल्लभ ॥ २ ॥ कांहींच न साहे जयातें। तोचि अनंत अवतार धरित। जैसा सागर सबराभरित। सहज क्रीडत तरंगरूपें ॥ ३ ॥ तैसा गुरुशिष्य भजनभावो। दावी श्रीरमावल्लभदेवो। ह्मणोनि अगम्य महिमा पाहा हो। सप्रेम लाहो लाहती भक्त ॥ ४ ॥ ऐसा तूं घन रमावल्लभ। सच्चिदानंद गुरु पूर्ण नभ। मन शिष्यासी स्वानुभव लाभ। भोगविसी स्वयंभ कृपादृष्टीं ॥ ५ ॥ म्हणोनि तुज अनन्य शरण। रिघालों जी राघव म्हणे। सांभाळीजे कृपा करून। भवबंधन छेदोनियां ॥ ६ ॥"

रमावल्लभदासांची कथा (आख्यान) संपल्यानंतर आरती करून ते ललित करित असत. 'संपली कथा आलें ललित। पुढें उरलें उर्वरित आरत। राघव भावें तनुमन ओंवाळीत। सप्रेमें न्याहाळीत निजरूप ॥ १ ॥'

**रमावल्लभदासांना राघवदास** हे परमेष्ठीगुरु ह्मणत असून त्यांच्या ठिकाणीं किती पूज्यभाव ते बाळगीत, हें वर दिलेल्या उताऱ्यांवरून दिसून येत आहे; तथापि रमावल्लभदास हे त्यांना मित्र या नात्यानें संबोधीत अथवा वागवीत असत. त्यांनीं वाक्यवृत्ति ग्रंथांत कांहीं भक्तजनांच्या भेटीचें वर्णन केलें आहे, त्यांत राघवदासासंबंधानें पुढील उद्गार काढले आहेत— '**तंव सुलक्षण। राघव मित्र**

भेटला आपण । तो नित्यनैमित्तिकीं दक्षपण । कर्मफळासी नातळे ॥ नातळे विधिनिषेधास । परी पाळी लोकसंग्रहास ॥ इ०

रमावल्लभदासांच्या शिष्यांपैकीं कृष्णदास नांवाचेही शिष्य प्रसिद्ध होऊन गेले. यांना कृष्णगोसावी असेंही ह्मणत. यांनीं सद्गुरूंना कोंकणांत दाल्भ्यपुरीं नेल्याची हकीकत मागें आलीच आहे. हे मोठे बुद्धिमान व तपस्वी होते. दक्षिणकानडा जिल्ह्यांतील कुंदापुर तालुक्यांत चक्रनदीच्या कांठीं हेम्माड नांवाचें गांव आहे. तेथें ह्यांनीं मठ बांधून श्रीकृष्णजयन्तीव्रतोत्सव चालू केला, तो अजून चालत आहे. यांनीं तेथील जोगनाणी ( जोगवा ) या नांवच्या एका स्त्रीवर अनुग्रह करून तिला जीवन्मुक्त केलें अशी आख्यायिका आहे. तेथील श्रीदत्तमंदिरांत कृष्णदासाची व त्यांची पट्टशिष्या जोगनाणी हिची अशा दोन समाधी आहेत. ह्या कृष्णदासांनाही श्रीगुरु दत्तदेवाचें दर्शन झालें होतें. याबद्दल राघवदासांनीं श्रीदत्तात्रेय स्तुतींत याप्रमाणें ह्मटलें आहे.

“ तैसेंचि कृष्णाजी गोसावी यांस । दर्शन दिधलें सावकाश । तुवां नाम ठेविलें भगवद्गीतेस । ‘ चमत्कारी ’ टीका ह्मणऊनि ॥ ११ ॥ पुस्तक आपुलें हातींचें । तुवां दीधलें जी साचें । पूजन करावें याचें । ह्मणुनि वाचें बोलिलासि ॥ १२ ॥ कोणी एके दिवशीं । तैल न मिळे कृष्णाजी गोसावी यांसी । तुवां होवोनि संन्यासी । न कळतां त्यासी दिधलें घरीं ॥ १३ ॥ ” इ०

ह्या कृष्णदासांनीं रमावल्लभदासांवर कांहीं पदें केलीं आहेत, तीं फारच प्रेमळ आहेत. त्यांतील एक रसभरित पद खालीं दिलें आहे:—

रमावल्लभदास रे । न कळे याची भास रे ॥ भक्ति करितीं अरूप बोलती, काय ह्मणूं यास रे ॥ ध्रु० ॥ आधीं सगुणीं गोंविती । शेखीं निर्गुण दाविती ॥ सगुण निर्गुण नहोनि श्रीकृष्णभक्ति लाविती ॥ १ ॥ बद्ध ह्मणो नेदिती । मुक्तपणही त्यागिती ॥ भक्त कृष्ण ह्मणे नेणों, कोण सुख भोगिती ॥ २ ॥

कृष्णदासांची शिष्या जोगनाणी हिनेंही कांहीं पदें केलेलीं आढळतात. कृष्णदास व जोगनाणी यांजवर दुष्ट लोकांनीं दुष्टबुद्धीचा आरोप केला होता; परंतु समर्थ रामदासस्वामी व वेणुताई यांच्याप्रमाणें त्यांनीं आपल्या निष्पाप आचरणानें व योगबलानें लोकांना दिपवून सोडलें, असें ह्मणतात. स्थलसंकोचामुळें या विषयींची विस्तृत हकीकत देतां येत नाहीं.

श्रीरमावल्लभदासांचा नित्यक्रम ह्मटला ह्मणजे कोठेंही ते गेलें असतां भजनपूजन व कथाकीर्तन करीत असत. या रीतीनें जगदुद्धारार्थ संचार करीत असतां कोठेंसा त्यांचा मुक्काम पडला. तेथें एका श्रीमान व श्रद्धावान गृहस्थांच्या घरीं देवाचा

वार्षिकोत्सव करण्याचा संप्रदाय होता. नेमणुकीचा कथेकरी कांहीं अपरिहार्य कारणांनीं न आल्यामुळें रमावल्लभदासांना त्यानें विनंति केली व ती साधुवर्यांनीं मान्यही केली. त्यांना चार मुलगे होते व ते सर्व प्रवासांत त्यांच्या बरोबरच रहात. त्यांना वडिलांची वरील कृति योग्य वाटली नाहीं. आपलें उपास्य दैवत सोडून दुसऱ्या देवाच्या उत्सवांत वडिलांनीं भाग घेतलेला पाहून ते नाखुष झाले. उत्सव चालू असतांच त्यांचीही प्रकृति थोडीशी बिघडली, ह्मणून त्यांनीं आपल्या वडील मुलांस कीर्तन करण्याविषयीं आज्ञा केली, परंतु ती त्यानें मान्य केली नाहीं. दुसऱ्या व तिसऱ्या मुलांसही तसेंच सांगून पाहिलें; कीर्तन करण्याची अंगांत योग्यता असतां केवळ अभिमानानें त्यांनींही ती गोष्ट नाकारली. नंतर आपले कनिष्ठ पुत्र यादवबुवा यांस त्यांनीं आज्ञा केली. पण हे यादवबुवा ह्मणजे बुद्धीनें फार मंद असून यांना दोन अभंगही पाठ येत नसत. यांनीं नुसतीं काबाडकष्टाचीं कामें करून वडिलांच्या सेवेंत दिवस घालविले होते. तथापि वडिलांच्या ठिकाणीं त्याची फारच पूज्यबुद्धि होती व तीच पुढें फळास आली. कीर्तन करण्याची आज्ञा होतांच त्यांनीं उठून वडिलांच्या पायांवर मस्तक ठेविलें व ह्मटलें—' आपली आज्ञा मला शिरसामान्य आहे, कोणत्याच आज्ञेचें आजपर्यंत मीं उल्लंघन केलें नाहीं; पण माझा अधिकार काय आहे हें आपण जाणतच आहां; मला दोन शब्दसुद्धां शुद्ध रीतीनें बोलतां येत नाहींत; याउपर आपली इच्छा कशी आहे समजत नाहीं. ' असें ह्मणून त्यांनीं पुन्हा साष्टांग नमस्कार केला. त्या वेळीं ' मूकं करोति वाचालं ' अशी ज्यांची शक्ति त्या रमावल्लभदासांनीं त्यांस उठविलें व महाप्रसाद ह्मणून आपल्या मुखांतील विडा त्यांच्या मुखांत घातला. त्याबरोबर दिव्य ज्ञान शक्ति त्यांच्या अंगांत संचरली व त्या दिवशीं यादवबुवांनीं असें कांहीं बहारीचें कीर्तन केलें, कीं, तें ऐकून सर्व लोकांना अत्यंत आश्चर्य वाटलें. भक्तिज्ञान वैराग्याची एकवाक्यता करून श्रीकृष्णउपासना हेंच मानव जीविताचें सार्थक आहे, ' कृष्णभक्तैरयत्नेन ब्रह्मज्ञानमवाप्यते ' — कृष्णभक्तांच्या घरीं ब्रह्मज्ञान चालून येते, इत्यादि प्रतिपादन त्यांनीं फारच अप्रतिम केलें. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं रेड्याकडून वेद बोलविले, त्याचप्रमाणें हें घडलें असें ह्मणणेस हरकत नाहीं. हे यादवबुवा व त्यांचे पुत्र त्रिंबकबुवा आणि त्यांचे पुत्र सदाशिवबुवा यांनींही कांहीं पदें केलेलीं आढळतात. तीं भक्तिज्ञान वैराग्यपर असून चांगलीं सुरस आहेत.

याप्रकारें पित्याचें कर्तुमकर्तु अन्यथा कर्तु अद्भुत सामर्थ्य तिन्ही मुलांच्या निदर्शनास आल्यामुळें तेही पित्याच्या आज्ञेंत वागूं लागले. हल्लीं रमावल्लभदासांचा वंश जो सोलापुरीं आहे तो शेवटील अनुग्रहीत मुलाचाच होय. याच घराण्यांतून मला रमावल्लभदासांची भ. गीता ' चमत्कारी ' टीका व त्यांचे पुत्र यादवबुवा व नातु त्रिंबक गोसावी यांचीं कांहीं पदें मिळालीं. तीं पाहिलीं असतां त्यांत गुरुभक्तिप्रेमा परिपूर्ण भरलेला दिसतो. परंतु सांप्रदाय परंपरा ह्मणजे ' सांप्रदायास अनुसरून ' अशी श्रीकृष्णजयंती व्रतरूप पारमार्थिक देणगी अथवा वतन, दक्षिण कानडा जिल्ह्यांतील

आवडी वगैरे मठांतून वंशपरंपरा चालू आहे, त्याप्रमाणें त्यांच्या घराण्यांत पुढें कसें चाललें नाहीं हें श्रीरमावल्लभदासच जाणत.

रमावल्लभदासांनीं आपले पूर्वीचें कुळगोत्र व नंतरचें त्याचें रूपांतर याविषयीं एका अभंगांत फारच बहारीचें व खुबीचें वर्णन केलें आहे. त्यांतील मर्म साधक व सिद्धपुरुषांच्याच ध्यानांत येणार आहे. रसिक वाचकांनाही तो अभंग गोड लागल्यावांचून राहणार नाहीं. याकरितां त्यांनींही त्यांतील रस घेटावा ह्मणून तो मुद्दाम खालीं दिला आहे:—

“ मुळीं लागतां सहज । मायबाप नाहींत मज ॥ १ ॥ झालों पोसणें संताचें । मन कोंवळें तयाचें ॥ २ ॥ गोत्र ‘ अगस्ति ’ होतें साचें । आतां गोत्र ‘ व्यापकांचें ’ ॥ ३ ॥ ‘ ऋग्वेदी ’ होतों पहिले । आतां ‘ भागवती ’ वहिले ॥ ४ ॥ नामघोषाचा आचारु । श्रीमद्गीतेचा विचारु ॥ ५ ॥ पूर्वीं संध्या ते त्रिकाळ । प्रेमसंध्या सर्वकाळ ॥ ६ ॥ पूर्वीं गुरु तो ‘ त्रिविद्ये ’ चा । आतां गुरु तो ‘ हरिविद्ये ’ चा ॥ ७ ॥ पूर्वीं होतों ‘ मतभेदी ’ । आतां मत जी ‘ अभेदी ’ ॥ ८ ॥ पूर्वीं बोलिलों ‘ लौकिक ’ । आतां बोलें अलौलिक ॥ ९ ॥ पूर्वीं मान म्यांच ‘ घ्यावा ’ । आतां मान सर्वां ‘ द्यावा ’ ॥ १० ॥ पूर्वीं रुचे ‘ चतुरपण ’ । आतां ‘ भोळीव ’ आपण ॥ ११ ॥ पूर्वीं ‘ मुक्ती ’-लागीं वाहें । आतां ‘ भक्ती ’ लागीं वाहें ॥ १२ ॥ पूर्वीं ‘ तारक होता हरि ’ । आतां ‘ तारक मजला करी ’ ॥१३॥ पूर्वीं होतों ‘ परतंत्र ’ । आतां सर्वांशीं ‘ स्वतंत्र ’ ॥ १४ ॥ पूर्वीं रुचे ‘ रूप-नाम ’ । आतां ‘ नाहीं त्याचें काम ’ ॥ १५ ॥ नामरूप जाऊनि भास । अवघा रमावल्लभदास ॥ १६ ॥

मनुष्य ज्या वस्तूचें चिंतन करितो त्याचें तादात्म्य पावून तद्रूप होतो, हें श्रीकृष्णाचें वाक्य वरील पूर्णतेच्या उद्गारांत दाखविले आहेत.

वरील अभंग ह्मणजे ‘ तुका झाला पांडुरंग ’ ह्या ह्मणण्याप्रमाणें स्वतःच्या पूर्णतेचा अथवा तृप्तीचा ढेकरच होय. स्वानुभवसिद्धांचे उद्गार स्वतःच्या कृतार्थतेविषयीं व धन्यतेसंबंधीं असेच निघतात. असो.

येथपर्यंत रमावल्लभदासांचा जन्मकाळ, त्यांचें पूर्ववृत्त, त्यांनीं केलेले अद्भुत चमत्कार, त्यांचे ग्रंथ व त्यांची शिष्यपरंपरा इत्यादिकांचें वर्णन मला मिळालेल्या साधनसामुग्रीवरून यथामति संक्षेपतः केलें. पुढें त्यांचा समाधिकाल केव्हां झाला याबद्दल चौकशीकरितां खात्रीलायख माहिती मिळाली नाहीं. ह्मणून त्यांचे हल्लींचे वंशज ह. गु. भ. प. गोविंद हरि राळेरासकर, बी. ए. एल्. एल्. बी. हल्लीं मु. अक्कलकोट यांना पत्र पाठवून माहिती विचारली. त्यांजकडून खालीं लिहिल्याप्रमाणें उत्तर आलें आहे:—

" श्रीगुरुमहाराजांसंबंधानें मजला प्रस्तावनेंत दाखल करण्यासारखी माहिती नाहीं याबद्दल फार वाईट वाटतें ... आह्मी श्रीगुरुमहाराजांची पुण्यतिथि आषाढी पौर्णिमेस पाळतों, याचें कारण येणेप्रमाणें:— फार दिवसांपासून पंढरपूर हें इकडे भक्तमंडळी जमण्याचें केंद्रस्थान आहे. ... आषाढी पौर्णिमेस पंढरपुराजवळील गोपाळपुरास काला होतो. त्या काल्याचा प्रसाद घेऊन सर्व मंडळी आपआपल्या गांवीं जातात. श्रीगुरुमहाराजांचाही नेहमींचा पाठ असाच होता. त्यांचा निधनकाल आषाढी पौर्णिमेच्या पूर्वींच होऊन गेला असतां गोपाळपुरास काल्याचे वेळीं त्यांस पुष्कळ मंडळींनीं पाहिलें. त्यापुढें ते पुनः कधीं दृष्टीस पडले नाहींत. आषाढी पौर्णिमेस त्यांचें शेवटचें दर्शन झालें ह्मणून आम्ही तीच त्यांची पुण्यतिथि म्हणून पाळतों. मूळचा निधनकाल व स्थल नक्की माहीत नाहीं. '

ही माहिती जरी अपूरी आहे, तरी तींत कांहीं तरी अर्थ असावा असें वाटतें. राघवदासांनीं केलेल्या ' बिरुदावळी ' ग्रंथांत त्यांचें समग्र चरित्र आहे. तो ग्रंथ पुरा सांपडेपर्यंत वरील गोष्टीवरच तृप्ति मानून राहणें इष्ट आहे.

संतांचीं चरित्रें लिहून कधींही संपावयाचीं नाहींत. भगवच्चरित्रें जशीं अगाध व अगम्य आहेत, तशींच तीं संतांचींही आहेत. समुद्रांतील जलाशय मोठा, पण आपल्या हातांतील पात्राइतकेंच त्यांतून उदक आणतां येतें, त्याचप्रमाणें या महंतांच्या महच्चरित्रांतील सारभाग तेवढा आपण घेतला पाहिजे. प्राचीन महात्म्यांच्या चरित्रलेखनाला अवश्य तितकी साधनसामुग्री आपल्या देशांत मिळत नाहीं. ही दुःखाची गोष्ट होय; परंतु यामुळें हताश न होतां शक्य तो प्रयत्न करणें आपलें कर्तव्य आहे. तें मीं सज्जनाच्या साह्यानें यथामति केलें आहे. यांत न्यून असलेलें पूर्ण करणार संतसज्जन समर्थ आहेत. श्रीरमावल्लभदासांच्या चरित्राविषयींची अधिक माहिती मजकडे कोणीं पाठविल्यास त्या सज्जनाचे मी अनंत उपकार मानेन व परमेश्वराकडे त्याच्या कल्याणाविषयीं अनन्यभावें प्रार्थना करीन. त्यांनीं केलेला ' **वैष्णवगति** ' नामक ग्रंथ, भगवद्गीता ' **चमत्कारी** ' टीका, तसेच राघवदासकृत ' **रमावल्लभदास बिरुदावलि** ' ग्रंथ मजकडे पाठविल्यास त्यांस मी यथाशक्ति द्रव्याचाही मोबदला देईन. परमेश्वर हा माझा हेतु पूर्ण करो.

याप्रमाणें आजपर्यंत प्रयत्नेंकरून श्रीहरिकृपें उपलब्ध झालेल्या माहितीवरून श्रीरमावल्लभदास व त्यांचा शिष्यवर्ग यांचें शक्य तेवढें विस्तृत चरित्र यथामति पूर्ण केलें; तें श्रीरमावल्लभचरणीं अर्पण असो. शेवटीं श्रीराघवदासांच्या वाणीनें वर वर्णिलेले व इतर सर्व संत मंडळीस आरती ओंवाळून हा चरित्र भाग पूर्ण करितों.

# राघवदासकृत गुरुपरंपरेची आरति.



आरति संप्रदायी, गुरुपरंपरेसीं । नवविध भक्तिभावें । ओंवाळीन मी त्यांसी ॥ ध्रु० ॥ सप्रेमताट मोठें निजकरीं घेऊनी । आरत आरती हे तयामाजीं ठेवूनि । ब्रह्मांडसहित पिंड, स्वयें कुरवंडोनी । निज रूप न्याहाळीन, सदा लागेन चरणीं ॥ आरति० ॥ १ ॥ श्रीगुरु आदिमूर्ति, पूर्णब्रह्म **श्रीकृष्ण** । अवतार धरुनियां, सहज गोकुळीं जाण । श्रीगीता भागवत, बोधी **उद्धवा अर्जुन** । तोचि बोध सृष्टिपूर्वीं लाहे **ब्रह्मया** पूर्ण ॥ आरति० ॥ २ ॥ ब्रह्मदेव **नारदासी,** निजगुज सांगत । चालतां बोलतांही, सहज समाधि ठात । नारद **व्यासमुनी,** पूर्ण कृपा करीत । व्यास बोध **शुकदेवा** । तेणें सहजचि मुक्त ॥ आरति० ॥ ३ ॥ मुक्त ब्रह्मनिष्ठमुखें, **परीक्षिती** आपण । तेंचि पैं भागवत, करितांचि श्रवण । लाधलें निज सुख, गेलें जन्ममरण । तेथोनी तरले जी, भक्त अपार जाण ॥ आरति० ॥ ४ ॥ जाण त्यांमाजीं आदी, **गौडपाद** संन्यासी । **गोविंदपाद** भावें, शरण अनन्य त्यासी । तत्पाद शिष्य श्रेष्ठ, मान्य ब्रह्मादिकांसी, । **शंकराचार्य** नाम, जगद्गुरु अविनाशी ॥ आरति० ॥५॥ संन्यासपद्धति हे, तेथोनियां जहाली । कलियुगीं गुप्त होती, तेही प्रगट केली । अनुक्रमें संप्रदायीं, येत येत पैं आली । **विज्ञान आश्रमासी,** गुरुरायें दिधली ॥ आरति० ॥ ६ ॥ दिधली ते मी पहा, **आनंदाश्रमाश्रमें** । आश्रमालागीं ते हो, स्वयें गृहस्थाश्रम । अनन्य शरण गेले, **लक्ष्मीधर** सप्रेमें । पावलें निज मोक्ष, बंधमोक्ष उपरम ॥ आ० ॥ ७ ॥ उपरम सर्वभावें, रमावल्लभीं झाला । ह्मणवुनि दास्यपणें, लक्ष्मीधर जोडला । नवविधा भजनपंथें, संप्रदाय स्थापिला । श्रीकृष्ण भक्तरूपें । स्वयें अवतरला ॥ आरति० ॥ ८ ॥ तरला भवसिंधु रमावल्लभ- बोधें । **अमृत राजयोगी,** त्याचें प्रेम अगाध । **नरहरिदास** तया शरण पूर्ण अभेदें । कीर्तनीं प्रीती फार, सदा हरीचा वेध ॥ आरति० ॥ ९ ॥ **श्रीगंगाधर स्वामी**लागीं जाण तत्वता । गुरु **निजानंद** मूर्ति, पदीं ठेवोनि माथा । विनयें पूसतां हो, निज गुज पूर्णता । लाधलें प्रेमसुख, काय वानूं मी आतां ॥ आरति० ॥ १० ॥ तरंग- जीवनासी, कांहीं भिन्नता नसे । आटितां नाटितांही, सत्य सुवर्ण जैसें । विश्वरूप विश्वसाक्षि, परब्रह्म हें तैसें । यापरी परंपरा, वर्णी **राघवदास** ॥ आरति० ॥ ११ ॥

---

# सगुण व निर्गुण उपासना.

इतर प्रसिद्ध साधुसंतांप्रमाणें श्रीरमावल्लभदासांचाही मार्ग सगुणावरूनच निर्गुणास जाण्याचा आहे. सगुण उपासना, सगुणमूर्तिध्यान पूजन इत्यादिक हीं कमी दर्जाचीं आणि निर्गुण हें मुख्य ध्येय व श्रेष्ठ दर्जाचें असें मानून कांहीं विद्वान लोक सगुणाची उपेक्षा करितांना दृष्टीस पडतात. परंतु हें त्यांचें करणें श्रेष्ठ ध्येयाच्या लोभाचें नसतें. निर्गुण उपासनेला इंद्रियदमन, मनोनिग्रह, एकांतवास आणि वृत्तिनिरोध इत्यादि खडतर साधनें न करितां व सगुणोपासनेचा संप्रदायपद्धति व रहस्य न समजतां सगुणोपासनेंत भजन पूजन वगैरे करणें हें त्यांना श्रमाचें वाटतें. शरीराला होणाऱ्या या श्रमाला भिऊन ते सगुणोपासनेची उपेक्षा करितात. " कायक्लेशभयात्यजेत् " असें भगवंतांनींही गीतेंत ह्मटलें आहेच.

अद्वैत सिद्धांत सिद्ध असतां देव निराळा मानून त्याची पूजा करणें, त्याला नमस्कार करणें हें निरर्थक व थोडेंसें विरुद्धही वाटतें. त्यांना शरीरपोषणाच्या इतर क्रिया ह्मणजे जेवणखाण, व्यापारटापार, नोकरीचाकरी इत्यादि यथासांग करण्यास व इंद्रियजन्य सौख्याचा यथेच्छ उपभोग घेण्यास मात्र कंटाळा येत नाहीं. व त्यांत अद्वैताची हानी वाटत नाहीं. देवाच्या भजनपूजनांत मात्र तसें वाटतें. असे ज्ञानी हे खरे ज्ञानी नसून देहाभिमानी होत. याबद्दल श्रीसमर्थांनीं दासबोधांत एके ठिकाणीं सणसणीत ह्मटलें आहे. एका शिष्यानें त्यांना असा प्रश्न केला कीं,–" सगुण नाशवंत ऐसें सांगतां । पुन्हां भजन करावें ह्मणतां । तरी कासयासाठीं आतां । भजन करूं ? ॥ ' हें ऐकून श्रीसमर्थ ह्मणतातः—

करणें लागे भोजन । करणें लागे उदकपान । मळमूत्र त्याग लक्षण । तेंही सुटेना ॥ जनाचें समाधान राखावें । आपुलें पारखें ओळखावें । आणि भजनाचि मोडावें । हें कोण ज्ञान ? ॥ ज्ञानें विवेकें मिथ्या झालें । परंतु अवघें नाहीं टाकिलें । तरि मग भजनेंचि काय केलें । सांग बापा ॥ साहेबास लोटांगणीं जावें । नीचासारिखें व्हावें । आणि देवांस न मानावें । हें कोण ज्ञान ॥ ज्ञानबळें उपासना । आह्मीं भक्त जरी मानूना । तरी या दोषाचिया पतना । पावों अभक्तपणें ॥ " दासबोध द. ६ स. ७

उपासना मार्गावर–सगुण मूर्तीची पूजा इत्यादिकांवर–कुऱ्हाड पडण्याचा रंग दिसूं लागला त्या वेळीं श्रीसमर्थांना वरील उपदेश मोठ्या कळकळीनें करावा लागला, हें सगुणोपासना कमी प्रतीची मानणाऱ्यांनीं लक्ष्यांत ठेविलें पाहिजे.

निर्गुणाचा उपदेश करणें फार सोपें आहे. परंतु त्याप्रमाणें वागणें फार कठीण आहे. बाह्य विषयांत रंगून गेलेल्या चित्ताची स्थिरता अव्यक्त अशा चैतन्यामध्यें करण्याचा अभ्यास करीत असतां किती कष्ट पडतात, हें त्या अभ्यास मार्गानें जाणारांसच माहीत. नुसतें तोंडानें बोलणारांस ते कळावयाचे नाहींत. ह्मणूनच भगवंतांनींही

ह्मटलें आहे-" क्लेशोधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् । अव्यक्ताहि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ " अव्यक्त ह्मणजे निराकार निर्गुण परब्रह्माचे ठिकाणीं चित्त स्थिर करण्यास विषयगोडी व देहाभिमान न सुटलेल्या लोकांना फार क्लेश भोगावे लागतात. कारण इंद्रियदमन व मनोनिग्रह करणें ही गोष्ट सोपी नाहीं. पण सगुण भक्ति तशी नाहीं. सगुण भक्तीच्या योगानें या सर्व गोष्टी साधकास सुकर होऊन जातात. वैराग्य त्यानें न बोलावतां येतें. ज्ञान त्याच्या घरांत शिरतें. सगुणोपासनेच्या अभ्यासानें भक्ताच्या सर्व क्रिया भगवत्पर होतात आणि त्याला स्थितप्रज्ञता प्राप्त होते. मुक्ति त्यानें मागितली नाहीं तरी ती त्याला सोडीत नाहीं. असे सगुण भक्तीचें महिमान श्री एकनाथ महाराजांनीं खालील ओंव्यांत वर्णन केलें आहे.

व्रत तप तीर्थदान । करितां योग याग यजन । वेदशास्त्रार्थ पुराण श्रवण ।
तेणें देहाभिमान ढळेना ॥ ३७२ ॥ भावें करितां माझें भजन । समूळ
तुटे देहाभिमान । भक्ति उत्तमोत्तम साधन । भक्ताधीन परब्रह्म ॥ ३७३ ॥
ज्ञान वैराग्य निवृत्ति । धृति शांति ब्रह्मस्थिति । यांची जननी माझी भक्ति ।
जाण निश्चितीं उद्धवा ॥ ३७४ ॥ चहूं मुक्तींहून वरती । उल्हासें नांदे
माझी भक्ति । माझे भक्तीची अनिवार शक्ति । तिशीं निश्चितीं आकळलों
॥ ३७५ ॥ माझें स्वरुप अनंत अपार । तो मी भक्तीनें आकळलों साचार ।
यालागीं निजभक्तांचें द्वार । मी निरंतर सेवितसें ॥ ३७६ ॥ भक्तीनें
आकळलों जाण । यालागीं मी भक्ताधीन ॥ माझीये भक्तांचें महिमान ।
मजही संपूर्ण कळेना ॥ ३७७ ॥

सगुणोपासकांच्या **ध्येय** ( धातुकाष्ट पाषाणादिकांनीं रचलेली **बाह्यदृश्य** ) **मूर्तीत** सर्वगत चैतन्य जसें ओतप्रोत भरून असतें तसेंच शाब्दिक निर्गुणोपासकांच्या मानस धातूनें रचलेल्या **अंतर्दृश्य शब्दमय मूर्तींत** तेंच सर्वगत चैतन्य व्यापून असतां **धातुमय मूर्तींवर** द्वेष उपेक्षा आणि **शब्दमय मूर्तींवर** प्रीती कशाला असावी ? याप्रमाणें रागद्वेषानें कलुषित होऊन विकार पावलेल्या चित्तानें सूक्ष्मात् सूक्ष्मतम, निराकार, निर्विकार, गुणातीत व अतींद्रिय सच्चिदानंद स्वरूपाचें चिंतन कसें करितां येईल ?

जीवाला ईश्वरानें **दत्त स्वातंत्र्य** ( Will Power इच्छाशक्ति ) दिलें असतांना ' उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् । आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ' भ. गी. अ. ६ श्लो. ५ ' आपला आपणच उद्धार करावा, आपला घात करून घेऊं नये. आपला मित्र किंवा शत्रू आपणच होय. ' या श्रीकृष्णपरमात्म्याच्या बोधाप्रमाणें त्या स्वातंत्र्याचा उपयोग योग्य रीतीनें आपल्या उन्नतीकरितां न करून घेऊन केवळ आगामी दुःखाचें बीज व निधि अशा विषयसुखप्राप्तीकरितां तें लावल्यामुळें इंद्रिय व मनाचे आधीन ह्मणजे गुलाम होऊन गेलेल्या जीवांना इंद्रिया-

तीत निरातिशयानंद सुखाकडे प्रवृत्ति होणें घडत नाहीं. त्यासाठीं आपआपलें इष्ट दैवत रामकृष्णादि मूर्तींत—ती विश्वव्यापक सर्वांतर्यामी सर्वसाक्षि—अशी भावना करून दृष्टि व वृत्ति स्थिरावली असतां चित्तांतील मलत्रय दोष ( स्थूल सूक्ष्म, व कारण देहाचे ) या सुलभ साध्य उपासनेनें जाऊन निर्गुण ब्रह्मापर्यंत पोंचविणारी आहे. याप्रमाणें ही सगुण उपासना महत्फल देणारी आहे.

‘ सगुणाकरितां निर्गुण पाविजे । भक्तिविणें दुजें सार नाहीं ॥ १ ॥
सारांचें हें सार ज्ञानाचा निर्धार । पाविजे साचार भक्तियोगें ॥ २ ॥ ’

—रामदास

सर्व संतांचीं अशीं वचनें द्यावीं तितकीं थोडींच वाटतात. हल्लीं सर्व जगांत ज्यांनीं वेदांत धर्माची उज्वल ध्वजा फडकाविली ते विवेकानंद स्वामी ज्या गुरूचे शिष्य होते व ज्याला मोक्षमुल्लर प्रभृति पाश्चात्य विद्वानही पूर्ण मान देतात ते रामकृष्ण परमहंसही सगुण भक्तच होते. ते मूर्तिपूजकच होते. आज ज्या ज्ञानामुळें सर्व विश्वाला ते वंद्य झाले आहेत तें त्यांना त्यांच्या उपास्य कालीमातेकडून मिळालें होतें. ही गोष्ट सर्वश्रुतच आहे. ब्रह्म जर सर्व ठिकाणीं आहे, तर तें मूर्तींत नाहीं काय ? असें सर्व संतांनीं मूर्तिपूजानिषेधकांस उद्देशून ह्मटलें आहे. मूर्तिध्यानानें चित्तास स्थिरता प्राप्त होते. उपासकाच्या उपासनाबळानें तिच्यांत गुप्त असलेली दैवी शक्ति प्रगट होते. याबद्दलचे दाखले आपल्या या भरतभूमींत अनेक पवित्र स्थळीं आले आहेत व येत आहेत. पाषाण इत्यादि देव नव्हेत तरि पाषाणादिकांत देव आहे ही गोष्ट कोणालाही नाकबूल करितां येणार नाहीं. पंढरी, व्यंकटगिरी इत्यादि स्वयंव्यक्त स्थळें होत. साधुसंतांनीं व अधिकारी, वेदमूर्ति, द्विजश्रेष्ठांनीं स्थापन केलेल्या मूर्तींत देवाचा आविर्भाव जास्त असतो. ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम, नामदेव वगैरे महान् ज्ञानी संतवर्यांना देवांचें सर्वगतत्व ठाऊक नव्हतें, असें नाहीं. पण ते धांवून धांवून पंढरीस येत व त्या सांवळ्या विठ्ठल मूर्तीस भेटत. अशा मूर्तींचें ध्यान करीत नाहीं तो करंटा होय. इतकेंच नव्हे तर तो अभक्त असा शिक्काही समर्थांनीं त्याच्या कपाळावर मारला आहे. ते ह्मणतातः—

ध्यान धरीना तो अभक्त । ध्यान धरील तो भक्त । संसारापासुनि तो
मुक्त । भक्तांस करी ॥ त्यांचें अखंड लागतां ध्यान । कृपाळूपणें देतो
दर्शन । सर्वकाळ संभाषण । तदंशेंचि करावें ॥ उपासनेचे शेवटीं । देवा-
भक्तां अखंड भेटीं । अनुभवी जाणेल गोष्टी । प्रत्ययाची ॥

—दासबोध दशक १८,३

मूर्तिध्यानानें चित्ताचे विक्षेप नाहींसे होऊन तें धारण धरण्यास समर्थ होतें. लौकिकांतही एखादा व्याख्याता व्याख्यान देऊं लागला असतां त्याच्या मूर्तीकडे ह्मणजे चेहऱ्याकडे एकसारखी दृष्टी लाविली तरच त्याच्या हृदयांतील भाव श्रोत्यां-

च्या हृदयांत उतरतो एरवीं नाहीं. त्याचप्रमाणें बाह्य विषयांत रंगून अनेकाग्रता पावलेली वृत्ति एकाग्र होण्याला सगुण मूर्तीचें ध्यान सोपें असून अखंड ध्यान झालें ह्मणजे मलीन वृत्तीचा समूळ नाश होऊन वृत्ति शुद्धसत्त्वात्मक होते आणि भगवन्मूर्तीतील सच्चिदानंदस्वरूपाचा आविर्भाव ध्यात्याच्या हृदयांत होतो. सारांश हा कीं, दृष्टी ध्येय मूर्तीच्या ठिकाणीं जडली ह्मणजे मनाची गति कुंठित होते, त्याबरोबरच प्राणाचीही गति रुद्ध होऊन वृत्तीचा लय होतो, आणि ध्यात्याचे हृदयांत सच्चिदानंद स्वरूपाचा अनुभव येतो. हेंच सगुणावरून निर्गुणाचा अनुभव घेणें होय.

चित्ताचें स्थैर्य होऊन दृढ अपरोक्ष ज्ञान होण्याला मूर्तिपूजेचें ( सगुणोपासनेचें ) सहाय्य झालें नसतें तर वैदिक कालीन नारदसनकादिक ऋषी, पौराणिक कालांतले शुक, प्रल्हाद, भीष्म, बिभीषण, हनुमंत, उद्धवादि भक्त व अर्वाचिन कालचे निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर,जनार्दनस्वामी, एकनाथ, तुकाराम, रामदास, पुरंदरदास इत्यादि भगवद्भक्तांपासून अगदीं अलीकडील रामकृष्ण परमहंस, श्रीसिद्धारूढ व गोंदवलेकरमहाराजादिकांपर्यंतच्या यच्चयावत् सत्पुरुषांनीं तिचें इतकें स्तोम माजविलें नसतें आणि प्रत्येक साधूचा संप्रदाय आजपर्यंत अव्याहत चालत आला नसता. प्रस्तुतच्या पुस्तकांत या सगुणोपासनेचे प्रेमोद्रेककारक उद्गार किती ओतप्रोत भरून राहिले आहेत व त्यांचा अंतःकरणपटलावर किती परिणामकारक ठसा उमटण्यासारखा आहे, हें मननपूर्वक अवलोकनानें भक्तांच्या प्रत्ययास येईल. मासल्यासाठीं पुढें फक्त एक आरति दिली आहे.

" ऐकोनि कृष्णकीर्ती, मन तेथें वेधलें । सगुणरूप माये, माझ्या जीवीं बैसलें । तें मज आवडतें, अनुमान न बोले । पहावया रूप याचें, उतावळ हो झालें ॥ १ ॥ यालागिं आरति हो, कृष्णा पाहीं वो सखी । आणिक नावडे हो, दुजें तिहीं लोकीं ॥ ध्रु० ॥ पाऊल कृष्णजीचें, माझ्या जीवीं बैसलें । सनकादिक पहा. महा आसक्त झाले । मुक्त जो शुकमुनीं, तेणें मनीं धरिलें । तें मी केवीं सोडूं, मज बहू रुचलें ॥ २ ॥ निर्गुण गोष्टी माये, मज नावडे साच । सगुण बोल कांहीं, केव्हां आठवीं वाचें । पायां लागेन तुझ्या, हेंचि आर्त मनीचें । तेणें घडेल दास्य, रमावल्लभाचें॥३॥ "

श्रीरमावल्लभदासांनीं घालून दिलेला श्रीकृष्णोपासना-संप्रदाय हा किती उत्तम, किती आनंदकारक व किती सामर्थ्यवंत आहे हें ह्या पुस्तकांतील प्रबंधरचना जो विचारपूर्वक अवलोकन करील त्यास समजून येणार आहे तथापि अशी अवलोकनशक्ति सर्वांसच सारखी असते असें नाहीं याकरितां सज्जनाच्या अथवा जिज्ञासूच्या अवलोकन शक्तीस थोडेसें साहाय्य करावें या हेतूनें त्या प्रबंधाचें यथामति व थोडक्यांत पर्यालोचन करण्याचें योजिलें आहे.

**प्रकरण १ लें:**—' प्रातःस्मरणा ' चें आहे. हें प्रकरण अरुणोदयापूर्वीं उठून हातपाय धुऊन उपास्य मूर्तीसमोर बसून ह्मणावयाचें असतें. प्रबंध १ ला हा भूपा-

ळीचा असून त्यांत देवाला निद्रेंतून उठण्याविषयीं प्रेमानें बाहिलेलें आहे. २ ऱ्या प्रबंधांत देव उठले असें मानून त्यांची मुखप्रक्षालनादि सेवा करून ३ ऱ्या प्रबंधानें त्यांला प्रातःकाळचा खाऊ दिला आहे व तांबुल वगैरे समर्पण करून ४ थ्या व ५ व्या प्रबंधानें कांकडआरति ओंवाळिली आहे. या पांचव्या प्रबंधांत शुका-सारख्या नित्यमुक्तानें ज्याला जीवीं धरिलें तें कृष्णजीचें पाऊल मी कसें सोडूं असें म्हटलें आहे. हें म्हणणें फारच प्रेमोद्रेकाचें आहे. ६ पासून १३ प्रबंधांपर्यंत गौळ्यांचें भाग्य, गोकुळाची धन्यता व कृष्णरूपाचें व त्याच्या अलंकारांचें वर्णन आहे. प्र० १४ कृष्ण-जन्मपवाडा १ ला यांत मत्स्यकूर्मादि अवतारांचा उल्लेख करून श्रीकृष्णज-न्माची कथा सांगण्यास आरंभ केला आहे. प्र० १५ व १६ यांत कंसवधापर्यंत हकी-कत देऊन १७ व १८ या प्रबंधांत कृष्णाचा गृहस्थाश्रम व भागवत एकादशस्कंधांतील निमिजायंत संवादाचें म्हणजे भागवतधर्माचें सार आणलें आहे. ( यांतील १६ व्या प्रबंधांत मूर्तिध्यान वर्णिलें असून साधकाच्या खुणा सांगितल्या आहेत. त्या साधकां-नींच हुडकून काढाव्यात. ) ह्या चारी प्रबंधांचीं कडवीं १०८ असून भागवतधर्मी-यांनीं नित्य प्रातःकाळीं हीं १०८ मण्यांची माळ जपण्यासारखी आहे. प्र० १९ यांत अनेक संतांचीं नांवें घेऊन त्यांचें स्तवन केलें आहे. प्र० २० व्यांत हरिभक्ति नाहीं तर हा देह मरो असे उद्गार काढून ध्रुवप्रल्हादादि संतांची धन्यता वर्णन केली आहे.

**प्रकरण २ रें**—' नित्यनियम '—हें नित्य सायंकाळीं म्हणावयाचें असतें. यांत प्रथम कांहीं मंगलाचरण श्लोक देऊन २१ व २२ या प्रबंधांत गणेश सरस्वतीची स्तुति आहे. प्र० २३ ह्यांत नारायणाची स्तुति असून संध्येंतील केशवादि चोवीस नामांचा स्तवनयुक्त उच्चार आहे. प्र० २४ यांत शिवाचें व विष्णूचें मिळून स्तवन केलें आहे. प्र० २५ हें पद केशवादि चोवीस नामांच्या अर्थाचें आहे. प्र० २६ यांत भागव-तांतर्गत भगवंताच्या २४ अवतारांचें वर्णन आहे. प्र० २७ यांत श्रीकृष्णाचें मस्तकापासून पायांपर्यंत रूपवर्णन केलें असून प्र० २८ यांत श्रीकृष्णस्वरूप व अवताराचें महत्व वर्णन केलें आहे. प्र० २९ यांत ' गुरुविण गति नाहीं, परमात्मा गुरुसंत एक ' इत्यादि उद्गार वर्णिले आहेत. प्र० ३० यांत रामाचें व कृष्णाचें जोडीनें वर्णन आहे. प्र० ३१ यांत सर्व इंद्रियांच्या व मनबुद्धीच्या द्वारें भगवत्सेवा घडो असें मागणें मागितलें आहे. प्र० ३२ हें पद रमावल्लभदासांचें सद्गुरु लक्ष्मीधरदास यांचें असून त्यांत विठ्ठलाला आळ-विलें आहे. फारच प्रेमळ आहे. प्र० ३३, ३४, ३५, ३६ हे विठ्ठलाच्या स्तुतीचे आहेत. प्र० ३७ यांत ' देहबुद्धि तोडीं रे । आत्मबुद्धि जोडीं रे ' अशी श्रीकृष्णाची प्रार्थना असून प्र० ३८ यांत अनन्यभावाची प्रार्थना अत्यंत करुणापर व सगुणनिर्गुण-परही आहे. प्र० ३९ हें संस्कृत पद असून त्यांत मनास भक्तीचा बोध केला आहे. प्र० ४०,४१ यांत ' हरि होऊनि हरिगुण गावे ' हा उच्च पायरीचा ह्य० शिवो भूत्वा शिवं यजेत्० ' असा ज्ञानोत्तर भक्तीचा बोध आहे प्र० ४२ यांत मागील

प्रबंधगायनाचें फळ म्ह० भगवत्प्राप्ति झाल्याचे उद्गार आहेत. प्रत्येक प्रबंधाच्या आरंभी प्रबंधांतील भावार्थ दर्शविणारे संस्कृत प्राकृत श्लोक आहेत तेही महत्वाचे आहेत.

" **नित्यनेम** दृढ चित्तीं । तेणें शुद्ध चित्तवृत्ति । होवोनि भगवंतीं । मार्ग फुटे ॥ **नित्यनेमें** भ्रांति फिटे । **नित्यनेमें** संदेह तुटे । **नित्यनेमें** लगटे । समाधान अंगीं ॥ **नित्यनेमें** अंतरशुद्ध । **नित्यनेमें** वाढे बोध । **नित्यनेमें** बहु खेद । प्रपंचीं तुटती ॥ **नित्यनेमें** सत्व चढे । **नित्यनेमें** शांति वाढे । **नित्यनेमें** थारा मोडे । देहबुद्धीचा ॥ **नित्यनेमें दृढभाव । नित्यनेमें भेटे देव । नित्यनेमें पुसे ठाव । अविद्येचा ॥** "

—( रामदास )

याप्रमाणें ' नित्यनेमा ' चें माहात्म्य आहे. भक्तजनांनीं असा नित्यनेम धरून भुक्तिमुक्तीच्या वरदानास पात्र व्हावें.

**प्रकरण ३ रें—वारनियम.** ह्या प्रकरणांत ७ वारांचीं निरनिराळीं भजनें आहेत. सोमवार नियमांत प्र० ५२ यामध्यें ' उमावल्लभदास हा रमावल्लभदासांना ' सुलभ आहे असें ह्मटलें आहे. यावरून उमावल्लभदास यांच्या भेटीची ( प्रस्तावना पृ. ८ पहा ) सत्यता दृढ होते. मंगळवार नियमांतील प्र० ५४,५५, ५६,५७ हे किती गोड व साधकसिद्धांना आल्हाददायक आहेत हें तसे असतील तेच जाणूं शकतील. बुधवार नियमांतील ६० व्या प्रबंधांत नमस्काराचें रहस्य सांगितलें असून प्र० ६१, ६२, ६३ यांत श्रीकृष्णाचें सगुण व निर्गुण स्वरूपाचें रहस्य वर्णिलें आहे. प्र० ६४ यांत प्रेम व भक्तीचें लक्षण ' हरि सर्वभूतीं सम । अरिमित्रीं नाहीं विषम । ' असें सांगितलें असून तें अंगीं बाणल्यामुळें प्र० ६५ यांत देव दिसला—' श्याम सुंदर वर पाहिला ' असें ह्मटलें आहे. प्र० ६६ यांत देहावरील रूपक फारच उत्कृष्ट असून, आसुरी संपत्तीचा नाश होऊन दैवी संपत्तीचा उदय अंतःकरणांत झाला पाहिजे; ' पूर्ण बोध कृष्ण ' स्वलीलेनें हृदयमंदिरांत राहण्यास येतो; व भक्तांच्या इच्छेप्रमाणें ' सगुण निर्गुण होऊनी अंतरीं ' राहतो असें वर्णिलें आहे. यांतच पुढें सगुण स्वरूपाचें वर्णन मस्तकापासून पायापर्यंत करून हें ' सांवळ्याचें रूप ( जो ) विवरीं ( हृदयाकाशांत ) न्याहाळी ( पाहतो ), ( त्याला ) हा देखणा चराचरीं दिसे ' असें सांगितलें आहे, असें झालें ह्मणजे विस्मयाला विस्मय होतो, अनुभवांत अनुभव मुरून जातो व अशी दशा प्राप्त झाल्यानेंच ' रमावल्लभाचें दास्य संपूर्ण होत असे ' असें म्हटलें आहे. यांत **सगुणभक्तीनें निर्गुण प्राप्तीचा अनुभव** सांगितलेला मननीय आहे. प्र० ६७ ह्या **गुरुस्तवनाष्टकांत** ' तत्त्वमसि ' महावाक्याचा बोधच भरलेला आहे. प्र० ६८ **तारकाष्टक** यांत ॐकार बीज घेऊन आपण तद्रूप होऊन सद्गुरुरूप **कृष्णाचें** नाम गाऊं असें म्हटलें आहे. प्र० ६९— वनमाल्यष्टक यांत ' वनमाळी ' हा गोड शब्द प्रत्येक चरणांत आणलेला आहे. प्र० ७० हें पद रमावल्लभदासाचे **गुरु लक्ष्मी-**

धरदास यांचें सगुण प्रेमरसानें ओथंबलेलें आहे. यांत सगुण मूर्तीचें पायापासून मस्तकापर्यंत प्रत्येक अवयवाचें वर्णन उपमा अलंकारानें केलें असून हास्यवदनाचें ध्यान केलें असतां '**मीतूंपण' गळून जातें,** '**समाधीचें सुख फिकें पडतें**' '**पाहतां पाहतां शेखीं**' (शेवटीं) पाहणाराच '**पाहणें**' होऊन जातो, '**आपुला आपण द्रष्टा**' होतो. यावर **बोलणें खुंटलें, मौन तुटलें, परी मी न सोडी चरण** असें ह्मटलें आहे. या पदाची धाटीही साधी पण फारच कर्णमधुर आहे. याच धाटीवर रमावल्लभदासांनीं ७१ वा प्रबंध '**सगुणरूप हें पाहतां, ध्यानीं बैसतां। दोन्ही एकचि झालें ॥ द्वैत तेथें कैचें बाई गे, बोलूं नये गे। ऐसें गुरूनें केलें ॥** असें ह्मणून वरील गुरुमहाराजांच्या पदाची फलश्रुतिच आपल्या 'अभिनव अनुभवानें' सांगितली आहे. यापुढील गुरुवार नियम तर गुरुभक्तीचा कळसच आहे. तो मोक्षमार्गावरील उज्ज्वल दीप आहे किंवा निर्गुण सायुज्य मुक्तीचें चतुर्दश खणी मंदिरच तें आहे. या गुरुवार नियमांत एकंदर १४ प्रबंध असून ते एकापेक्षां एक सरस आहेत. गुरूचीं लक्षणें वर्णन करून स्वतःला श्रीलक्ष्मीधरदास गुरु भेटल्या-बद्दल धन्यतेचे उद्गार रमावल्लभदासांनीं काढले आहेत. यांत सवाई सार-ख्या १२ श्लोकांचें अष्टक असून प्रत्येक श्लोकाखालीं गुरुभक्तीचीं व वेदान्ताचीं प्रमेयें ओंवीरूपानें ओंविलीं आहेत. सगुण निर्गुणाचा समन्वय ( प्र० ७७), गुरुवाक्यानें काळाचेंही नियमन होतें ( प्र० ७९ )- कृष्ण हा पूर्ण ब्रह्मरुप आहे हें तो गुरुरूपानें भेट देईल तेव्हांच जाणवतें ( प्र० ८०), काळ कोपला तर हरि राखतो, हरि कोपला तर गुरु रक्षण करितो ( प्र० ८१ ), पण गुरु कोपला तर त्याचें कोणी रक्षण करीत नाहीं ( प्र० ८२ ). बहुजन्मीं हरिभक्ति करावी तेव्हां गुरूची भेट होते व गुरुकृपेनें जन्म-मरणरूप संसार नाहींसा होतो ( प्र० ८३ ), 'मुक्तीचा धणी' झाल्यावरही गुरुमर्या-दा पाळिली पाहिजे आणि जो शिष्य पाळतो तो गुरुनामानें जगदुद्धार करण्यास समर्थ होतो ( प्र० ८४ ), इत्यादि सांगितलें आहे. यानंतरचा शुक्रवार नियम ह्मणजे राधा-कृष्णाच्या विमल प्रेमाचा पारिजात वृक्ष आहे. ह्या प्रेमाची चव कबीरदास, ज्ञानेश्वर एकनाथ प्रभृति उच्च कोटीचे संतच घेऊं जाणत. ह्या प्रबंधाची धाटी फारच मोहक आहे. शनिवार नियमांत श्रीकृष्णाचे करुणापर प्रार्थनेचे प्रबंध आहेत. प्र० ९२ हा श्रीकृष्ण पाठीराखा असतां कोणाचें कसलें भय आलें आहे अशा मोठ्या धैर्याचे उद्गा-राचा आहे. प्र०९३ यांत 'हरि हा एक, एकपणाविण संचला आहे. भक्ति मूळ ज्ञान फळ व वैराग्य फूल' आहे. 'सद्गुरुचरणाला' जो सर्वस्वी 'शरण' होतो, 'त्याचें मन उन्मन' होतें वगैरे निर्वाणीचे उद्गार आहेत.

**प्रकरण ४ थें**— भक्ति—यांतील प्र० ९५ हा श्रीएकनाथमहाराजांचा असून, ९६ हा श्रीलक्ष्मीधरदासांचा आहे. ह्या दोन्ही प्रबंधांत नवविधा-भक्तीचे इतिहासाच्या दाखल्यासहित सुरस रीतीनें वर्णन केलें आहे. योग्यतेप्रमाणें भक्तीचे नऊ प्रकार झाले तरी 'अवघिया एकचि प्राप्ति;' त्याचप्रमाणें भक्तीची

अखंडता झाली ह्मणजे ' मुक्तीचीही भ्रांति फिटे ' असें एकाजनार्दन ह्मणतात. धरदासही आपल्या प्रबंधांत श्रीविठ्ठलमूर्तीचें स्तवन करून या नवविधाभक्त एकही घडली तरी ' सकळिकांचें फळ । एकचि सफळ ' असें सांगतात.

**प्रकरण ५ वें**–ध्यानोपासना, गोंधळ वगैरे–यांतील प्रबंध ९७ ' सद्गुरु सुंदरे ' यांत सद्गुरूची निर्गुण चिंतनपर स्तुति केली असून प्र० ९८ यांत सगुण चिंतनपर स्तुति केली आहे. या दोन्ही प्रबंधांतील सद्गुरूचीं संबोधनें अथवा विशेषणें गोड आहेत. हे दोन्ही प्रबंध ध्यानोपासनेचे असून तसें ध्यान अंतरीं केल्यानंतर मूर्ति सन्मुख प्रगट झाली; मग ' त्या सुखास पार कैंचा ' असें ह्मणून ती मूर्ति जशी दिसली तसें तिचें वर्णन ९९ व्या प्रबंधांत केलें आहे. ( यांत मूर्तीचें वर्णन मस्तकाकडून उतरत पायापर्यंत केलें आहे. ) प्र० १०० यांत सद्गुरूच्या अव्यक्त स्वरूपाचें वर्णन केलें आहे. **गुरुयात्रा**––यांतील ( पृष्ठ ८० ) ' सूचनेंत ' गुरुयात्रेच्या संप्रदायाचें रहस्य अशा कांहीं उत्तम रीतीनें सांगितलें आहे कीं, सत्साधकास तें वाचून आनंदाच्या गुदगुल्याच होतील. पुढील चार पांच प्रबंधांत सद्गुरूची स्तुति व प्रार्थना केलेली आहे. **संतपूजा** यामधील प्र० १०८ यांत संतसेवेचें महत्व अथवा दीक्षा दाखविली असून त्यांत ज्ञानोत्तर भक्तीचें रहस्य अथवा रहाणी दर्शविली आहे. ( उत्सव दिवसांत ह्या प्रबंधाच्या वेळीं संत मंडळी एकमेकांच्या पायीं लागत असलेली पाहून सात्विक आनंदाचें भरतें येऊन अष्टभाव दाटून येतात. ) या प्रबंधांत ' निवांत मद्रूपीं, हेंचि हें सेवन । लौकिक पूजन मिथ्या मज ' हें अति उच्च कोटीच्या भक्ताचें लक्षण सांगितलें आहे. प्र० १०९ यांत रमावल्लभदासांनीं आपलें पूर्ववृत्त ह्म० आत्मचरित्र आपल्या मुखानें सांगितलें असल्यामुळें हा फार महत्वाचा आहे. प्र० ११० हा आत्मतृप्तीचा ढेंकर आहे. **लोटांगण** प्र० १११ यांत संतपदरजाचा महिमा वर्णन केला आहे. प्र० ११२ व ११३ यांत गोंधळाचीं पदें मोठीं गोड आहेत. प्र० ११४ ' गुरु कृपा अंबे जय जगदंबे ' यांत गुरुकृपारूप देवतेला ' अंबे ' असें संबोधून तिची स्तुति केली आहे, ती फारच प्रेमळ आहे.

**प्रकरण ६ वें**–पूजोपचार आरत्या वगैरे––यांतील प्रबंध प्रकरणाच्या नांवाप्रमाणें धूप, दीप, नैवेद्य, आरती वगैरे संबंधाचे आहेत. याच प्रकरणांत ' **वारांच्या आरत्या** ' ह्मणून निराळ्या आहेत. पैकीं प्र० १३१ मधील आरतींत मस्तकाकडून खालीं पायापर्यंत व प्र० १३२ मधील आरतींत पायाकडून मस्तकापर्यंत भगवन्मूर्तीचें वर्णन मोठें रसाळ आहे. **मंत्रपुष्प** प्र० १३३ हें सामान्य ह्म० नित्याचें असून ' बुधवार मंत्रपुष्प ' ह्मणून निराळें ( प्र० १३४ ) गुरुस्तवनाष्टकाचें घातलेलें आहे. ( हें अष्टक गुरुवारच्या नियमांत अर्थविवरणासहित आलेलें आहे. )

प्रकरण ७ वें-दोलोत्सव ( प्र० १३५-१३९ ) यांतील प्रबंध दोलोत्सवास योग्य असे आहेत. ( मूर्ति डोलाऱ्यांत अथवा मखरांत बसवून हे प्रबंध गाऊं लागले ह्मणजे उत्सवानंदाचा कळस होतो. )

प्रकरण ८ वें-महामंगळारति अथवा परडी आरति-( प्र० १४०-१५१ ) यांत विडा, आरत्या-महागोंधळ आरत्या, अष्टावधानसेवा असे पोटभाग असून प्रबंध, पदें व संस्कृत श्लोक गोड आहेत.

प्रकरण ९ वें-उपसंहार यांतील प्र० १५३ यांत हरिनामाचें महत्व वर्णन केलें असून प्र० १५४ यांत सर्व कर्म ब्रह्मार्पण करण्याची उच्च भक्ति वर्णन केली आहे, अशी अखंड वृत्ति बाणणें हेंच अंतिम भक्तिलक्षण आहे. प्र० १५५ यांत कृष्णनामजपाचें महत्व सांगितलें असून प्र० १५६ यांत ' विश्व पाळीतसे हरिदासां केवीं तो अव्हेरी ' या अभंगानें कोमल भगवद्भक्तांना मोठा धीर दिला आहे. प्र० १५७ यांत ' कायेन वाचा ' या प्रसिद्ध भागवत श्लोकाचें ह्म० भागवत धर्माचें निरुपण केलें आहे. पुढें रुक्मिणी सत्यभामेच्या पायघडीचे प्रबंध आहेत. यांत भगवान सभेंतून शयनमंदिरांत चालले, त्या प्रसंगाचें वर्णन मोठें सुरस आहे. यांतच पुढें ' भाटी व चामरें, शेजारति विड्या व शयन ' या संबंधाचीं पदें आहेत. त्यानंतर ' राधेची पायघडी ' यांतील शेजारति प्र० १६९ ह्यांत राधेच्या प्रेमाचें वर्णन मनास तल्लीन करून सोडतें. प्र० १७२-१७३ हे प्रसादाच्या पदाचे आहेत.

प्रकरण १० वें-श्रीकृष्णजन्मकथा-यांतील प्र० १७४ डफगाणें यांत राक्षसांच्या छळानें त्रस्त झालेले देव, ऋषी, भूदेवी वगैरे सर्वांच्या भगवत्प्रार्थनेपासून तों भगवंतांनीं मथुरेंत वसुदेवदेवकीच्या पोटीं अवतार घेतला, येथ-पर्यंतचा कथाभाग आहे. प्र० १७५ यांत अजन्म्यानें जन्म घेतल्यानंतर त्याच्या त्या अवतार रूपड्याचें सालंकार वर्णन आहे. प्र० १७६ ' वसुदेवप्रार्थना ' व प्र० १७७ ' देवकीप्रार्थना ' आहे ह्या दोन्हीही प्रार्थना फार प्रेमळ आहेत. प्र. १७८ यांत वसुदेव कृष्णमूर्तीला घेऊन गोकुळास जात आहे त्या वेळचें सुरस वर्णन आहे. प्र० १७९ कृष्णा-ची आरती व प्र० १८० हें ' बाळंतविड्या ' चें पद्य आहे. या पद्यांत गोपींचा थाट वर्णिला आहे, तो फार मनोवेधक आहे. प्र० १८१ हें ' पूतनाशोषण ' पद्य असून प्र० १८२ यांत गवळणींनीं कृष्णाची दृष्ट काढून त्यास भस्म मंत्रून लावण्याचें सांगितलें आहे. हें पद भागवत दशमस्कंधांतील ' बालरक्षा ' प्रकरणास अनुसरून केलें असून या प्रबंधानें विभूति अभिमंत्रण करून बालकास लाविली असतां भूतबाधा ग्रहबाधा वगैरे सर्व नाहींशा होतील. " धरा धरा विश्वास । विकल्प धरी त्यास दोष । कृष्ण साह्य आहे यास । रक्षा फळे भाविकास " असें रमावल्लभदासांनीं आपल्या अधिकारसत्तेनें सांगि-तलें आहे. प्र० १८३ यांत श्रीकृष्ण जन्मास आल्यानंतर देवाचा कारागीर ' विश्व-कर्मा ' याणें सुंदर पाळणा करून आणल्याचें वर्णन आहे. प्र० १८४ ' पाळणा ' व प्र०

१८५ ' हळरगीत ' असून हळरगीतांत पंच कर्मेंद्रियें व पंच ज्ञानेंद्रियें एतद्रूप गायींनीं आपापला विषयरूपी चारा घेऊन माझ्या कृष्णाला त्या दूध देवोत, या १० गायींहून ११ वी मानस गाय ( मन ) श्रीकृष्ण परमात्म्याला फार आवडते, असें रूपकात्मक वर्णन आहे.

प्रकरण ११ वें—बाळसंतोष ( प्र. १८६–१८९ )—यांत ' बाळसंतोष ' भिक्षेकऱ्यांचीं वेदान्तरूपकपर ४ पदें आहेत. पैकीं शेवटच्या पदांत ( प्र. १८९ ) पंचकोशांचा अनुवाद केला आहे.

प्रकरण १२ वें—अवभृतस्नान व गोपाळकाला ( प्र. १९०-२०७ )—यांतील प्र. १९० हें प्रेमळ पद कृष्णदासाचें असून यांत निर्गुणसगुणस्वरूपाचें वर्णन आणि गोपाळकाल्याचा सारांश आहे. पुढील प्रबंध श्रीकृष्ण गोपाळगड्यांसमवेत वनांत वनक्रीडा करण्यास गेलेल्या वर्णनाचे आहेत. कांहीं प्रबंध चेंडू, भोंवरा, बिजली, हुतूतू, बावडी, व लपंडाई, या खेळांचे वेदान्तरूपकात्मक आहेत. प्र. २०१ यांत संवगडे व श्रीकृष्ण यांचीं वेदान्तपर प्रश्नोत्तरें आहेत तीं गमतीचीं आहेत. प्र. २०२ पासून २०५ पर्यंत काल्यांतील शिदोऱ्यांचें व खेळांचें वर्णन आहे. यांत प्रबंधास कथाभाग जोडणाऱ्या मध्यें मध्यें श्रीएकनाथमहाराजांच्या व रमावल्लभदासांच्या ओंव्या आहेत. प्र. २०६ हें ' वासुदेवा'चें पद वासुदेवमूर्ति वृंदावनांतून गोकुळास ज्या थाटानें आली त्या थाटाच्या वर्णनाचें फारच सुरस असून कोमलांतःकरणी भक्तांच्या हृदयाला प्रेमाचे पाझर आणणारें आहे. प्र. २०७ ह्या पदांत श्रीकृष्ण वनांतून घरीं आल्यानंतर गोपींनीं त्याची पूजा, नैवेद्य आरति वगैरे केल्याचें वर्णन आहे.

याप्रमाणें रमावल्लभदासकृत श्रीकृष्णजयन्तीव्रतकथेचें पुस्तक येथें संपूर्ण होतें. त्यानंतर—

प्रकरण १३ वें—रासक्रीडामहोत्सव हें प्रकरण नवीन जोडलें आहे. रासक्रीडेचा गूढ अर्थ त्या प्रस्तावनेंत संक्षेपतः दिला आहे, तो महत्वाचा असल्यामुळें वाचकांनीं लक्ष्य दिलें पाहिजे. यांत पांच पदें आहेत. खऱ्या मुमुक्षूंनीं आणि सत्साधकांनीं सद्गुरूकडून तीं समजून घेऊन अनुभवांत आणण्यासारख्या खुणा यांत आहेत. ग्राहक त्यांचा स्वीकार करोत.

या पुस्तकांतील १३ व्या प्रकरणापर्यंत कांहीं मुख्य मुख्य प्रबंधांतील रहस्यार्थ वाचकांना अभिमुख करण्याकरितां अनुक्रमणिकेच्या ऐवजीं दाखविला आहे. हे सर्व प्रबंध अतिरसभरित असून ज्यास अर्थबोध नाहीं अशा मनुष्यांस व लहान अर्भकांसही कळण्यास सुलभ, अतिरम्य व मनोहर आहेत. श्रीरमावल्लभदासांनीं " श्रीकृष्णजयंतीकथा " या नांवानें उपासनामार्ग स्थापन करून ईश्वराची प्राप्ति त्याचे कृपेनें कशी सुलभ होते हें दाखविलें आहे. ही कथा ज्ञान्यांला आनंद देणारी, योगाभ्यासीयांना चित्तस्थैर्य देणारी, भोळे भाविक यांना हरिप्रेम उत्पन्न

करणारी व संसारी मूढ जनांस श्रवणेच्छा उत्पन्न करून आल्हाद देणारी आहे. एकदां ही कथा श्रवण केल्यानें अथवा वाचल्यानें तत्काळ अंतःकरण सद्गदित होतें. या कथेचा ठसा मुलांचे मनावर उमटून तिचें अनुकरण खेळांतही दिसून येतें. स्त्रिया गृहकृत्यांत निमग्न असल्या तरी या कथेचे प्रबंध त्यांचे मुखावाटें निघतात; जे केवळ भक्तिमार्गनिंदक व पाखांडी आहेत, त्यांचें मुखांतून एखादे वेळीं तरी या प्रबंधांचे उद्गार निघाल्यावांचून रहात नाहींत. आणि जे या कथेचें रहस्य समजून हे प्रबंध वाचतील, त्यांचेपुढें प्रत्यक्ष श्रीकृष्णाची मूर्ति नाचतच आहे, असें वाटेल. पंचज्ञानेंद्रियें व चित्त असा षट्पदी ( सहा पायांचा ) चित्तरूप भ्रमर ( भाविकजन ) कृष्णनामरूप कमलावर निरंतर चिकटून बसून ( अखंड कृष्णनामस्मरणानें ) त्यांत अभेदरूपानें असणाऱ्या परम प्रेमरूप मकरंद यथेच्छ पान करून तद्रूप होवोत, अशी विश्वंभर श्रीहरीला प्रार्थना करून हें पर्या-लोचन पुरें करितों.

---

## श्रीकृष्णजयन्ती--व्रत करण्याचीं स्थळें.



### सांप्रत हें श्रीकृष्णजयन्तीव्रत रमावल्लभदासांच्या सांप्रदायानुसार ज्या ज्या ठिकाणीं चालू आहे, त्या त्या ठिकाणची संक्षिप्त माहिती.–

( १ ) **आवडीमठ**–उत्तर कानडा जि० कुमठा ता० मल्लापूर या गांवीं. ( हें गांव कुमठ्याहून चार मैल अंतरावर आहे. )

( २ ) **राघव गोसावीमठ**–( आतां यास ' हरिदासमठ ' असें ह्मणतात. ) उत्तर कानडा जि०, होन्नावर ता० शिराली या गांवीं. येथें राघवदास व नरहरि यांच्या समाधी आहेत.

( ३ ) **जोगनाणीमठ**–दक्षिण कानडा जि०, कुंदापूर ता०, हेम्माडी या गांवीं ( हें गांव कुंदापुराहून ४ मैलांतर चक्र नदीच्या कांठीं आहे. )

( ४ ) **गोसावीमठ**–कुंदापुराहून ५ मैलांच्या अंतरावर वाराही, कुब्जा व शुक्र नदी ह्या तीन लहान नद्यांचा संगम होऊन पुढें जिला 'शरावती' असें नांव पडलें, तिच्या कांठीं असलेल्या हट्टंगडी नांवाच्या गांवीं आहे. ह्या मठांत ' शंकर नारायण ' देवस्थान असून येथें एक समाधि आहे. ह्या मठाजवळच राघवदासाचे मित्र मनवार्ती अनंतय्या यानें बांधिलेल्या गोपाळकृष्ण देवस्थानांत दोन समाधी आहेत. ह्या तिन्ही समाधी रमावल्लभदासांच्या शिष्यपरंपरेपैकीं असून, त्यांतील गोसावी मठांत असलेली समाधि

'गंगाध दास' यांची असावी असें वाटतें. कारण तेथील कृष्णजयन्तीव्रत करणारे हट्यंगडीकर यांच्या ( हल्लीं शिवमोगा येथें असलेले सुप्रसिद्ध व लोकप्रिय ॲडव्होकेट श्रीयुत ह. गु. भ. प. के. एच. शंकर नारायणराव एम्. ए. बी. एल्. यांच्या ) घराण्यांत वडील मुलांस 'गंगाधर' हें नांव ठेवण्याची चाल वंशपरंपरा चालू आहे.

[ वरील चार मठांतील उत्सव श्रीरमावल्लभदासांच्या कालापासून चालू असून पुढील ठिकाणचे उत्सव हल्लीं ह्मणजे सुमारें शेंपाऊणशें वर्षांच्या अलीकडील आहेत. ]

( ५ ) **कारवार**–येथें शांत स्वभावी श्रीयुत ह. गु. भ. प. **मारुतिराव सखाराम विणेकर** ( हल्लीं मुधोळ संस्थानचे कारभारी ) यांचे घराण्यात तीन पिढ्यांपासून चालू आहे. ( वरील श्रीयुत मारुतिराव यांचे आजे श्यामाजीपंत विणेकर हे योगी व प्रसिद्ध गवई असून त्यांची रुद्रवीणावादनपटुता व गायन पाहून तंजावरच्या राजानें यांना 'विणेकर' हा किताब व मौल्यवान वस्त्रालंकार बक्षिस दिले होते. सध्याच्या जयन्ती पुस्तकांतील प्रबंधावर रागरागिण्यांचीं नांवें घातलेलीं आहेत; तीं यांनींच. )

( ६ ) **भटकळ**–( ता. होन्नावर, जि० उत्तर कानडा ) या गांवीं श्रीगोपाळकृष्ण देवस्थानांत

( ७ ) **कुंदापूर**–( जि. दक्षिण कानडा ) येथें परम भाविक ह. गु. भ. प. श्रीयुत मनवार्ती ऊर्फ उप्राण कृष्णय्या यांचे घरीं.

( ८ ) **ब्रह्मावर**–( उडुपीक्षेत्राहून सुमारें १२ मैलांवर ) येथें कैवल्यवासी संत बी. आनंदराव यांनीं स्थापन केलेल्या विठोबाच्या मंदिरांत.

( ९ ) **मंगळूर** ( येथें चित्रापूर मठाधिकाऱ्यांनीं बांधलेल्या श्रीवेणुगोपाळ देवस्थानांत ( येथें वेणुगोपाळाची फारच सुंदर मूर्ति आहे. )

( १० ) ,, श्रीमती कार्नाड लक्ष्मीबाई यांच्या घरीं ( येथील भजनपूजन व उत्सवांतील अलंकाराचा थाट व इतर समारंभ एकंदर बायकामंडळीकडूनच मोठ्या गंभीरतेनें होत असतो. )

( ११ ) **पुत्तूर**–( जि. कानडा ) येथें श्रीवेणुगोपालाचे मंदिरांत संतवर्य बी. कृष्णराव हे परम प्रेमानें व दक्षतेनें करीत असतात. ( येथील उत्सव पार पाडण्याची तऱ्हा थोडीसी मौजेची व विचार करण्यासारखी आहे. श्रावण शु० १ दे दिवशीं गांवांतील कांहीं नियमित श्रद्धाळू लोकांच्या नांवच्या चिठ्या देवापुढें टाकून मुलाकडून काढवितात. ज्याच्या नांवची चिठी येईल, त्यानें आपलें खासगी व्यवहारिक अथवा सरकारी काम असलें तरी सोडून- तितक्या दिवसांची रजा

घेऊन दीक्षेप्रमाणें कंकणबद्ध होऊन तो उत्सव करावा, अशी चाल आहे. या योगानें एकावरच भार न पडतां उत्सवश्रेयाचा फायदा तितक्या सर्व आस्तिक मंडळींना घेतां येतो. हें एकप्रकारें चांगलें आहे. )

याप्रमाणें सर्व ठिकाणच्या उत्सवकर्त्या एकंदर मंडळींला परमेश्वर दीर्घायुष्य, भाग्य व भक्ति देऊन त्यांजकडून अप्रतिहतपणें वंशपरंपरा उत्सव चालवून घेवो व सर्वत्रांस भक्तीच्या द्वारें भुक्तिमुक्तीचा लाभ होवो, असें मी जगन्नियंत्या श्रीकृष्ण-परमात्म्यास प्रार्थितों.

---

## श्रीकृष्णजयन्ती--व्रताचरण विधि.

(१) **उत्सवांग आद्यकर्तव्य**—श्रावण शुद्ध ५ (नागपंचमी) दिवशीं सकाळीं स्नान करून नित्यकर्मांग आटोपल्यावर सर्व आप्त इष्ट मंडळीसहित श्रीकृष्ण-जयन्ती उत्सव निर्विघ्नपणें साङ्ग करून देणेबद्दल देवापुढें नारळ केळीं ठेवून प्रार्थना करावी. नंतर शेंडे असलेले चांगले ३ नारळ ( शाडूमृत्तिकेनें लेपन केलेले ) डोलाऱ्यांत ठेवून डोलाऱ्याची पूजा करावी. नंतर देवपूजा, नैवेद्य वगैरे नित्य नियमाप्रमाणें करावा. सायंकाळीं संध्या वगैरे आटोपल्यावर प्रधानमूर्ति व उत्सवमूर्ति यांना अलंकार करून प्रधानमूर्ति डोलाऱ्यांत आणून ठेवावी. उत्सवमूर्ति आंत प्रधानमूर्तिस्थानीं ठेवावी. भजन पुस्तकांतील 'नित्यनियम' 'वारनियम' संपल्यावर धूपारति दीपारति करून नैवेद्य दाखवावा. नंतर डोलाऱ्याचीं पदें ह्मणावीं. डोलाऱ्यांतील मूर्तीला मंगलारति दाखवून ती मूर्ति गाभाऱ्यांत त्या त्या पीठावर ती ती मूर्ति ठेवून मंगलारति अष्टावधान पाय-घड्या उपसंहार प्रकरण ह्मणून उत्सवाचा नित्यक्रम संपवावा. याप्रमाणें श्रावण शु॰ १५ मे पर्यंत चालवावें.

(२) **कंकणबंधन**—श्रावण वद्य १ दे दिवशीं व्रतस्थ पुरुषानें अरुणोदयापूर्वीं उठून हातपाय धुऊन प्रातःस्मरण प्रकरण ह्मणावें. नंतर शौचमुखमार्जन करून व्रत-स्थानें व अर्चकानें वपनविधि आटोपून मंगलस्नान करावें. नंतर नित्य कर्मांग झाल्यावर सर्व मंडळीनें देवापुढें नारळ केळीं ठेवून व्रतसाङ्गतेबद्दल प्रार्थना करावी. आणि पुण्या-हवाचन, मातृकापूजन, वृद्धिनांदीसमाराधना, पंचगव्यप्राशन, प्रायश्चित्तहोम वगैरे करून यज्ञोपवीत धारण करावें. आणि उभयतांनीं विधिपूर्वक कंकणबद्ध व्हावें.

(३) **घटस्थापना**—गाभाऱ्यांत कांशाचें झांकण असलेल्या पात्रांत खोब-ऱ्याचें तेल भरून तो तैलघट एका मोठया पाटावर शाळी ( भात ) पसरून त्यावर ठेवावा व त्याची षोडशोचार पूजा करावी.

**( ४ ) दिनचर्याक्रम**—पहांटे प्रातःस्मरण–उपासना साहून, स्नान संध्या वगैरे आटोपल्यावर श्रीविष्णुसहस्रनाम, भगवद्गीतापारायण इत्यादि चालीप्रमाणें करावें. दोनप्रहरीं नित्यनियमाप्रमाणें रुद्राभिषेकादिकें करून देवाची पूजा वगैरे आटोपल्यावर व्रतस्थानें व अर्चकानें फलाहार करावा. या दोघांनीं कंकणबद्ध होऊन या दीक्षेत असतांना अवभृतस्नान दिवसापर्यंत सदोदीत शुचिर्भूत राहून बाह्य लौकिक व्यवहार बंद ठेवावा. दिवसा व रात्रीं जन्माष्टमी होईपर्यंत व्रतस्थानें उपोषण करावें; ह्म• उपोषणनियमाप्रमाणें कांहीं फलाहार करावा. ज्यास उपोषण तोलत नसेल त्यानें सात्विक अन्नाचा नैवेद्य देवास अर्पून पंचमहायज्ञ करून पंक्तीला ब्राह्मण घेऊन जेवण करावें. मात्र त्यानें रात्रौ जेवण न करितां फलाहार करावा. अर्थात् एकभुक्त रहावें. ब्रह्मचर्याचा नियम राखून शास्त्रनिषिद्ध कोणतेंहि आचरण करूं नये.

सायंकाळीं रंगशिळेवर भजन मंडळीनें ' नित्यनियम ' ' वार नियम प्रबंध ' व वेळ असेल तर अलंकाराची आरति होईपर्यंत दुसरीं पदें ह्मणून भजन चालू ठेवावें. आंतल्या बाजूस अर्चकानें व व्रतस्थानें स्नानसंध्या व प्रदोष पूजा पंचामृत व रुद्राभिषेक वगैरे आटोपून पडदा उघडून अलंकाराची आरती करावी व नंतर धूपारति, दीपारति, नैवेद्य, वैश्वदेव, मंगलारति, मंत्रपुष्प वगैरे करून डोलाऱ्यांत उत्सवमूर्ति (वाराच्या नियमाप्रमाणें बदलून ) आणून ठेवावी. त्यानंतर सर्वांला तीर्थ–प्रसाद वांटून व्रतस्थानें फलाहार करावा व बाकीच्या ब्राह्मण मंडळीचें भोजन झाल्यावर व्रतस्थानें भजनमंडळीसहित रंगशिळेवर येऊन भजनपुस्तकांतील प्रकरण ४ पासून प्रकरण ५,६,७,८,९ पर्यंतचा भजनक्रम चालवून नित्यउत्सव करावा.

**( ५ ) दिवट्यांचा विधि**— प्रतिपदेस १, द्वितीयेस २, तृतीयेस ३ याप्रमाणें रोज एक एक दिवटी वाढवावी ( प्रत्येक दिवटीला रोज स्वच्छ धूतवस्त्र गुंडाळावें. ) शेवटच्या दिवशीं ९ दिवट्या पेटवाव्या. प्रतिपदे दिवशीं स्थापन केलेल्या तैलघटांतील तेल आरत्या व दिवट्या यांचे उपयोगास लावावें. जसजसें तेल कमी होईल तसतसें तेल त्या घटांत घालीत असावें. ( घट मात्र स्थानावरून उचलूं नये व पालथा करूं नये. ) शेवटच्या दिवशीं उरलेलें तेल आरत्या–दिवट्यांकडे वापरावें. नंतर घट विसर्जन करावा. व्रतस्थ माळामुद्राधिकारी याला देवाच्या समोर उभें करून तीर्थ प्रसाद अंगाला लावून तुळसीची माळा गळयांत घालावी व त्याच्या हातांत अर्चकानें दिवट्या द्याव्या व त्यानेंच दिवटीची आरति करावी.

**( ६ ) जन्मोत्सव–दिवसाचा विशेष विधि**—वद्य अष्टमी रोजीं रात्रीं नित्याप्रमाणें भजन करून प्रबंध १०० वा ह्मणून संपतांच जन्मकथा प्रकरण १० वें संपूर्ण ह्मणावें. नंतर पृष्ठ ७८ वरील भजन ' सच्चित्प्रेमानंद ' पासून पुढें प्रबंध १०१ ते पुढील प्रकरणें ६,७,८ व ९ हीं पुरीं ह्मणून जन्माष्टमीचा उत्सव संपूर्ण करावा. नैवेद्याचे वेळीं एक कडबोळ्यांची माळ समर्पण करून देवाच्या डावे बाजूस

टांगून ठेवावी. ( हरिवासर ज्या वर्षीं असेल त्या वर्षीं जन्माष्टमीचा उत्सव हरिवासराच्या दिवशींच करावा. )

**( ७ ) अष्टमीनंतरच्या दिवसांत**— नवमीदिवशीं व्रतसांगतासिद्ध्यर्थ यथाशक्ति ब्राह्मणसंतर्पण करावें. या दिवसापासून व्रतस्थानें उपोषण सोडून दिवसा एकभुक्त भोजन ( अवभृत स्नानदिवसापर्यंत ) करावें. भजन, जन्मकथा प्रकरण १० वें खेरीजकरून पूर्वींप्रमाणेंच दशमी व एकादशीपर्यंत करावें. एकादशीच्या रात्रीं अष्टावधान सेवा झाल्यावर ' बाळसंतांचीं पदें ' ( प्रकरण ११ वें ) ह्मणावीं. ( जेथें दशमीदिवशीं अवभृतस्नान करण्याची वहिवाट असेल, तेथें बाळसंतांचीं पदें अष्टमीच्या पूर्व दिवशीं ह्मणावीं. )

**( ८ ) वद्य द्वादशी**—( अथवा वद्य ९ मी दिवशीं वहिवाट असेल त्याप्रमाणें ) सायंकाळीं नित्याप्रमाणें रंगशिळेवर व्रतस्थानें व भजनमंडळीनें प्रकरण ४ पासून ५ व्या प्रकरणांतील प्रबंध १०० पर्यंत ह्मणून जन्मकथा प्रकरण १० वें संपूर्ण ह्मणावें. पुन: नित्याप्रमाणें धूप, दीप, नैवेद्य, मंगलारति वगैरे करून उपसंहार प्रकरणांतील प्रबंध १५७ ' कायेचें कर्म० ' पर्यंत ह्मणावें. नंतर त्याच प्रकरणांतील ( पायघडयाचे प्रबंध वगळून ) प्रबंध १७२–१७३ ह्मणून प्रसाद वांटावा. ( शेवटच्या दिवसाच्या उत्सवापैकीं अर्धा उत्सव द्वादशीचे रात्रीं संपतो. )

**( ९ ) अवभृतस्नानसमारंभ**—( वद्य १३ शी किंवा १० मी—आपल्या वहिवाटीप्रमाणें )—सकाळीं नित्य कर्मानुष्ठान झाल्यावर रंगशिळेवर येऊन व्रतस्थ व भजन मंडळीनें पृ. ७८ वरील " रमावल्लभापासुनि बोध झाला " या श्लोकापासून पुढें प्रबंध ११४ पर्यंत ह्मणजे पांचवें प्रकरण पुरें ह्मणावें. नंतर प्रकरण ६, ७ संपूर्ण व ८ वे प्रकरणांतील प्रबंध १४५ पर्यंत ह्मणावें. व्रतस्थानें प्रबंध १४६, १४७, १४८ ह्मणतांना नऊ दिवट्या हातांत धरून प्रबंध १४९-१५० ह्मणतांना सर्व दिवट्या ताटांत ठेवून महागोंधळ आरति करावी. नंतर सर्व दिवट्या गायींच्या दुधानें विझवून ती मळ निराळीच ठेवावी. व त्यानंतर अष्टावधान सेवा अर्पण करावी. उपसंहार प्रकरण ९ यांतील प्रबंध १५२ पासून १५७ पर्यंत ह्मणून ( त्यापैकीं या वेळीं पायघडया ह्मणूं नयेत. ) प्रसादाचीं पदें-प्रबंध १७२-१७३—ह्मणावीं. नंतर अवभृत मंगलस्नान प्रकरण १२ वें ह्मणावें. त्या वेळीं कृष्ण, बळराम व गोपाळ यांचे वेष मुलांना घालून अष्टमी दिवशीं ठेवलेली कडबोळयांची माळ व दुसरे कांहीं तरी खाद्य पदार्थ सर्व गोपालांच्या डोक्यावर उंच उडवावे. ह्मणजे सर्व गोपाळ तीं कडबोळीं वगैरे झेलण्याला उडी मारून कृष्णलीलेचे खेळ दाखवितील. हें झाल्यावर दह्यांत भिजविलेले पोह्याचे लाडू सर्व मंडळीस वांटून गोपाळाच्या मुखांत घालावे. नंतर मंगलस्नानाला देवासमवेत गांवांत जाऊन देवाबरोबर नेमलेल्या स्थळीं व त्या त्या घरीं जाऊन व तिकडे दिलेले दहींपोहे केळीं वगैरे नैवेद्य दाखवून आरति करावी; व ओकळी ( रंग ) खेळून ( तांबड्या रंगाचें पाणी

देवाच्या व इतरांच्या अंगावर उडवून ) नदीस स्नानास जावें. स्नानसमारंभ रीतीप्रमाणें आटपून वाजत गाजत देवळांत परत यावें. ( तोंपर्यंत संध्याकाळ होतो. ) नंतर नित्याप्रमाणें पूजा, धूप, दीप, नैवेद्य, मंगलारति, मंत्रपुष्प वगैरे करून उपसंहार प्रकरण संपूर्ण ह्मणून सर्वांला तीर्थप्रसाद द्यावा; व ब्राह्मणसंतर्पण करून त्या दिवशीं कृष्णजयंती-व्रत संपूर्ण करावें. वद्य १४ दिवशीं संप्रोक्षणविधि करावा; व उत्सव संपूर्ण झाल्याबद्दल अनुष्ठानास नेमलेल्या ब्राह्मणांना यथाशक्ति दक्षिणा देऊन श्रीमहाप्रसाद-दिवड्यांचा अंगारा, कृष्णरक्षेचें भस्म, फुलाचा प्रसाद आप्तइष्ट-मित्रांस वांटावा. बाहेरगांवीं अस-लेल्या आप्तमंडळीस महाप्रसादाच्या पुड्या टपालांतून पाठवाव्या.

( हा विधि मुख्यत्वें श्रीरमावल्लभदासांची पट्टशिष्यीण श्रीमती आवडीबाई इच्या मठांत मल्लापूर येथें चालू आहे. इतर ठिकाणच्या मठांत त्यांच्या त्यांच्या वहिवाटीप्र-माणें थोडाबहुत फेरफार आहे. )

## पुस्तक संशोधनाचे श्रम.

ह्या ‘ श्रीकृष्णजयन्तीव्रतकथा ’ पुस्तकाची पहिली आवृत्ति तयार करतेवेळीं संतवर्य श्री. कृष्णराव पुत्तूर यांनीं किती श्रम घेतले होते व कोणकोणत्या अड-चणी त्यावेळीं त्यांना आल्या होत्या ह्याबद्दलची माहिती मला आहे. त्यांच्या त्या छापलि पुस्तकाची मला बरीच मदत झाली यांत संशय नाहीं. तीं पुस्तकें छापून आज दीड तप होत आलें व त्यामुळें तीं दुर्मिळ होऊन गेलीं. ह्मणूनच कीं काय कोण जाणे, त्याची दुसरी आवृत्ति सुधारून छापण्याची श्रावण वद्य १ दा शके १८३४ रोजीं रात्रौ मला श्रीकृष्णप्रेरणेनें एकाएकी स्फूर्ति झाली, व दुसऱ्याच दिवशीं पुस्तक-संशो-धनाच्या कामास सुरवात केली. मजकडील प्रथमावृत्तीचें छापी पुस्तक मी दोन वर्षां-पूर्वीं, रमावल्लभदाससांप्रदायाप्रमाणें हें व्रत ज्या ज्या ठिकाणीं चालतें, त्या त्या ठिकाणीं जाऊन तेथील मूळ हस्तलिखीत पुस्तकाशीं माझ्या खासगी उपयोगाकरितां ह्मणून मीं ताडून पाहिलें होतें. पण तेवढ्यानें समाधान होईना, ह्मणून, पुरातनकाळीं उत्सव केलेल्या भक्तमंडळींनीं लिहून ठेवलेल्या जुन्या हस्तलिखित प्रति मोठ्या श्रमानें मिळ-वून ठेवल्या होत्या. त्यांचा आतां उपयोग झाला. त्यांतील मुख्य प्रति खालीं लिहिल्या प्रमाणें आहेत:—

( १ ) कार्कोळ अण्णप्पया वकील यांच्या घरची प्रत.
( २ ) योगी व भागवतोत्तम सभापर्व मंजप्पया मंगळूर यांच्या हातची प्रत.
( ३ ) सोलापूर येथील राळेरासकर ( रमावल्लभदासाचे वंशज ) यांच्या घरां-तील वही ( या वहींत कृष्णजयन्तीव्रतकथेचीं पदें फार थोडीं मिळालीं )
( ४ ) मल्लापूर येथील आमच्या आवडी-मठांतील जुन्या प्रती.
( ५ ) चित्तार मंगेशराव उभयकर.

याप्रमाणें जुन्या हस्तलिखित प्रति मिळवून माझे परम मित्र हरिगुरुभक्तिपरायण

श्रीयुत रामचंद्र कृष्ण कामत चंदगडकर यांच्या साह्यानें दोन महिने बसून बेंगळूर मुक्कामीं एक शुद्ध प्रत तयार केली. ह्या कामीं जे श्रम पडले आहेत ते एक श्रीहरिच जाणे.

पूर्वींच्या आवृत्तींत किती भयंकर अशुद्धें होतीं व तीं आतां कशीं शुद्ध झालीं आहेत, याची चांगली कल्पना दोन्ही प्रती ताडून पाहिल्यावांचून कदापि येणार नाहीं, तथापि एक दोन मासले दिले असतां ती कल्पना साधारणपणें येण्यास हरकत नाहीं, ह्मणून दिले आहेत:—

| प्रबंध १४— | पूर्वींची छापी प्रत | आतांची ही प्रत |
|---|---|---|
| (चरण १३) | ' मत्स्य, स्वरूप अपार ' ... | ... ' मत्स्य—स्वरूप अवतार. ' |
| ( च. २२ ) | ' जनन मरण । ह्याची आचरण. ' | ' जारण मारण । हेंचि आचरण. |
| ( च. २४ ) | ' तेणें स्तुस्ति केली मातु. ' ... | ' तेणें श्रुत केली मात. ' |
| ( च. ३४ ) | ' तंव शत्रु पाहे, कैसे झाले ' ... | ' तंव सूत्र पाहे कैसें झालें ' |

एका प्रबंधांतील ह्या चुका. यावरून बाकी पुस्तकांतील चुकांची नुसती कल्पनाच केली पाहिजे. असो. पुस्तकांत जी जी नवीन सुधारणा केली आहे ती केवळ माझ्या मीच केली नसून, त्याबद्दल एक लहानसी ' कमेटी ' ( सभा ) मी केली होती. ह्या सभेतील सभासद—(१) माझे प्रिय व पूज्य बंधु ( आवडीमठांतील माळामुद्राधिकारी ) ती. स्व. श्रीयुत नारायण गोपाळ उभयकर. ( २ ) ह. गु. भ. प. संत बी. कृष्णराव पुत्तूर; ( ३ ) ह. गु भ. प. रामकृष्णराव नागरकट्टी, ( ४ ) ह. गु. भ. प. माझे मित्र रा. कृ. कामत व ( ५ वा ) सर्व सज्जनांचा सेवक मी. मला अडलेली गोष्ट मी या चौघां पुढें समक्ष व पत्रद्वारें मांडून त्यांचें मत घेऊन काय करावयाचें तें केलें आहे. तरी प्रस्तुत पुस्तकाचें रूप ही त्या श्रीहरीचीच कृपा असें मी समजतों. बेंगळूर मुक्कामीं वरील माझे मित्र दोन महिने राहिले होते. त्यावेळीं त्यांना आमच्या घरीं त्या पुस्तकावरून होणारा भजनीं व्रतोत्साह पाहून फार आनंद झाला. त्यानंतर छापण्यास देण्याकरितां पक्की प्रत तयार करण्यासाठीं मी त्यांच्या कडे बैलहोंगल गांवीं जाऊन राहिलों व त्यांजकडून तशी प्रत तयार करून घेतली.

या माझ्या मित्रानें पूर्वजन्मीं श्रीरमावल्लभदासांची सेवा थोडी अपूर्ण केली होती, ह्मणूनच कीं काय कोण जाणे, त्यांनीं आतांचें पुस्तक कांहीं मोबदला न घेतां मोठ्या प्रेमानें व आदरानें शुद्ध करून, कठीण शब्दांवर टीपा वगैरे देऊन लोकमान्य होईल असें केलें आहे. श्रीरमावल्लभदासांचें चरित्रही उपलब्ध सामग्रीवरून रमावल्लभाच्या प्रेरणेनें बहुतेक त्यांनींच तयार केलें आहे. प्रत्येक प्रबंधाचें पर्यालोचन—त्या प्रबंधाचें महत्व वाचकांच्या मनावर ठसण्याकरितां—त्यांनीं केलेलें पुढें दिलें आहे. त्यावरून त्या त्या प्रबंधाचें सार व रहस्य वाचकांच्या ध्यानांत येईल, व त्या दृष्टीनें ते प्रबंध वाचले असतां वाचकांना अधिक आनंद होईल अशी मला खात्री आहे.

पूर्वीच्या पुस्तकांतील अशुद्ध पाठ काढून शुद्ध पाठ दिले आहेत. कांहीं ठिकाणीं प्रथमतः सांगितल्याप्रमाणें तितक्याही जुन्या वह्यांवरून समाधानकारक पाठ मिळाला नाहीं, तो पाठ निरुपायानें तसाच ठेवला आहे, त्याचप्रमाणें कांहीं थोड्या कठिण शब्दांचे अर्थ प्राचीन उपलब्ध कोशांतही सांपडले नाहींत, ते तसेच ठेवून दिले आहेत. विद्वज्जनांनीं याबद्दलच्या सूचना केल्या असतां त्यांचा आदरपूर्वक विचार करूं व वाटल्यास त्याप्रमाणें लहानसें शुद्धिपत्रही निराळें छापून पुस्तकास जोडून देऊं. पूर्वीच्या आवृत्तींतील कांहीं प्रबंध अजीबात काढून टाकून त्याऐवजीं अनुरूप असे दुसरे प्रबंध घातले आहेत. अष्टावधान सेवा व रासक्रीडा हे भाग तर अगदींच नवीन घातले आहेत. सज्जनांनीं नीरक्षीर न्यायानें त्याचें ग्रहण करावें अशी विनंति आहे.

ही माझी सेवा मान्य करून घेणार भक्तपति श्रीकृष्णपरमात्मा व त्याचे अनन्य भक्त समर्थ आहेत. तरी ज्यांनीं मला या कामीं परोपरीनें साह्य केलें त्यांच्याविषयीं प्रेम व्यक्त करणें हें अत्यंत इष्ट व अवश्य आहे. त्यापैकीं माझे मित्र ह. गु. भ. प. रामचंद्र कृष्ण कामत यांची कामगिरी मी वर वर्णन केलीच आहे. याशिवाय या गुरुभक्तानें रमावल्लभदासाचे सर्व ग्रंथ शुद्ध करून देण्याचें काम निष्कामबुद्धीनें अंगीकारिलें आहे. अर्थात् श्रीरमावल्लभदासांना त्यांनीं हातांत धरलें आहे; त्याप्रमाणें श्रीरमावल्लभ व त्याचे दास त्यांस हातांत धरून प्रापंचिक अभ्युदयासहित सगुण भक्तीचें जें निरतिशय प्रेमसुख तें त्यांस निरंतर देवोत अशी श्रीरमावल्लभदासरूपी सर्वांतर्यामी श्रीकृष्णपरमात्म्याकडे मी प्रार्थना करितों. त्याचप्रमाणें या माझ्या मित्राचें साह्य घेण्यास ह. भ. प. शांतगुणगंभीर श्रीयुत वामन वेंकोबा कामत व आनंदोल्हास वृत्तीचे डॉ. गुंडो रामचंद्र गिंडे या थोर व प्रेमळ सज्जनांनीं मला मदत केली, याबद्दल त्यांचेंही चिरंतन कल्याण मी श्रीकृष्ण परमात्म्याकडे मागतों. तसेंच हें पुस्तक व बाकीचे श्रीरमावल्लभदासाचे ग्रंथ छापण्याबद्दल उदार मनानें वर्गणी देऊन ज्या सज्जनांनीं ( नांवें ४८ व्या पृष्ठांत दिलीं आहेत ) मला रमा-वल्लभदासाच्या यशःप्रसिद्धीस यशस्वी केलें, त्यांचे आभार मानून नित्यानंद स्वरूप श्रीकृष्णपरमात्म्याचें प्रेम त्यांस मिळो अशी जगद्गुरु श्रीकृष्णाकडे मी प्रार्थना करितों. रमावल्लभदासांचे ग्रंथ छापण्याचे कामीं फार सवलत दिल्याबद्दल व कांहीं ग्रंथ आपण स्वतः छापण्याचें काम ह. गु. भ. श्रीयुत आबाजी रामचंद्र सावंत यांनीं पत्करल्या-बद्दल त्यांना लौकिक व पारमार्थिक संपत्ति मिळो व त्यांचा श्रीरामतत्त्व–प्रकाश छापखान्याचा अधिकाधिक उत्कर्ष होवो अशी श्रीरामाकडे मी नम्रपणानें मागणी करितों. त्याचप्रमाणें माझी वृत्तिधारा अंतकाळपर्यंत हृदयस्थ सर्वसाक्षी, विश्वंभर कृष्णपरमात्मचरणीं अखंड जडून राहो असा आशीर्वाद देण्याबद्दल सर्व संतसज्जनांकडे साष्टांग नमस्कारपूर्वक प्रार्थना करितों व ज्या अवतारी सत्पुरुषाच्या कृपाप्रसादानें श्रीमती आवडीबाईस श्रीकृष्णप्राप्ति होऊन ती श्रीकृष्णीं ऐक्य पावली, त्या श्रीरमा-

वल्लभदासांच्या दोन व श्रीमती आवडीबाईची एक अशा तीन आरत्या यापुढें देऊन ही प्रस्तावना त्या उभयतांचें चिंतन करीत करीत संपूर्ण करितों.

कृष्णाय वासुदेवाय हरये परमात्मने ।
प्रणतक्लेशनाशाय गोविंदाय नमो नमः ॥ १ ॥

ॐनमो भगवते वासुदेवाय ।

सुलतानपेठ, बेंगळूर सिटी.
श्रीकृष्णाष्टमी, शके १८३५.

संतसज्जनांचा दासानुदास,
सुब्राव गोपाळ उभयकर.

---

## राघवदासकृत रमावल्लभदासाची आरति.

जय रमावल्लभा जी, परमेष्ठी गुरुराया । तारिले भक्त जगीं, सहज अवतरूनिया ॥ ध्रु० ॥ श्रीगीता भागवत, सारासार मथूनी । काढिलें निजसार, स्वानुभव लाहोनी । वैराग्यज्ञानभक्ति,-बोध प्रकाश करूनि । सांप्रदाय वाढविला, नवविध भजनीं ॥ १ ॥ ग्रंथ थोर ' चमत्कारी '–टीका पूर्ण संपतां । श्रीगुरुदत्तदेवें, दिल्ही भेटी तत्वतां । ' वैष्णवगति ' आणि ' वाक्यवृत्ति ' पूर्णता । एवं ग्रंथ त्रय, कथियले समर्था ॥ २ ॥ सहज लागति पाय, धन्य तेथींचे जन । दर्शनालागीं भक्त, चतुर्विध आपण । धांवुनी येती स्वयें, देहाभिमान विरोन । हरिकथा ऐकतांची, होती पुण्य-पावन ॥ ३ ॥ पाहतां निजरूप, नुरे ठाव मनास । एकानेक सर्व,--भावा-भाव निरसे । अपार कोंदला जी, निरालंब प्रकाश । भोगिती स्वानुभवी, निजानंद उल्हासें ॥ ४ ॥ यापरी तुमचें हो, पूर्णपण साचार । वानिती प्रेमभावें, गुरु आनंद सार । पावले ब्रह्मपद, सहज निरंतर । तें सुख राघवासी, दिलें पूर्ण उदारें ॥ जयरमा० ॥ ५ ॥ ॥ ॥

## श्रीरमावल्लभदासांची दुसरी आरति.

( चाल—ओंवाळूं आरति मदनगोपाळा. )

रमावल्लभदास रमावल्लभेशा । आरति ओंवाळीतों स्वप्रकाश-पुरुषा ॥ ध्रु० ॥ पंचभूतें आणि तन्मात्रा, सर्व हीं केवळ जड । जड द्रव्यें मी अजडाला, केवीं ओंवाळूं उघड ॥ रमा० ॥ १ ॥

तन्मात्राहुनि सूक्ष्म सर्व, जड प्राणाक्षें त्रिगुण ॥ सूक्ष्मसूक्ष्मतमा कैसें, त्यांनीं आरति दावीन ॥ रमा० ॥ २ ॥ रवि-शशि-बुद्धि-मन-अग्न्यादि, भास्यांचा तूं भासक । दर्पणरविबुद्धिभास मी कैसें उजळिन दीपक ॥ रमा० ॥ ३ ॥ श्रवणादित्रय पक्कमति-रमा तिचा तूं वल्लभ । दासरूपें अवतरोनी, शिष्यां करिसी स्वप्रभ ॥ रमा० ॥ ४ ॥ उपाधिरहित निवांत असणें, ही तुझि स्वानंदारति । दास्यत्रिपुटी कृष्णीं विरली, उगवली स्वयंज्योती ॥ रमा० ॥ ५ ॥

## आवडीची आरति.

( चाल—गगनिं डोळा घालीं बाळा निःसंग सौर झाली । रंगीं गोंधळ घाली. )

उदो उदो नारायणे आवडि गुरुमाये । सदासदये निर्भये । प्रेमभावें तव पद—आरती करितों चिन्मये ॥ ध्रु० ॥ भक्तकाजा जगीं अवतार धरुनि आली । कृपादृष्टि केली । कृष्णभक्ति प्रसरुनि तूं कृर्ष्णि ऐक्य झाली ॥ उदो० ॥ १ ॥ सर्वात्मबीज पेरुनि भक्तिवेल वाढविली । सफल टवटवीली । कृष्ण स्वानंदा-मृत—फलवृष्टि जनीं केली ॥ उदो० ॥ २ ॥ अनंत योनिं यातायात फेरा फिरुनि कष्टलों । चरमतनुसि आलों । संसृतींत सुख न मिळतां तूंतें चिंतुं लागलों ॥ उदो० ॥ ३ ॥ रमा-वल्लभदासरूपि कृष्णभक्ति प्रीती । कारण अढळ शांति । अंतरिं त्वां उपजवूनि निरसिली तमराती ॥ उदो० ॥ ४ ॥ आरति भानीं जडदृश्य लिंगभानभंग । होतां मी अनंग । उदो आरति स्वभेचें मी अभिन्न स्फुलिंग ॥ उदो० ॥ ५ ॥ अद्वयबोध दिवटी घेउनि आरति ओंवाळिली । दृष्टिप्राण खुंटलीं । चित्त-पक्षि चिन्नभिं उडतां जीवदीप्ति हरपली ॥ उदो० ॥ ६ ॥ उदो आनंदाब्धि कृष्णदास निस्तरंग । अनामरूपरंग । उदो स्वयंस्फूर्ति उदयें सच्चित्सुख अभंग ॥ उदो उदो नारायणे० ॥ ७ ॥

हें पुस्तक छापण्याबद्दल साहाय्य दिलेल्या उदार सज्जनांचीं नांवें:—

| | | | |
|---|---|---|---|
| ह. गु. भ. प. | श्रीयुत | गोविंद हरि राळेरासकर, बी. ए. एल एल. बी., अक्कलकोट. ... ... ... | रु. २५ |
| ,, | ,, | हस्यंगडी शंकरनारायणराव, एम. ए. बी. एल., ॲडव्होकेट, शिवमोगा ... ... | रु. १०० |
| ,, | ,, | शंकर शेषगिरि उभयकर, फॉरेस्ट रेंजर, बेळगांव. | २५ |
| ,, | ,, | एन्. एस्. शिवराव, बी. ए. बी. एल. ॲडव्होकेट, चिकमगळूर. ... ... | रु. २० |
| ,, | ,, | हळदीपुर सदाशिवराव, डॉक्टर, एल्. एम्. एस., नरसापूर ... ... | रु. २५ |
| ,, | ,, | प्रोफेसर काशीनाथपंत छत्रे, 'दी न्यू इंडियन सरकस'चे मालक. ... ... | रु. १६० |
| ,, | ,, | बंटवाळ रघुनाथराव, बी. ए., हेड मास्तर, हायस्कूल, कुंदापूर. ... ... | रु. २५ |
| ,, | ,, | भारद्वाज शिवराव, मंगळूर. ... ... | रु. २५ |
| ,, | श्रीमती | कार्नाड लक्ष्मीबाई, पार्वतीबाई, व मु० राधाबाई, मंगळूर. ... ... | रु. ३८ |
| ,, | श्रीयुत | सदाशिव रंगप्पा दिवगी नि० सीतारामप्पा चित्तार, दलाल, हुबळी. ... ... | रु. २५ |
| ,, | ,, | गोपाळ नारायण उभयकर, हुबळी. ... | रु. २५ |
| ,, | ,, | देवराव शिवराम उभयकर, बेंगळूर ... | रु. ५० |
| ,, | ,, | एक दास. ... ... ... ... | रु. २०० |
| | | एकूण. | ७४३ |

सज्जनांच्या कृपेनें हें श्रीकृष्णजयन्ती पुस्तक तर छापून झालेंच आहे. 'प्रबोध-चंद्रिका' पुस्तक या पूर्वींच छापून भक्तजनांच्या हातीं पडलें आहे. 'बृहद्वाक्यवृत्तिटीका' हें पुस्तक श्रीयुत आबाजी रामचंद्र सावंत यांनीं प्रेमानें स्वतःच्या खर्चानें छापून प्रसिद्ध केलें आहे. 'भ. गीता चमत्कारी टीका' हें पुस्तकही शुद्ध झाल्यानंतर त्यांनीं छापणेचें अभिवचन दिलें आहे. आतां वर दर्शविलेल्या वर्गणींतून शिल्लक राहिलेल्या पैशाचा व कृष्णजयन्ती व्रतकथा पुस्तकाच्या निव्वळ उत्पन्नाचा तसेंच यापुढें सज्जनांकडून मिळणाऱ्या द्रव्याचा विनियोग रमावल्लभदासांच्या इतर प्रासादिक कवितांची गाथा व त्यांचे इतर ग्रंथ प्रकाशनाच्या कामीं करावयाची योजना केली आहे. ती श्रीकृष्णकृपेनें व सज्जनांच्या आशीर्वादानें सिद्धीस जावो.

# विनंति.

दृष्टिदोष, व हस्तदोष, बुद्धिदोष, यामुळें छापतांना राहिलेल्या अशुद्धांचें हें शुद्धिपत्र दिलें आहे; त्या प्रमाणें पुस्तक वाचणेस आरंभ करणे पूर्वी शुद्ध करून वाचणेची कृपा करावी.

## शुद्धिपत्र (प्रस्तावनेंतील)

| पृ. | ओ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | २८ | एकनिष्ट | एकनिष्ठ |
| २ | १४ | चतूर | चतुर |
| ,, | २१ | संसाराचि | संसाराची |
| ,, | २२ | अर्पण ॥ | अर्पण । |
| ३ | ३ | गेलेंलें | गेलेले |
| ,, | ७ | शत्रूचें | शत्रूचे |
| ४ | १६ | त्यासही | यासही |
| ,, | १७ | बसलें | बसले |
| ,, | २२ | प्रपच | प्रपंच |
| ५ | ६ | उत्पत्र | उत्पन्न |
| ६ | १७ | अनुग्रहा | अनुग्रहा |
| ७ | २ | विश्वतारणें | विश्व तारणें |
| ,, | ४ | अनुसरें | अनुसरे |
| ,, | ९ | देऊन | देऊन । |
| ११ | १८ | '(ए. भा. अ ३१ पहा) संपूर्ण' —(हे शब्द खोडून टाकावे) | |
| १२ | २१ | पूर्ण | पूर्व |
| ,, | २८ | धिद्धनं | स्विद्धनं |
| १४ | ४ | संतापें | संतां पें |
| १४ | ३४ | बुद्धिमान् संतांसही | बुद्धिमंतांसही |
| १५ | १० | ब्राह्मण स्त्रीचें | ब्राह्मणस्त्रीचें |
| ,, | २१ | रमा॰मल्लापूरगांवीं | मल्लापूरगांवीं रमावल्लभदासांनां |
| १६ | २६ | दीनवत्साला: | दीनवत्सला: |
| १८ | ९ | मुष्टि | मुष्टी |
| ,, | २२ | ववेका | विवेका |
| ,, | ३२ | प्रोढी | प्रौढी |
| १९ | १७ | लोकांना | लोकांना· |
| ,, | २४ | अव्यभीचार | अव्यभिचार |
| २० | ७ | करसेवन | कर सेवन |
| ,, | २३ | वलभ | वल्लभ |
| २१ | ९ | पूज्य बुद्धि | पूज्यबुद्धि |
| ,, | १९ | केला | केला । |
| ,, | १२ | संबंधानें | संबंधानें स्वतःची |
| २३ | १ | दक्षपण | दक्ष पण |
| ,, | २४ | ह्मणो | ह्मणों |
| ,, | ३१ | गेलें | गेले |
| २४ | ६ | मुलांस | मुलास |
| ,, | २० | ज्ञान शक्ति | ज्ञानशक्ति |
| ,, | २२ | ज्ञान वैराग्या | ज्ञानवैराग्य। |
| ,, | २७ | ज्ञान वैराग्य. | ज्ञानवैराग्य- |
| ,, | ३३ | सांप्रदाय | सांप्रदाय— |
| २५ | १० | व्यापकचें | व्यापकाचें |
| ,, | २४ | दाखविले आहेत | दाखविलें आहे |
| २७ | ७ | अर्जुन | अर्जुना |
| ,, | ९ | व्यासमुनी | व्यासमुनीं |
| ,, | १० | व्यास बोध | व्यासबोध |
| ,, | ११ | ब्रह्मनिष्ट | ब्रह्मनिष्ठ |

| | | | |
|---|---|---|---|
| ,, | १७ | विज्ञान | विज्ञान— |
| ,, | १८ | ते मी | तेंचि |
| ,, | २० | पावलें | पावले |
| २८ | ४ | दर्जाचें | दर्ज्याचें |
| ,, | ७ | सगुणोपासनेचा | स०नेची |
| ,, | १९ | ॥ ३७७ ॥ | ॥ ३७७ ॥— ( ए. भा. अ. ) |
| ,, | २० | रचलेली | रचलेल्या |
| ,, | २६ | ( will power इच्छाशक्ति ) | ( vested freedom ) |
| ,, | ३२ | घेऊन | घेतां |
| ३० | १ | निरतिशयानंद सुखाकडे | निरतिशयानंदाकडे |
| ,, | ,, | होणे घडतनाहीं. | घडत नाहीं. |
| ,, | १५ | सर्व संतांनीं | तुकारामानें |
| ,, | २७ | त्याचें | त्याचें |
| ,, | ३१ | धारण | धारणा |
| ३१ | ३ | ह्मणजे | असतां |
| ,, | ५ | ध्येय | ध्येय— |
| ,, | १६ | अवलोकनानें | अवलोकन केलें असतां |
| ,, | १९ | उतावळ | उतावीळ |
| ,, | २१ | तिहीं | तिंहीहो |
| ,, | २२ | शुकमुनीं | शुकमुनी |
| ३२ | २७ | दासांचें | दासांचे |
| ३६ | ११ | हरिदासां | हरि । दासां |
| ३७ | १८ | घरो | घरीं |
| ३६ | १३ | निरुपण | निरूपण |
| ,, | २७ | लावण्याचे | लावल्याचें |
| ,, | २४ | वाचकांनीं | त्याकडे वाचकांनीं |
| ३८ | १ | श्रवणेच्छ | श्रवणेच्छा |
| ,, | ८ | वाटेल | त्यांस वाटेल |
| ,, | १० | मकरंद | मकरंदाचें |
| ३९ | १ | गंगाध दास | गंगाधरदास |
| ,, | २९ | मरम | परम |
| ४३ | २२ | याझ्या | माझ्या |
| ४३ | २५ | उययोग | उपयोग |
| ,, | ३२ | उभयकर. | उभयकर यांची प्रत. |
| ,, | ३३ | मंत्र | मित्र |
| ,, | ,, | —परायणा | —परायण |
| ४४ | १७ | माझे | माझे |

## शुद्धिपत्र ( पुस्तकांतील. )

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | १८ | कोकुळाचा | गोकुळाचा |
| ६ | १४ | जाणतों | जाण तो |
| १२ | १३ | दळ | २ दळ |
| ,, | १४ | ६ परिणीयेल्या | ३ परिणीयेल्या |
| ,, | टीप | धरिलया | वरिलया |
| १३ | १ | निवेदावें | १ निवेदावें |
| १४ | २६ | प्रहार | प्रहार, बंधन |
| १५ | ७ | बिभिषिण | बिभीषण |
| ,, | १५ | ऋषिभार्वा | ऋषिभार्या |
| १७ | ६ | अनेकदन्तं | अनेकदं तं |
| १८ | २५ | दनिबंधु | दीनबंधु |
| १९ | १ | न ोडीं | न सोडीं |
| २० | ६ | नारदादि मुनद्रिं | नारदादि- मुनींद्र |
| २४ | २३ | श्रीरमावल्लभदास | श्रीरमावल्लभ- दास्य |
| २७ | १२ | जानक विरण | जानकीवरण |
| ,, | १३ | दास्यपण | दासपण |
| ३० | २२ | त्याचा | त्याच्या |

| | | | |
|---|---|---|---|
| ३२ | १ | नादसी | नांदसीं |
| ३४ | १४ | देखिले | देखिलें |
| ३५ | १७ | विष्णु[३] | विष्णु[२] |
| ,, | टीप | हरि | हरिः। |
| ३८ | १२ | कर्मठेवा | कर्मठेव |
| ४२ | २१ | शातिची | शांतीची |
| ४६ | १८ | व्याप्त | व्याप्य, |
| ४८ | १३ | खरें | खरं |
| ५३ | २ | भृषण | भूषण |
| ५४ | ६ | लीसे | लीसे |
| ५८ | १३ | वानिताहि | वानितांहि |
| ५९ | २४ | लक्ष्मीनैराश्य[१] | लक्ष्मीनैराश्य[४] |
| ,, ६० | टीपेंत | ० | ४ नैराश्य—लक्ष्मी, तीव्र वैराग्य |
| ६० | टी. | नैराश्यलक्ष्मी० | ( येथें नको ) |
| ६५ | १८ | आठवे | आठव |
| ६९ | ३ | लाहलाहत[१] | लाहो लाहत[१] |
| ,, | १३ | तृण | तृणा |
| ,, | टीप १ | लसलासित | १ छंद |
| ७५ | १८ | पार | पार[२] |
| ,, | टी. | ० | २ नदीचा प्रवाह. |
| ८१ | १३ | तीत | तीता |
| ८३ | १२ | निवृति | निवृत्ति |
| १०४ | १६ | ...गुणः | गुण |
| १०४ | १६ | श्री...त्तमः | श्री...त्तम |
| १०४ | १७ | प्रियः | प्रिय |
| १०४ | १७ | प्र...राधितः | प्र...राधित |
| १०४ | १९ | ऋग्वेद | ऋग्वेद |
| १०५ | ६ | वचनैःवेदांत | वचनैर्वेदांत |
| १०५ | १७ | पुष्टिप्रदे | पुष्टिप्रद |
| १०५ | १८ | तत्सेव्य | त्वत्सेव्य |
| १०५ | १९ | स...मिती | स...मिदं |
| १०५ | २४ | शंखावादमिमं | शंखाध्मान मिदं |

| | | | |
|---|---|---|---|
| १०६ | १ | गंधर्वाप्सरसे वितत्तव | गंधर्वाप्सरसांगणैर्नुत |
| १०६ | ४ | भूर्जितप्रियमिदं | मूर्जितप्रियमिमं |
| १०६ | ५ | तंसोषय | संतोषय |
| १०८ | ८ | मूढा | मूढ। |
| ११० | १९ | बोलवें | बोलवे |
| ,, | २१ | बोलवें | बोलवे |
| ११३ | १५ | हेम रस० | हेमरस० |
| १२० | १९ | देतभाव | द्वैतभाव |
| १२१ | ११ | कडिये[१] | कडिये |
| ,, | १२ | वोसंगे | वोसंगे[१] |
| १२३ | ६ | चीकसा | चिकसा |
| १२५ | १७ | हें ओनाम | हें वो नाम |
| ,, | १८ | टाळू | टाळू। |
| १२६ | ७ | आंदणें | आंदणें। |
| ,, | २३ | खड्गी | खड्गी |
| १२७ | २१ | सांखळा | सांखळ्या |
| १२८ | १० | लेणें | लेणीं |
| ,, | १६ | जाणे | जाणें |
| ,, | २५ | ० | ३ विषयरूपी चारा, भक्ष्य |
| १२९ | १ | पंचकर्मतया | पंचकर्ममया |
| ,, | १६ | पूर्ण परिपूर्ण | पूर्ण—परिपूर्ण |
| ,, | टी. ३ | विषय० | ( नको ) |
| १३१ | ९ | सागे | सांगें |
| १३२ | २१ | वल्लभाचें | वल्लभाचे |
| १३७ | २२ | वंचलों | वंचलों |
| १४१ | १० | लाहेलाहे | लाहेंलाहें |
| १४४ | १७ | मना | मनीं |
| १४५ | १७ | मुक्ति फळें | मुक्ति-फळें |
| १४७ | १७ | संचित-क्रीयमाण | संचितआणि-क्रियमाण. |
| १४८ | २६ | —दुःख | दुःख |
| १५२ | ७ | काम्य | काम्य |

( **पद** )हरि तुजविणें मज कोण सखा आहे जाण । अंतर पडतां माझा जाईल हा प्राण ॥ १ ॥ अरे माझ्या गोपाळा परम कृपाळा । तुझ्या स्मरणाचा मज लागलासे चाळा ॥ ध्रु० ॥ सर्वत्र व्यापक सर्व लाघव गा तुझें । अंतरपडतां तुज लाज येईल बुझें ॥ २ ॥ विपरीत करणें हें मजला घडतां । धांव धांव सख्या फार अनर्थी पडतां ॥ ३ ॥ तरेल गा दुराचारी तुझे नाम घेतां । न तरीजे केवीं भक्त तुज शरण येतां ॥ ॥४॥ मायबाप सखा धणी तूंच एक होसी । तुजवीण माझे कोण अपराध सोसी ॥५॥

निपटपणें दास तुझे आवडते भारी ।
माझे कांहीं अपराध नाठवी मुरारी ॥ ६ ॥
जे जे तुझे अंकित गा नये त्यांची सरी ।
**रमा**वल्लभदास ह्मणे सरतें करी हरी ॥ ६ ॥

( **पद** )हरि तुझ्या नामाची मज लागलीसे गोडी । हरि तुझें नाम माझा सर्वही भ्रम तोडी ॥ हरि तुझ्या नामा वरुति सार नाहीं जोडी । हरि तुझें नाम धरिलें कवण आतां सोडीं ॥ १ ॥ हरि मज नको नको आपुला विसर पाडूं । विसर पाडूनि नको संसारांत धाडूं । विषय गोडी लावूनी नको मजला नाडूं । तुजवीण संशय ह्मणतां मज अपाडू ॥ धृ० ॥ हरि तुझा आठव मज तूंचि करुनि देगा । तुझी माया जगीं उरो-तूंचि नेदिसी गा । तुझी माया तूंचि हरी आवरूनी घे गा । नाना साधनें करूनि नाटो-पेचि ते गा ॥ २ ॥ तुझी माया हरीरे कांता कनक दावी । तुझा विसर पाडुनी तेंच ध्यान लावी । तेणें ध्यानें हेगा जगासी भोंबावी । स्वामी तुजवीणे तीज कोणें निवारावी ॥ ३ ॥ संत संगती मज देई गा पावन । तुझें नामधारक साधुसंत जन । तया जवळीं तूझा आनंद गहन । साधु देखिले या होती पातकें मर्दन ॥ ४ ॥ दोर देखिले या सर्पभय राहे । स्वप्नीं बंधन जाग्रतीं न राहे । हरी तूझा आठव गा ऐसा होत आहे । रमावल्लभदास हृदयांत लाहे ॥ ४ ॥

## ' श्रीरमावल्लभदास ' याचा अर्थ

शोभा गात्या ऐकत्यासी । शोभा ध्रुपद धरी त्यासी । शोभा दिसे प्रपंचासी । शोभा मुक्ता मुमुक्षांसी ॥ १ ॥ ह्मणवुनी ' **श्री** ' नाम अभंगीं । जाणिजेत अंतरंगीं ॥ ध्रु० ॥ रमवी रमेलागीं फार । मग ते मुक्ति दे अपार । दरिद्रयासी नाहीं थार । ह्मण-वूनि ' **रमा** ' नाम उच्चार ॥ २ ॥ जाणताति अर्थ संत । जे अनुभवी स्वतंत्र ॥ध्रु०॥ ' **वल्लभ** ' ह्मणिजे आत्मा हरि । नाम गातां सबराभरी । चारी मुक्ति दासी करी । उतराई नव्हेल परी ॥३॥ ऐसा ' वल्लभ ' नाम भावो । धरितां चुके येवो जावो ॥ध्रु०॥ ' **दास** ' ह्मणिजे सनकादिक । मुक्त शुक्र वरटीक । अर्थ घेती प्रामाणिक । साह्य होती सकळीक ॥ ४ ॥ यालागीं ' दास ' नाम अंतीं । पद प्रबंधीं जाणिजे संतीं ॥ध्रु॥ ' **श्री** ' नामें शोभा येत ॥ ' **रमा** ' नामें मुक्ति देत ॥ ' **वल्लभ** ' नामें मुक्ति घेत । ' **दास** ' नामें प्रेम लेत ॥५॥ 'श्रीरमावल्लभदास' । ह्या व्या या नामें अर्थास ॥ ध्रु० ॥



॥ श्रीरमावल्लभाय नमः ॥

वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ।
देवकीपरमानंदं कृष्णं वंदे जगद्गुरुम् ॥ १ ॥

# श्रीकृष्णजयंतीव्रतकथा.



## प्रकरण १ लें—प्रातःस्मरण.

उत्तिष्ठोत्तिष्ठ गोविंद उत्तिष्ठ मधुसूदन ॥
उत्तिष्ठ कमलाकांत त्रैलोक्यं मंगलं कुरु ॥ १ ॥

(प्रबंध १) देवकी रोहिणी येउनियां । कृष्णा कृष्णा बाहुनियां । उठीं बा आळस त्यजुनियां । मुखकमळ दाखवीं ॥ १ ॥ देखिल्याविणें श्रीमुखकमळ । नेत्र न होती सफळ । कार्य चालेल सकळ । तूं सावध झालिया ॥ २ ॥ नको अंगीकारूं निद्रा । सावध होईं यादवेंद्रा । सकलयोगियां योगेंद्रा । भक्तजनवत्सला ॥ ३ ॥ शिवादिक सनकादिक । मुद्रा लावुनी सकळिक । उभे राहिले वरेटिक । लोकपाळ सकळ ॥ ४ ॥ नारद भक्तिरस गात । सगुण निर्गुण तुझी मात । श्रवणें मीतूंपण हें जात । दरुशन दे बा सांव-

१ बोलावून, हाका मारून. २ एक सारखे, (अष्ट.)

ळिया ॥ ५ ॥ शांति तूर्या दोघीजणी । तैशा देवकी रोहिणी । त्यांच्या वचनीं तत्क्षणीं। उघडी[1] ज्ञानलोचन ॥ ६ ॥ देखोनि आनंद न समाये । माया[2] इडापिडा[3] घेउनि जाये । उपरि[4] उद्धव जवळीं राहे । निजपादुका घेउनियां ॥७॥ उठला भक्त-वेळांइत[5] । अंतरंगीं बोलावित। रमावल्लभदास विनवित। मुख प्रक्षाळीं सुंदरा ॥ ८ ॥

( प्र० २ ) देव उठिले श्रीकृष्णजी । भक्त सादर रहा जी। आपुलाले कांजीं[6] । शीघ्रवत ॥१॥ आले रत्नासनीं बैसले । एकीं पाय धूतले । एक सिद्ध झाले । पुसावया ॥ २ ॥ उष्णोदक झारी । एक देती करीं । पुढें तस्त धरी। भक्त एक ॥ ३ ॥ दांतवण हातीं । एक त्या पैं देती । मुख प्रक्षाळिती । महाराज ॥४॥ मुख पुसायास । देती धौतवास[7] । एक दर्पणास । दावितातीं ॥५॥ एक पीतांबर नेसविती । एक कंठमाळा घालिती । एक पांघरविती । सोनसळा[8] ॥ ६ ॥ रत्नजाडित कांचोळा । सुगंधाचा मेळा । एक त्या निढळा । लावितातीं ॥७॥ मुकुट मस्तका । तेजोराशी निका । घातला कौतुका । श्यामवर्णा ॥ ८ ॥ रुक्मिणी सत्यभामा । दोबाहीं चामरें । सलज्जा सुंदरें । ढाळितातीं ॥९॥ उद्धव पीतांबर । श्यामांगावरी ढाळी । जेवीं मेघ निराळीं[9] । तळपे वीज ॥ १० ॥ मंद मंद वायु । जाणवी अक्रूरु । विंजणा[10] चतुरु । घेउनि करीं ॥११॥ नानापरि धूप। दशांग जाळित । न समाय धुंत[11] । अंबरांत ॥१२॥ द्राक्ष दिव्यरसांतरीं । शर्करा हे रायपुरी। रात्रिमाजीं तयावरी । पोळी भिजत घातली ॥१३॥ प्रातःकाळीं उठतांच । देव मागे पोळियेस । देतों देतों ह्मणे त्यास। शीघ्र तूप घातलें ॥१४॥ राम श्याम करीं घेती । दोघे खातां नाचतातीं। अंतरिक्षीं पाहतातीं । देवीं पुष्पें टाकिलीं ॥१५॥ कृष्ण चाखे

---

१ देवानें नेत्र उघाडिले. २ आई. ३ दृष्ट काढती झाली. ४ त्यानंतर. ५ कैवारी. ६ कार्यांत. ७ धुतलेलें वस्त्र. ८ जरीचा शेला. ९ आकाशांत; १० पंखा. ११ सुगंध.

लोणियास । थोडें खाये पोळियेस । श्रीरमावल्लभदासां । उरलें चाखविती ॥ १६ ॥ श्री ॥

( प्र० ३ ) खाजें नैवेद्य बहु प्रकार ठेविती । किंचित खाउनि देती, शेष भक्तां ॥१॥ सभोंवत्या प्रिया, एकी देती फोडी । एकी करूनि विडी, करीं देती ॥२॥ खदिर वेलदोडे लवंग, कंकोळ पैं देती । तेणें मिषें निहाळिती, कृष्णमुख ॥३॥ पीकपात्र हातीं, एक त्या सादर । मुख निरंतर, न्याहाळिती॥४॥एक संगीत नाचति, एक बिरुदें पढती । एक वंश वर्णिती, यादवांचा ॥ ५ ॥ ब्रह्मवीणा करीं, नारद पैं गात । माजीं विनोद होत, श्रीकृष्णाचा ॥ ६ ॥ आपुलाल्या परी, आरत्या कुसरी । करिती निर्धारीं, प्रिय भक्त ॥ ७ ॥ भक्त जे सांबडे, वेडे पैं बांगडे । मर्यादेचें सांकडें, त्यां न घाली कृष्ण ॥ ८ ॥ जयजयकारें घोषें, महासभे येती । दर्शन पैं देती, ब्रह्मादिकां ॥ ९ ॥ रमावल्लभदास, आवडीच्या मेळें । आपुल्या वेगळें, नेणे कृष्ण ॥ १० ॥ श्री ॥

## कांकड आरति.

( प्र० ४ ) सहस्र दीपें दीप, कैसी प्रकाशली प्रभा । उजळल्या दशदिशा, गगना आलीसे शोभा ॥ १ ॥ कांकड आरति माझ्या, कृष्ण सभागिया । चराचर मोहेरलें, तुझी मुर्ति पहाया ॥ ध्रु० ॥ कोंदलेंसे तेज, प्रभा झालीसे एक । नित्य नवा आनंद, ओंवाळितां श्रीमुख ॥ २ ॥ आरति करितां तेज, प्रकाशलें नयनीं । तेणें तेजें मीनला एका एकीं जनार्दनीं ॥ ३ ॥

( प्र० ५—आरति ) ऐकोनि कृष्णकीर्ती, मन तेथें वेधलें । सगुणरूप माये, माझ्या जीवीं बैसलें । तें मज आवडतें, अनुमान न बोले । पहावया रूप याचें, उतावीळ हो झालें ॥ १ ॥ यालागिं आरती हो, कृष्णा पाहि वो सखी । आणिक नावडे हो, दुजें

१ साळेमोळे. २ भिडेचें. ३ संकट. ४ पुढें सरलें.

तिही हो लोकीं ॥ ध्रु० ॥ पाऊल कृष्णजीचें, माझ्या जीवीं बैसलें । सनकादिक पहा, महा आसक्त झाले । मुक्त जो शुकमुनी, तेणें मनीं धरिलें । तें मी केवीं सोडूं, मज बहू रुचलें ॥ २ ॥ निर्गुण गोष्टी माये, मज नावडे साच । सगुण बोल कांहीं, केव्हां आठवीं वाचें । पाया लागेन तूझ्या, हेंचि आर्त मनींचें । तेणें घडेल दास्य, रमावल्लभाचें ॥ ३ ॥ श्री ॥

( प्र० ६–विनंति ) व्रजपतिबाळ रे, रसिक रसाळ रे । सुरवरा पाळ रे,तो आवडीचा नाथ हा ॥ ध्रु० ॥ तनुमना चाळ रे । मानी फट काळ रे ॥ भावाचा भूकाळ रे । तो आवडीचा नाथ हा ॥ १ ॥ गोपाळीं गोपाळ रे । भूपाळीं भूपाळ रे ॥ कळीकाळा काळ रे । तो आवडीचा नाथ हा ॥ २ ॥ रमावल्लभदास रे । त्याचीच करी आस रे ॥ देत असे भास रे । तो आवडीचा नाथ हा ॥ ३ ॥

( प्र० ७ ) सर्व कल्याण गुणाचें । नाम गोपाळरायाचें ॥ १ ॥ निरंतर ह्मणतां वाचें । फळ पावेल जन्माचें ॥ २ ॥ चांगा ह्मणे हरि स्वभावें । सुख पावेल केशवें ॥ ३ ॥ एकांतीं करी विनंति । त्वां परिसावी लक्ष्मीपति ॥ ४ ॥ इतकेंचि आह्मां द्यावें । आपुल्या भक्तां नुपेक्षावें ॥ ५ ॥ नामा विनवीत स्वभावें । माझें व्रत सिद्धि न्यावें ॥ ६ ॥ ह्मणसि येईल गजरें । प्रेम सुखाचिया भरें ॥ ७ ॥ माधवदासांचा पुढार । यादव घेतसे उदार ॥ ८ ॥ राजस तामस सात्विक बळ । लोटला उरला बोध प्रबळ ॥ ९ ॥ रमावल्लभ-दासा आठव । देतो उन्मनि ओंवरीं[1] ठाव ॥ १० ॥ श्री ॥

( प्र० ८-भाट ) धन्य गौळिराज नंद । धन्य सर्व गोपिवृंद । धन्य हा आनंदकंद । काय कैसें वानिजे ॥ १ ॥ धन्य माय जसवंति । धन्य बाळ श्यामकांति । धन्य पूर्णसुखकीर्ति । कोठ-वरि गणिजे ॥ २ ॥ धन्य यमुना हा घाट । धन्य धेनुवत्स

---

१ गुहा, खोली.

दाट । धन्य हें वैकुंठपीठ । उपमेसि आणिजे ॥ ३ ॥ धन्य धन्य व्रजनारी । धन्य भूमि सुखकारी । धन्य धन्य सुखरीं । भाग्य हें तों नेणिजे ॥ ४ ॥ श्री ॥

( प्र० ९ ) नंदजीची शोभा कैसी । सत्यपुरनाथ[1] जैसी । सावित्री हे उपमेसी । यशोदेच्या न पुरे ॥ १ ॥ गौळिजन दिसे कैसा । शुद्ध पाणि मेघ जैसा । कामधेनु थाट तैसा । गाई आणि वांसुरें ॥ २ ॥ सुरनारी चालताती । तैशा गोपी वागताती । लघुबाळ खेळताती । नवलाव सुंदरें ॥ ३ ॥ नंदपुत्रकांतीपुढें । इंद्रनीळकीळ[2] थोडें । रमावल्लभाचे गाढे[3] । दास सुखनिर्भर ॥ ४ ॥ श्री ॥

( प्र० १० ) गोकुळिंचे वृक्ष जैसे । इंद्रवनीं नाहीं तैसे । नानापाक्षि भाष्य कैसें । मंगळचि बोलती ॥ १ ॥ वसंत हा सदाकाळीं । राहिलासे वनस्थळीं । नाना पुष्पपरिमळीं । भ्रमर तेथें खेळती ॥ २ ॥ गायन हो कोकिळेचें । पंचम या आलापाचें । ऐकोनी गोड साचें । देहबुद्धि गळती ॥ ३ ॥ दास रमावल्लभाचे । सुख त्यांसि गोकुळींचें । निरंतर आहे वाचे । कृष्णकथा करिती ॥ ४ ॥ श्री ॥

( प्र० ११ ) कोकुळाचा नवलाव । नाहीं कोणा वैरभाव । न चले कोणाची माव । नंदपुत्र देखोनी ॥१॥ व्याघ्र गाई एकवट । अँज[4] वृक[5] थाट धीट । नकुळ[6] अँहि[7] प्रीति दाट । नंदपुत्र देखोनी ॥ २ ॥ बिर्डाळ[8] मूषक एक । प्रीति बहु अलोलिक । सर्व जीव एकमुख । नंदपुत्र देखोनी ॥ ३ ॥ रमावल्लभाचे दास । प्रेम त्यांचें बहुवस । न बोलवे सावकाश । नंदपुत्र देखोनी ॥४॥श्री॥

( प्र० १२ ) रत्नें लघु तेजमयें । जडलीं तेथें परिमेयें । नंदबाळशिरीं काये । नेटकीं हीं शोभत ॥ १ ॥ चांचर[9] कुरळ माथां ।

---

१ ब्रह्मदेव. २ तेज. ३ श्रेष्ठ, बळकट. ४ बकरा. ५ लांडगा. ६ मुंगूस. ७ सर्प. ८ मांजर. ९ केश.

भाळीं दिसताती आतां । भोंवयांसी नेत्रपातां । पद्मपत्र लाजत ॥ २ ॥ नासिक सरळ पाहे । कर्णी कुंडल शोभताहे । हनुवटी अधर हें । अनुपम्य दीसत ॥ ३ ॥ वदनप्रकाश याचा । नयनीं नसंडे साचा । दास रमावल्लभाचा । देखतांच हांसत ॥४॥ श्री ॥

(प्र० १३) सरी टांक[1] नख[2] कंठीं । बिंदुलीं तीं मनगटीं । आंकुडे मुद्रिका बोटीं । ठिकलेंग[3] साजत ॥ १ ॥ पिंवळें आंगुलें आंगीं । कोंदणें त्या निळयालागीं । गोफसूत्र कटीभागीं । मन्मथ तो लाजत ॥ २ ॥ क्रीडवितां हात पाये । घागऱ्या नेवाळें काये । वाजताति मन ध्याये । नेत्रें गोपी भजती ॥ ३ ॥ जयामध्यें जगा वास । जसवंति[4] पाजी त्यास । रमावल्लभाचे दास । कीर्तिसुखें माजती ॥ ४ ॥ श्री ॥

प्रबंध १४–] अभंग [–कृष्णजन्म पवाडा १ ला

अनादि तूं सिद्ध अजन्मा गोपाळ । परम कृपाळ जगत्पती ॥ १ ॥ जगत्पती थोर तुझ्याहूनि नाहीं । जाणतों निर्वाहीं तूंच अंगें ॥ २ ॥ अंगें तूंच येसी मनुष्यांमाझारीं । मूढ दुराचारी नेणतीच ॥ ३ ॥ नेणतीच हरि–भक्त तूंच हरि । पाप सबराभरी तयामाजीं ॥ ४ ॥ तयामाजीं तरायाची बुद्धि नाहीं । हरिभक्ति पाहीं मानेना तो ॥५॥ मानेना तो भक्ति संसारिक जन । कांता पुत्र धन प्रिय जया ॥६॥ जया प्रिय भक्ति हरि तया पाळी । संकटीं सांभाळीं वत्सल तो ॥७॥ वत्सल तो भक्तांलागोनि पैं कैसा । धेनुवत्स जैसा कळवळा ॥८॥ कळवळा तुझा भक्त पैं जाणती । अभक्त ह्मणती देव कैंचा ॥९॥ कैंचा देव कोठें कवणासी भेटत । व्यर्थ मिरवत भक्तिवाद ॥१०॥ भक्तिवादपूर्ण तयाचें बोलणें । सर्वत्रीं असणें दयाळुत्वें ॥ ११ ॥ दयाळुत्व अंबरिषालागीं पहा । अंगें जन्म दहा घेउनियां ॥१२॥ घेउनियां मत्स्य–स्वरूप अवतार । वेदांचा

---

१ मुलाच्या गळ्यांत बांधण्याकारितां ठसा उमटवून केलेली देवाची प्रातिमा. २ वाघनख. ३ रत्नजडित. ४ यशोदा.

उद्धार करिताहे ॥ १३ ॥ करिताहे कूर्म-वेष अंगीकार । भूगोल साचार धरियला ॥ १४ ॥ धरियला तंव हिरण्याक्ष मातला । मरण पावला वराहरूपें ॥ १५ ॥ रूप नरहरि प्रल्हादालागोनि । खांब तो फोडोनि प्रगटला ॥ १६ ॥ प्रगटला खुजा बळीलागीं झाला । परशुराम आला भूमंडळीं ॥१७॥ भूमंडळीं दाशरथी नाम सार । निशाचर फार मारियले ॥ १८ ॥ मारियले तंव दैत्य प्रबळले । करूं जे लागले अधर्मेचि ॥१९॥ अधर्मेचि धर्म मानुनी साचार । संतांचा विचार आवडेना ॥ २० ॥ आवडेना जया भक्ति आणि भावो । सात्विकांचा ठावो पूसियेला ॥२१॥ पूसियेला तंव जारण मारण । हेंचि आचरण करिताहे ॥२२॥ करिताहे हरि-नामाचा उच्छेदु । धरणीचा क्षेदु तेणें झाला ॥२३॥ झाला भूमीभार ब्रह्मया पैं गेली । तिणें श्रुत केली मातु सर्व ॥२४॥ सर्व देवगण विरंचि शंकर । पावती सत्वर क्षीरसिंधू ॥ २५ ॥ क्षीरसिंधू-तीरीं पुरुषसूक्तांनीं । स्तुति केली त्यांनीं नभीं वाणी ॥२६॥ नभीं वाणी झाली ब्रह्मा कानीं घेत । सर्व सांगिजेत मनोभावें ॥ २७ ॥ मनोभावें सर्व यादव होईजे । पृथ्वीसी येईजे देवगण ॥२८॥ देवगण देव मथुरा गोकुळीं । सात्विकांच्या कुळीं अवतरले ॥ २९ ॥ अवतरले हरी हरिकीर्तन गाती । तेणें दैत्यजाति कोपमय ॥ ३० ॥ कोपमय नामधारका छळिती । घालूनि जाळिती चिंतेमाजीं ॥ ३१ ॥ चिंतेमाजीं भक्त पडती अपार । ह्मणती विचार काय कीजे ॥ ३२ ॥ कीजे आतां सत्य चिंतन हरीचें । दुःख अंतरींचें निवारेल ॥ ३३ ॥ निवारेल आह्मां भरंवसा पैं आहे । तंव सूत्र पाहे कैसें झालें ॥ ३४ ॥ झालें मग लग्न देवकीचें बरें । दिल्हीं एकसरें वसुदेवा ॥३५॥ वसुदेव वरु देवकी नोवरी । समारंभ करी कंस अंगें ॥ ३६ ॥

---

१ ठेंगणा, वामन. २ क्षय. ३ हकीकत. ४ दैत्यांची जात. ५ घटना.

अंगें तो सारथी बहिणीचा झाला । गजरु वैर केला मिरवितसे ॥ ३७ ॥ मिरवतसे तंव नभीं वाणी झाली । चिंतेमाजीं घाली कंसराया ॥ ३८ ॥ कंसराया ह्मणे ' देवकीचा सुत । आठवा अद्भुत तुझा हंता ' ॥ ३९ ॥ हंता ह्मणवोनि कंस दचकला । हात पैं घातला वेणियेसि ॥ ४० ॥ वेणियेसि धरुनि शस्त्र मारूं पाहे । तंव वारिताहे वसुदेव ॥ ४१ ॥ वसुदेव ह्मणे पापें हें वांचणें । याहूनि मरणें पुण्य बरें ॥ ४२ ॥ बरें आदीं अंतीं बहिणीला मारितां । तुज इजेंकारितां नाहीं मृत्यु ॥ ४३ ॥ मृत्यु अपत्यानें तें तुज देईन । नित्य पैं घेईन भेटी साच ॥ ४४ ॥ साच मानवलें कंसें सोडियलें । बहिणीसी राखिलें स्थिरंजीव ॥ ॥ ४५ ॥ स्थिरंजीव तंव पुत्र पैं पहिला । वसुदेवें वाहिला कंसालागीं ॥ ४६ ॥ कंसालागीं मग प्रेम उपजलें । बालक दिधलें करुणेनें ॥ ४७ ॥ करुणेनें ह्मणे आठवा आणिजे । वैरी तो जाणिजे माझा सत्य ॥ ४८ ॥ सत्य वसुदेव न मानीं तें मनीं । बालक भुवनीं नेता झाला ॥ ४९ ॥ नेता झाला तंव कंसासुरापाशीं । नारद उल्हासीं काय ह्मणे ॥ ५० ॥ ह्मणे तो आठवा न कळे कवण । सर्व देवगण यादव होय ॥ ५१ ॥ यादव होय हरि अवतार धरुनि । पीडी त्यालागोनि पापरूप ॥ ५२ ॥ पापरूप बहु निग्रहो सज्जना । परि तें दुर्जना सुख होतें ॥ ५३ ॥ होतें दुःख बहु देवकीचे मना । पतीस बंधना मीच मूळ ॥ ५४ ॥ मीच मूळ पीडा सर्वां व्हावयासि । कर्णव देवासी येईल केव्हां ॥ ५५ ॥ केव्हां हो धांवेल भक्तांचा धांवया । कंसासी बोधाया कोण आहे ॥ ५६ ॥ आहे उग्रसेन बापही राखिला । तरि शिकवायाला कोण जाये ॥ ५७ ॥ जायेना कुविद्या कंसाची साचार । न घेतां विचार बाळें मारी

१ चांगला समारंभ. २ मारणारा. ३ इजकडून. ४ दंडण, दुःख. ५ करुणा. ६ कैवारी.

॥ ५८ ॥ मारियलीं बाळें साही कंसकाळें । सप्तम गर्भा आलें ॥ ५९ ॥ आलें तें कुशीसी रोहिणीउदरीं । एकसरी विष्णुमाया ॥ ६० ॥ मायालाघवानें हरि गर्भा तया स्तविजेत ब्रह्मादिकीं ॥ ६१ ॥ ब्रह्मादिक गेले स्तुति करोनियां । कंस येवोनियां पाहे बरें ॥ ६२ ॥ बरें तंव तेज[1] देवकीचें फार । ह्मणे झाला थार वैरियासी ॥ ६३ ॥ यासी मी उपावो न देखतां कांहीं । येथोनि लवलाहीं जातां बरें ॥ ६४ ॥ बरें हें वाटेना कंसाचिया चित्ता । भयें आठविता होय कैसा ॥ ६५ ॥ कैसा खातां पितां गृहांत राहतां । जगासि पाहतां तन्मय तो ॥ ६६ ॥ तन्मय तो कंसा भयें करी कैसा । प्रेमलाभ जैसा भक्तांलागीं ॥ ६७ ॥ भक्तांलागीं आतां निर्भय होईल । अजन्मा येईल जन्मा येथें ॥ ६८ ॥ येथें संकळित[2] झालें पैं कथन । दशम[3]-मथन भागवत ॥ ६९ ॥ भागवत कथा रमावल्लभाचा । दास गाये वाचा संतसंगें ॥ ७० ॥ श्री ॥

( प्र० १५ –पवाडा २ रा. पवाडे २।३।४।५ मिळून १०८ कडव्यांची कृष्णनामयुक्त एक जपमाळा होते. यांत श्रीकृष्णलीलेचें संक्षिप्त वर्णन व भागवत धर्माचें सार आहे. भगवद्भक्तांनीं याचा नित्यशः सकाळीं पाठ ह्मणावा. )

नमन श्रीव्यासा श्रीशुका वितृष्णा[4] । स्मरावया कृष्णा शक्ति त्यांची ॥१॥ त्यांची वाणी बोले कृष्णनाम सार । निर्गुण साचार भूमंडळीं ॥२॥ भूमंडळीं आला भूभार फेडाया । भ्रांति विघडाया कृष्णजन्म ॥३॥ जन्मे देवकीसीं अजन्मा अनादि । कृष्णा तुझा आदि कोण जाणे ॥ ४ ॥ जाणे कोण जन्म चारी भुजा घेसी । आभरण[5] लेसी कृष्णमूर्ति ॥ ५ ॥ मूर्ति दों हातांची प्राकृत होऊनी । शिरीं कृष्णालागोनि धरी बाप ॥६॥

---

१ तेजस्वी. २ संक्षेपतः. ३ दशमस्कंध. ४ विरक्त. ५ अलंकार.

बाप तो जगाचा श्रीकृष्ण सुंदर। यमुना दुस्तर दोनी भागीं ॥ ॥ ७ ॥ भाग दोनी कृष्ण ठेविला गोकुळीं। कन्या ती समूळीं आणिताहे ॥ ८ ॥ आणितांचि कंसें मारावया नेली । अंतराळीं[1] ठेली कृष्णमाया ॥ ९ ॥ कृष्णमाया ह्मणे अरे कंसासुरा। तुझा वैरी खरा अन्य स्थळीं ॥ १० ॥ अन्यस्थळीं बाळ होऊनी क्रीडत । कृष्ण सांपडत तुज कैसा ॥ ११ ॥ कैसा मग कंस अनुतापयुक्त । कारागृहमुक्त कृष्णपिता ॥ १२ ॥ पिता वसुदेव माता ती देवकी । निर्मळ अशोकी कृष्णतनु ॥ १३ ॥ तनु मन धन श्रीकृष्ण जयाचें । कोण गौळियांचें धन्यपण ॥ १४ ॥ पण बोलोनियां पूतना ती आली । पहा मुक्त झाली कृष्णमुखें ॥ १५ ॥ मुखें किती वानूं श्रीकृष्णपवाडा । दोंमासांचा[2] गाडा[3] मोडिताहे ॥ १६ ॥ मोडिताहे झाडें फिरे चक्रवात । त्याचा करी घात बाळकृष्ण ॥ १७ ॥ कृष्ण रांगे चाले मृत्तिका भक्षितां । यशोदा लक्षितां विश्व दावी ॥ १८ ॥ दावी तो लाघवी दहीं दूध चोरी । गाऱ्हाण्याची थोरी कृष्णाचीया ॥ १९ ॥ कृष्णाचिया नामें बंधनें तुटती । बांधाया आटती तया गोपी ॥ २० ॥ गोपिकांसी कृष्ण रंजवित आहे । तो पैं राखताहे वत्सें पूर्ण ॥ २१ ॥ पूर्ण तो श्रीकृष्ण वत्सासुरा मारी । बक अघ तारी चिरोनियां ॥ २२ ॥ चिरोनियां गर्व ब्रम्ह्याचा सांडिला । श्रीकृष्णीं मांडिला भाव तेणें ॥ २३ ॥ तेणें भक्तिसुख कृष्णाचें वानिलें । उणें पैं मानिलें शब्दब्रह्म[4] ॥ २४ ॥ शब्दब्रह्म कोंडा कृष्णभक्ति बीज । नेणती हें निज मूढ सत्य ॥ २५ ॥ सत्यलोक सुख ठेंगणें सर्वथा । जेथ न कृष्ण कथा गोकुळींची ॥ २६ ॥ गोकुळींची ख्याति रमावल्लभाचा । दास गाये वाचा कृष्णप्रीतीं ॥ २७ ॥ श्री ॥

( प्र० १६—पवाडा ३ रा. ) प्रीतिसंकलित चरित्र चांगलें ।

---

१ आकाशांत. २ दोन महिन्यांचा असतांना. ३ शकटासुर. ४ श्रमतात. ५ वेद.

गोपिकां लागलें कृष्णध्यान ॥२८॥ ध्यान गायी चारी बळि-भद्रासहित । त्रिगुणरहित कृष्ण पहा ॥ २९ ॥ पहा सायंकाळीं व्रजधामा येत । कृष्ण शीण घेत[1] देतो सुख ॥३०॥ सुखें त्या गोपिका प्रातःकाळीं येती । जळमिसें घेती कृष्ण भेटी ॥३१॥ कृष्णभेटी घेती माध्यान्ह पावली । लाहिजे आबाळीं सुख फार ॥३२॥ फार मोरपिच्छें कृष्णाचे मस्तकीं । लिहिलें पुस्तकीं भक्तांचेया ॥ ३३ ॥ भक्तांचिया लीले चांचर[2] आळेक । केशर टिळक कृष्णभाळीं ॥३४॥ भाळलिया गोपी भृकुटीच्या[3] स्थानीं । कृष्णनेत्रबाणीं साजियेल्या ॥ ३५ ॥ साजियेलें तेज गालीं कुंडलांचें । नासिकें[4] कृष्णाचें नीटें[5] देखा ॥ ३६ ॥ देखा अधरानें पोंवळीं रोंविलीं । श्रीकृष्णें दाविलीं हिरेयांस ॥ ३७ ॥ हिरेयांची शोभा दर्शनें दिधली । श्रीकृष्णाची भली हनुवटी ॥ ३८ ॥ हनुवटी गळा निर्मळ कृष्णाचा । कौस्तुभ पूर्णाचा विराजत ॥ ३९ ॥ विराजत विश्व भुजें दोंही बाहीं । वैजयंती पाहीं कृष्णमाळा ॥ ४० ॥ माळा वैजयंती आपाद रुळत । तुळसी घोळत कृष्णप्रिय ॥ ४१ ॥ प्रिय कृष्णालागीं श्रीवत्स-लांछन । सर्वांगीं चंदनउटी असे ॥ ४२ ॥ असे पीतांबर कांसे मिरवत । मेखळा खचित[6] कटीं कृष्णा ॥ ४३ ॥ कृष्णब्रीदावळी पायांची गर्जती । दानव तर्जती रजतम ॥ ४४ ॥ रजतम नाशे श्रीकृष्णचरणीं । अरुण धरणी तळव्याची ॥ ४५ ॥ तळव्याची चिन्हें महिमा अपार । ह्मणोनि साचार कृष्ण रुचे ॥४६॥ रुचे कृष्णठाण त्रिभंगीं रहात । गोपिका पहात वेळोवेळां ॥ ४७ ॥ वेळोवेळां कृष्ण पांवा वाजवितो । रूपें लाजवितो मदनासी ॥ ४८ ॥ मदनासी कृष्ण रासरंगें मोही । आनंदाच्या डोहीं स्वरूपींच्या ॥ ४९ ॥ स्वरूपींच्या वृत्ति गोपि-

---

१ हरण करीत. २ कुरळे केश. ३ वृत्ति भ्रूमध्यें स्थिर करण्यास साधकास सूचना (खेचरी मुद्रा) ४ भूचरी मुद्रा. ५ दांतानीं. ६ रत्नखचित.

का सकळ । श्रीकृष्ण अकळ सोडीनात ॥ ५० ॥ सोडीनात जेथें अक्रूर पैं आला । कृष्णा नेता झाला मथुरेसी ॥ ५१ ॥ मथुरेसी कृष्ण नेतां पैं तुंबळ । रुदन आंबाळ करितातिं॥५२॥ करितातिं शोक अहा रे अक्रूरा । क्रूर तूंचि पुरा कृष्ण नेसी ॥५३॥ नेसी सखा कृष्ण प्राणाचा रे प्राण । होऊनि सुजाण काय केलें ॥ ५४ ॥ केलें समाधान नेत्रीं कृष्णें साचें । रमावल्लभाचें दासपण ॥ ५५ ॥ श्री ॥

( प्र० १७–पवाडा ४ था. ) पण कृष्ण नेतां अक्रूर भीतसे । जळीं देखतसे आदिरूप ॥ ५६ ॥ रूप देखोनियां निःसंदेह झाला । कृष्ण मग आला मथुरेसी ॥५७॥ मथुरेसी कंसादिकांसी वधूनी । श्रीकृष्णें स्थापूनि उग्रसेन ॥ ५८ ॥ उग्रसेन राजा श्रीकृष्ण प्रधान । झालें समाधान यादवांसी ॥५९॥ यादवांचें दळ बळाढ्य होऊनी । भीमकी हरूनी कृष्ण आणी ॥ ६० ॥ आणि सप्तनारी कृष्णें पँरिणियेल्या । भौमाच्या आणिल्या त्यांची संख्या ॥ ६१ ॥ संख्या सोळा सहस्र वरी एक शत । कृष्णासी लागत लग्न पहा ॥ ६२ ॥ पहा एक काळीं तितुक्याही सर्व । होवोनीयां पर्व कृष्ण सुख ॥ ६३ ॥ सुखरूप कृष्णें फेडिला भूभार । झाले पैं अपार पुत्रनातू॥६४॥ नातूपुत्रवंत कृष्णाचि होऊनी । सर्वत्र राहोनी द्वारकेसी ॥६५॥ द्वारकेसी मग कृष्णाचें लाघव । शाप अभिनव यादवांसी॥६६॥ यादवांमाझारीं वसुदेव पिता । झालासे बोधिता कृष्णभक्त ॥६७॥ भक्त तो नारद कृष्णनिरूपण । सांगत आपण इतिहासें॥६८॥ इतिहास जुना श्रीकृष्णभजन । विदेहाचे प्रश्न पहा नँव ॥६९॥ नँव कृष्णभक्त ऋषभदेवाचे । पुत्र पैं स्ववाचें बोलियले ॥७०॥ बोलियला ‘ कवि ’ भागवतधर्म । श्रीकृष्णीं सर्व कर्म निवे-

---

१ आबालवृद्ध. २ सैन्य. ३ परिल्या. ४ नऊ.

दांवें ॥ ७१ ॥ निवेदावें मग कृष्णभक्त होय । त्या चिन्हांची सोय ' हरि ' सांगे ॥७२॥ सांगे ' अंतरिक्ष ' कृष्णाविणें जगा । कल्पी वृत्ति ते गा माया ह्मणे ॥७३॥ ह्मणे तो ' प्रबुद्ध ' कृष्ण एक धरा । सुखें माया तरा सकळैक ॥७४॥ सकळैक दृश्य-द्रष्टेपणावीण । तो कृष्ण प्रवीण ब्रह्म जाणे ॥७५॥ जाणे ब्रह्म तया दुजेंपण नुरे । एकपणें उरे कृष्णभक्ति ॥ ७६ ॥ कृष्णभक्ति तया ' पिप्पलायना ' ची । ब्रह्मविचाराची मातु बरी ॥ ७७ ॥ बरीं 'आविर्होत्रें' तांत्रिक कर्माचीं । पूजा श्रीकृष्णाची सांगितली ॥ ७८ ॥ सांगितली संख्या चोवीस अवतार । कृष्णाचे अपार तयामाजीं ॥ ७९ ॥ माजीं नवसंतां ' द्रुमिळ ' सांगत, । ' चमस ' बोलत कृष्णपर ॥ ८० ॥ कृष्णपर ह्मणे रमावल्लभाचा । दास नव्हे त्याचा जन्म जळो ॥ ८१ ॥ श्री ॥

( प्रबंध १८-प्रवाहा ५ वा. ) जळो हा आचार जळो हा विचार । श्रीकृष्ण साचार आवडेना ॥ ८२ ॥ आवडेना कृष्ण यातना भोगिती । परि न त्यागिती अहंभाव ॥ ८३ ॥ अहंभावें संतां न पुसे उपाव । आत्मा कृष्णराव न सेविती ॥ ८४ ॥ सेविती श्रीकृष्ण शमदमें कृतांत[2] । यागें[3] पैं त्रेतांत[4] पावताति ॥ ८५ ॥ पावताति कृष्ण द्वापारीं अर्चनें[5] । कलियुगीं कीर्तनें वश होय ॥ ८६ ॥ वश होय कृष्ण कीर्तन करितां । मुक्ति अव्हेरितां दासी सदा ॥ ८७ ॥ सदा भुक्तिमुक्ति त्यासी सोडीनात । श्रीकृष्ण मनांत बैसलासे ॥ ८८ ॥ बैसलासे कृष्ण निरंतर वेद- । विधि पैं निषिद्ध लागों नेदी ॥ ८९ ॥ लागों नेदी कृष्ण पाषांडभजन । हें ' करभाजन ' बोले बरें ॥ ९० ॥ बरें वसुदेवा नारदें सांगूनी । श्रीकृष्णा जाणोनि पूर्ण ब्रह्म ॥९१॥ पूर्ण ब्रह्म कृष्ण देवीं विनविला । संपवूं मांडिला अवतार ॥ ९२ ॥

---

१ अर्पावें. २ कृतयुगांत. ३ यज्ञानें. ४ त्रेतायुगांत. ५ पूजनानें.

अवतार संपतां श्रीकृष्णें बोधिलें । ज्ञान प्रगटिलें भक्तांलागीं॥९३॥ भक्तांलागीं मीस केलें उद्धवाचें । श्रीकृष्णें गुह्याचें गुह्य दिल्हें ॥ ९४ ॥ दिल्हें गुह्य जेहीं हृदयीं धरिलें । कलियुगीं वरिलें तेहीं कृष्णा ॥ ९५ ॥ कृष्ण वरूनीयां विश्वंभर झाले । डोल पैं निघाले प्रेममदें ॥ ९६ ॥ मदें कृष्णाचेनि प्रेमळ मातले । अंकणे[2] घातले काळकामा ॥ ९७ ॥ कामीं धामीं कृष्ण जयासी आठवे। तयासी नाठवे मायाजाळ ॥ ९८ ॥ मायाजाळ भक्तां झालें फटकळ[3]। श्रीकृष्ण सांभाळ करी त्यांचा ॥ ९९ ॥ त्यांचा वेळाईत[4] न विसंबे घडी । जाण तो आवडी कृष्ण अंगें ॥ १००॥ अंगे कृष्ण होय जगीं तोचि भक्त । ब्रह्मत्व[5] विरक्त नेघे माथां ॥ १०१ ॥ माथां ब्रम्ह्याचिया कृष्णभक्ति चढे । प्राप्तीसी एवढे पावलासे ॥ १०२ ॥ पावल्याचें सुख त्यातें बोलवेना । कृष्णा हालवेना तयाविणें ॥ १०३ ॥ तयाविणें कृष्णा नामरूप नाहीं । यालागीं तो पाहीं जवळींच ॥ १०४ ॥ जवळींच आहे सगुण निर्गुण । मागें पुढें पूर्ण कृष्णसखा ॥ १०५ ॥ कृष्णसखा आह्मां स्मरणीं असावा । त्याविणें नसावा भाव दुजा ॥ १०६ ॥ दुजा भावो कृष्णा तुजविणें मज । नको रे सहज कदाकाळीं ॥ १०७ ॥ काळीं पहांटेच्या श्रीकृष्ण ओंविया । नित्य जपावया जपमाळ ॥ १०८ ॥ माळ शतावरी अष्ट गणीतसे ॥ रमावल्लभदासें संपूर्णेसी॥ १०९॥ ( पोवाडे चार मिळून अष्टोत्तरशत जपमाळा संपूर्ण. ) कायेनवाचा० ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

(प्र० १९—संतविनवणी ) अंतकाळीं माझे सखे भागवत। हृदयीं नांदत लोभपर ॥ १ ॥ लोभपर बहु नारदु गा माझा । आणि तो रे दुजा व्यासमुनी ॥ २॥ मुनि शुकदेव उद्धव कृपाळु। आणि चवघे मेळु सनकादिक ॥ ३ ॥ कवि इत्यादिक नव

---

१ निमित्त २ प्रहार. ३ तुच्छ. ४ कैवारी. ५ ब्रह्मदेवपणा, ब्रह्मयाचा आधिकार.

मुनिगण । पराशर जाण वामदेव ॥४॥ देव खांबांतुनि प्रल्हादें काढिला । वसिष्ठ पैं आला कृपानिधि ॥ ५ ॥ कृपानिधि पूर्ण उभा मजपाशीं । धर्म द्रौपदीसीं उभा असे ॥ ६ ॥ असे देवहूति उभी कर्दमेसीं । शिव पार्वतीसीं आला असे ॥ ७॥ आला असे भीष्म आणि तो विदुर । रंतिदेव थोर कृपावंत ॥८॥ कृपावंत बहु अंबरीष देखा । रुक्मांगद सखा आवडता ॥९॥ आवडता माझा हनुमंत वीर । बिभषिण थोर रामभक्त ॥१०॥ भक्त हा अक्रूर आणि सदूळसा (?) ।मुचकुंद सरिसा उभा देखे ॥११॥ देखतसे मनीं रंतिदेव सुत । भुरीषण रत हरिपदीं ॥ १२ ॥ पदें दवडिला बळीसी पाताळीं । जडभरत कुळीं वैष्णवांचे ॥ १३ ॥ वैष्णवांचे कुळीं सुदाम ब्राह्मण ।कोरडे पैं कण देवा प्रिय ॥१४॥ प्रिय देवालागीं परीक्षित झाला । ह्मणोनि राखिला गर्भी देवें ॥१५॥ देवें श्रुतदेवा भक्तासम केला । भावें पैं देखिला आवडीच्या ॥१६॥ आवडीचा भाव गोपिकांचा थोर । कृष्णाविणें घर नावडे त्यां ॥ १७ ॥ त्यांच्या ऐसा भाव ऋषिभार्या होता । ह्मणोनि अनंता पावल्या त्या ॥ १८ ॥ त्या हो पुंडलिकाचें थोर महिमान । विटेवरी जाण उभा हरि ॥ १९ ॥ हरीच्या भजनें जनक विदेही । राज्य करुनी पाहीं गुणातीत ॥ २० ॥ गुणातीत ऐसे अनंत पैं झाले । भावें भजिन्नले ह्मणोनियां ॥ २१ ॥ ह्मणोनियां नित्य ध्यातां पैं तयांस । रमावल्लभदास उद्धरला ॥ २२॥श्री॥

(प्र० २०) वांचो रे हा देह वांचो रे । हरिभक्ति नाहीं तरी चेंचो[1] रे ॥ ध्रु० ॥ ध्रुवरायासी पांच वरुषीं । त्यासी पावला हृषीकेशी ॥ १ ॥ प्रल्हादासी दिधले बहु कष्ट । तोचि जाहला भजनें वरिष्ठ ॥ २ ॥ कबीर झाला तो रामभक्त । तुळसी पुष्पें शरीरीं जाहला मुक्त[2] ॥ ३ ॥ नामदेवाचि जाहला भक्त । पांडु-

---

१ मरो. २ कबीराचा देह मृत झाल्यानंतर अर्धा फुलें व अर्धा तुळसीरूप झाला.

रंगीं कुटुंबियासहित ॥ ४ ॥ ज्ञानदेवाचि एकनाथ । जनांसी केलें सनाथ ॥ ५ ॥ अनित्य शरीर तरि ज गुरुकृपें लावावें हरिस्मरणा ॥ ६ ॥ रमावल्लभदास सांगे त्यासी पावला हरि तोही मुक्त ॥ ७ ॥ श्री ॥

यानंतर **उपसंहार** प्रकरणांतील '**हरिनाम मुखीं ज** '**जें जें कांहीं करणें०**'; '**काय करिसी व्रत** '**विश्व पाळीतसे हरि०**'; '**कायेचें कर्म वाचेचें व** हे प्रबंध ह्मणून प्रातःस्मरण संपूर्ण करावें.

(भजन) हरे राम हरे राम, राम राम हरे हरे ।
हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे ॥ १



# प्रकरण २ रें—नित्यनियम.

( मंगलाचरण श्लोक. )

गणेशः शारदा चैव सद्गुरुस्सज्जनस्तथा ।
आराध्यदैवतं गुह्यं सर्वं मे यदुनंदनः ॥ १ ॥
अगजाननपद्मार्कं गजाननमहर्निशम् ।
अनेकदन्तं भक्तानामेकदंतमुपास्महे ॥ २ ॥
गुरुं गणपतिं दुर्गां वटुकं शिवमच्युतम् ।
ब्रह्माणं गिरिजां लक्ष्मीं वाणीं वंदे विभूतये ॥ ३ ॥
अनाद्यायाखिलाद्याय मायिने गतमायिने ।
अरूपाय स्वरूपाय शिवाय गुरवे नमः ॥ ४ ॥
या कुंदेंदुतुषारहारधवला या शुभ्रवस्त्रावृता ।
या वीणावरदंडमंडितकरा या श्वेतपद्मासना ।
या ब्रह्माच्युतशंकरप्रभृतिभिर्देवैः सदा वंदिता ।
सा मां पातु सरस्वती भगवती निश्शेषजाड्यापहा ॥५॥
अचतुर्वदनो ब्रह्मा द्विबाहुरपरोहरिः ।
अभाललोचनः शंभुर्भगवान् बादरायणः ॥ ६ ॥
कर्पूरगौरं करुणावतारं संसारपारं भुजगेंद्रहारम् ।
सदावसन्तं हृदयारविन्दे भवं भवानीसहितं नमामि ॥ ७ ॥
हृदिविकासितपद्मं सार्कसोमाग्निबिंबम् ।
प्रणवमयविकासं यस्य पीठं प्रकल्प्य ॥
अचलपरमसूक्ष्मं ज्योतिराकाशमेव ।
स भवतु मनसो मे वासुदेवः प्रतिष्ठा ॥ ८ ॥
बर्हापीठाभिरामं मृगमदतिलकं कुंडलाक्रांतगंडम् ।
कंजाक्षं कंबुकंठं विकसितवदनं सादरन्यस्तवेणुम् ॥

श्यामं शार्ङ्गं त्रिभंगं सदरुणवदनं भूषितं वैजयंत्या ।
वंदे वृंदावनस्थं युवतिशतवृतं ब्रह्म गोपालवेषम् ॥ ९ ॥
सारैकसारं वेदान्तसारं तत्सारमेको गोपालवेषः ।
भक्तानुग्राही लीलावतारी श्रीकृष्णरूपो मम देवदेवः ॥ १० ॥
ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम् ।
द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम् ॥
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतम् ।
भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥ ११ ॥
आनंदमानंदकरं प्रसन्नं ज्ञानस्वरूपं निजबोधयुक्तम् ।
योगींद्रमीड्यं भवरोगवैद्यं श्रीमद्गुरुं नित्यमहं नमामि १२
जय श्रीकृष्णनाथाय लक्ष्मीधराय निर्मलम् ।
वेदसिद्धान्तगुह्याय सर्वमूलाय ते नमः ॥ १३ ॥
रमावल्लभनाथाय दासानां परिपालिने ।
पूर्णबोधप्रकाशाय श्रीकृष्णाय नमो नमः ॥ १४ ॥

**राधाकांतस्मरण जय गोपाल.**

---

( प्रबंध २१; राग–हमीर कल्याण, ताल–दीपचंदि. )

गणराज गजानन रे । सिंधु आनंदाचा ॥ ध्रु० ॥ ऋद्धि सिद्धीचा दाता, स्वामि त्रैलोक्याचा । योगी ध्याती सप्रेमें, धन्य महिमा त्याचा ॥ चाल ॥ करा घोष या नामाचा । तालमृदंग वीणास्वरें गाऊनी, त्यापुढें लोळा नाचा रे ॥ गणराज० ॥ १ ॥ लाडु मोदक दिव्यान्नें, दुर्वा पुष्पें नाना । ऐसें अर्पुनी त्याला, मग ध्यानीं आणा । विघ्नसंकट पापाचें, भस्म होईल जाणा ॥ चाल ॥ पावे भक्तां श्रीगणराणा । संतति संपत्ति सन्मति सद्गति, दे तो सत्य जाणा रे ॥ गण० ॥ २ ॥ दीनबंधु दया-

र्णव तो, वाचें वर्णूं मी काय । आतां न सोडीं मी या, मोरयाचे पाय । रूप पाहतां डोळां, अहं ममता जाय ॥ चा० ॥ सुख अद्भुत ऐसें होय । दत्त निरंजन आनंद चिद्घन, गोसाविनंदन ध्याई रे ॥ गणराज गजानन रे० ॥ ३ ॥ श्री ॥

( श्लोक ) हंसासनसमारूढे वीणापुस्तकधारिणि ।
गीतवाद्यप्रिये नित्यं नमो देवि सरस्वति ॥ १ ॥

( प्रबंध २२; राग—छायानट, ताल—दादरा. )

शारदे वो शारदे वो । गुरुकृपा निज वरदे वो ॥ ध्रु० ॥ चारी वाचा जेथुनि जनीं । तीच शारदा जननी ॥ १ ॥ अनुहत वीणा करकमळीं । पुस्तक धरि ती एक सकळीं ॥ २ ॥ श्रीरमावल्लभदास मुखांत । सर्व सरस्वति झाली जगांत ॥शारदे०॥ ३ ॥

( प्रबंध २३; राग—छायानट, ताल—धुमाळि. )

अच्युतं केशवं नौमि नारायणम् । कृष्णदामोदरं वासुदेवं हरिं ॥ श्रीधरं माधवं गोपिकावल्लभम् । जानकीनायकं रामचंद्रं भजे ॥१॥ कृष्ण कृष्ण वासुदेव भुक्तिमुक्तिदायकम् । राम राम राम राम रामनाम तारकम् ॥ जानकीमनोहरं सर्वलोकनायकम् । शंकरादिप्रियं नाम पुण्यनामकीर्तनम् ॥ २ ॥ हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे । हरे राम हरे राम राम राम हरे हरे ॥३॥ बोल बोल बोल मना राम राम राम रे । सांडिं सांडिं सांडिं प्राण्या देहअभिमान रे ॥ ४ ॥ यादव रामा माधव रामा, संसारसागरिं तारिं गा आह्मां । यादव हरि माधव हरि, संसारसागर तारिं मुरारि । यादव कृष्णा माधव कृष्णा संसारतृष्णा निवारिं बापा ॥ ५ ॥ हरि पुरुषोत्तम राजाराम । आणिक जिव्हे न करीं काम ॥ केशव माधव मुकुंद हारि । हा जप करीं निरंतरीं ॥ ६ ॥ हरि गोविंद हरि गोपाळ । हरि नारायण विश्वाधार ॥

हरिशीं कीजे मित्राचार । हरि उद्धरि पैलपार ॥ ७ ॥ श्री राम जय राम जय जय राम । अहर्निशीं ध्यान तुझें मंगल नाम ॥ गोविंद राम जय गोपाल राम । यादव राम जय माधव राम ॥ ८ ॥ हरि नारायण दुरितनिवारण, परमानंद सदाशिव शंकर ॥ भक्तजनप्रिय पंकजलोचन, नारायण तव दासोऽहं ॥९॥ देवकीसुत देहि मां तव पादभक्तिमचंचलां । देवदानवनारदादि मुनींद्रवंद्य दयानिधे ॥१०॥ ( मना ) ध्याई रे केशवा, चिंतीं नारायणा । माधव गोविंद विष्णु नाम ह्मणा ॥ मधुसूदन रे त्रिविक्रम ऐसें । वामन श्रीधर तारक हरुषें ॥ ११ ॥ हृषीकेश आणि पद्मनाभ बरा । दामोदर मनीं संकर्षण धरा ॥ वासुदेव आणि प्रद्युम्न सुंदर । अनिरुद्ध पर पुरुषोत्तम सार ॥ १२ ॥ अधोक्षज देव नारसिंह राजा । अच्युत एक तो जनार्दन भजा ॥ उपेंद्र हरि हा कृष्ण पूर्ण ब्रह्म । रमावल्लभदास नित्य गाये नाम ॥ १३॥

( श्लोक ) यौ तौ शंखकपालभूषितकरौ हारास्थिमालाधरौ ।  
देवौ द्वारवतीस्मशाननिलयौ नागारिगोवाहनौ ॥  
द्वित्र्यक्षौ बलिदक्षयज्ञमथनौ श्रीशैल्यजावल्लभौ ।  
पापम्मे हरतां सदा हरिहरौ श्रीवत्सगंगाधरौ ॥ १ ॥

( प्रबंध २४; राग—केदार, ताल—दीपचंदी.)

अच्युता शंकरा ये तूं हरि हरा । सुंदरा श्रीधरा उमापते ॥ वैकुंठवासिया कैलासीं वससीया । गोष्टी ज्ञानाचिया वाढूं दीजे ॥ १ ॥ मुरारि त्रिपुरारि अनंत मदनारी । राघवा तूं तारीं विश्वनाथा ॥ वासुदेव भवा हे शंभु केशवा । महारुद्र माधवा कृपा कीजे ॥ २ ॥ कर्पुरगौरा श्यामा शूलपाणि नामा । नीलकंठ रामा गंगाधरा ॥ देवेशा भूतेशा गोपाळ महेशा । योगिया योगीशा पशुपते ॥ ३ ॥ महाभुजा उपेंद्रा दशभुजा नरेंद्रा ।

गोविंदा यतींद्रा पिनाकपाणे ॥ मुकुंद महाकाला ईश्वर विश्वपाळा । श्रीकृष्ण दयाळा स्कंदपिता ॥ ४ ॥ पीतांबर नेससी गजचर्म मिरवसी । केशरें दिससी भाळीं निका ॥ चंद्र भाळीं तेणें ताप हिरुन घेणें । चंदन नारायणें उटी घ्यावी ॥ ५ ॥ विभूति चर्चन त्रिनेत्र पावन । कमललोचन मत्स्य कूर्म ॥ रुंडमाळा गळां पिशाच आगळा । नंदाचा गोवळा चोर होय ॥ ६ ॥ भुजंग भूषणें लेसी वेडेपणें । गुंजाचें दावणें लेणें कृष्णा ॥ योगियां दुर्लभ भाविकां सुलभ । श्रीरमावल्लभ-दास गाये ॥ ७ ॥

( श्लोक ) शिवस्य हृदयं विष्णुर्विष्णोश्च हृदयं शिवः ।
यथा शिवमयो विष्णुस्सर्वं विष्णुमयं जगत् ॥ १ ॥
नरके पच्यमानस्तु यमेन परिभाषितः ।
किं त्वया नार्चितो देवः केशवः क्लेशनाशनः ॥ २ ॥
गोविंदं दुःखनाशाय भवनाशाय माधवम् ।
केशवं क्लेशनाशाय गोविंदाय नमो नमः ॥ ३ ॥

( प्रबंध २५; राग—छायानट, ताल—धुमाळि. )

[ हें पद आचमनांतील केशवादि चोवीस नामांच्या अर्थास अनुसरून आहे. ]

'केशव' ह्मणतां जलशायी । नामें तारिल सुखदायी ॥ तो नामरूपातीत रे । सद्गुरु सांगे हित रे ॥ १ ॥ 'नारायण' ह्मणे जीवमेळे । लपवी दावी जो खेळे ॥ 'माधव' माया धरिताहे । धरोनि पालन करिताहे ॥ २ ॥ 'गोविंद' उगवी गोविकें[1] । भावें तारिल भाविकें ॥ 'विष्णु' विश्वव्यापका । नेणुनि चळती[2] स्थापका ॥ ३ ॥ 'मधुसूदन' मारी अहंकार । नुरे चित्तीं अविचार ॥ 'त्रिविक्रम' त्रैलोकीं । नामें नुरिजे पैं शोकीं ॥ ४ ॥ 'वामन' ह्मणतां पैं वाचा । अगाध महिमा पैं त्याचा ॥ 'श्रीधर'

---

१ उकलतो, सोडवितो. २ गुंतागुंत, चिजडग्रंथी. ३ बरळतात.

नामें शोभा बरी । देउनि भक्तालागीं वरी ॥ ५ ॥ 'हृषीकेश' ह्मणतां प्रेमें । इंद्रियें दमतीं त्याचे नामें ॥ 'पद्मनाभ' ह्मणतां लीळें । जें जें कल्पे तें तें मिळे ॥६॥ 'दामोदर' उदरीं दावें । ह्मणतां भक्ताधीन भावें ॥ 'संकर्षण' ह्मणतां सार । जळती पापाचे संभार ॥ ७ ॥ 'वासुदेव' सर्वीं वसे । नाम घेतां दुरी नसे ॥ ह्मणतां 'प्रद्युम्न' नामासी । मदन पीडिना भक्तांसी ॥८॥ 'अनिरुद्ध' ह्मणतां मुखीं । आवरिला जो नवंजे[1] दुःखीं ॥ ह्मणतां नाम 'पुरुषोत्तम' । अनुभव पाविजे परम ॥ ९ ॥ ह्मणतां 'अधोक्षज' देवो । अधोगतीचा नाहीं भेवो ॥ ह्मणतां 'नरसिंह' नामासी । सकळीं देखे श्यामासी ॥ १० ॥ ह्मणतां 'अच्युत' प्रेमानें । अविनाशी तो नेमानें ॥ ह्मणतां 'जनार्दन' वाणीं । जन्म मरण दृष्टीं नाणी ॥ ११ ॥ 'उपेंद्र' नाम घेतां प्रीतीं । इंद्रादिक त्यासी स्तविती ॥ 'हरि' ह्मणतां संदेह पळे । हरी वासना भ्रांति गळे ॥ १२ ॥ 'श्रीकृष्ण' ह्मणवुनि नमस्कार । करितां सार हा संसार ॥ रमावल्लभदास्य फळे । चोवीस नामें घ्या केवळें ॥ १३ ॥ श्रीः ॥

(श्लोक) नमामि नारायणपादपंकजम् । करोमि नारायणपूजनं सदा ।
वदामि नारायणनाम निर्मलम् । स्मरामि नारायणतत्त्वमव्ययम् १
मत्स्याश्वकच्छपनृसिंहवराहहंस- राजन्यविप्रविबुधेषु कृतावतारः ।
त्वं पासि नस्त्रिभुवनं च यथाधुनेश । भारं भुवो हर यदूत्तम वंदनं ते २

( प्रबंध २६; राग–झिंजोट, ताल–दीपचंद. )

[ भगवंताच्या २४ अवतारांचें पद. भागवत स्कं. ११ अ. ४ ]

बदरि 'नारायण' आदि नरा । नमो अगणित शांतपरा ॥ 'हंस' स्वरूप प्रबोधका । नमो मानसशोधका ॥ १ ॥

---

१ जात नाहीं.

' अनसूयानंदन ' व्यापका । नमो अद्वयस्थापका ॥ ' सनकादिकां ' ब्रह्मभूता । नमो विरंचि–मानससुता ॥ २ ॥ परमहंस ' ऋषभ ' देवा । नमो भव हा जीवशिवा ॥ मधुकैटभनाशा ' हयग्रीवा ' । नमो अभिनव देवदेवा ॥ ३ ॥ वेदोद्धारा ' मीनदेहकां[1] ' । नमो कंबुकरग्राहका[2] ॥ मंदराचलधर ' कमठतना[3] ' । नमो रक्षक सर्व जना ॥ ४ ॥ हिरण्याक्षमर्दन धरणीधरा । नमो ' वराह ' दीर्घपरा ॥ ' नारसिंह ' प्रल्हादवरा । नमो उद्भट रूपधरा ॥ ५ ॥ ' त्रिविक्रम ' बटुरूपा । नमो बंधन बलिभूपा ॥ ' नक्रगजेंद्रउध्दारका ' । नमो पीडा–भवहारका ॥ ६ ॥ निधिवासानिवासा सुखेधका । नमो ' राहुमुंडछेदका ' ॥ आर्तत्राण ' ऋषिरक्षका ' । नमो उत्कट प्रेमलक्षका ॥ ७ ॥ ' बाळमुकुंद ' मायिना । नमो वटपत्रशयना ॥ ' सर्वऔषधिपोषणकारणा ' । नमो नामें जगत्रयतारणा ॥८॥ ' हत्याविभागनइंद्रेशा ' । नमो निर्मल चंद्रेशा ॥ ' लवणमर्दन ' कमलेशा । नमो सज्जन अमलेशा ॥ ९ ॥ ' जमदग्निसुता ' तारका । नमो कार्तवीर्यार्जुनमारका ॥ ' बौद्धरूपा ' बुद्धिमया । नमो अतिगति लाघविया ॥ १० ॥ कलियुगनिवारक धर्मधरा । नमो ' कल्किरूप ' भक्तपरा । ' दशकंठनिकंठकारका ' । नमो नामें जगत्रयतारका ॥ ११ ॥ ' श्रीकृष्णा ' सर्व प्रकाशना । नमो पूर्णब्रह्म अनिर्वचना ॥ रमावल्लभदासवत्सला । नमो सद्गुरु तूं सकळा ॥ १२॥

( श्लोक ) अहो भाग्यमहो भाग्यं नंदगोपव्रजौकसाम् ।
यन्मित्रं परमानंदं पूर्णं ब्रह्म सनातनम् ॥ १ ॥
अहो भाग्यवती देवी यशोदा नंदगोहिनी ।
यदंके कृष्णमादाय मुखं चुंबति सादरम् ॥ २ ॥

---

१ मत्स्यावतारा. २ शंख धारण करणाऱ्या. ३ कूर्मावतारा.

( प्रबंध २७ ; राग–देस. ताल–त्रिवट. )

मम हृदयनिवासा श्रीकृष्णा । नमो शमो हे भवतृष्णा ॥ स्वप्रकाशा सांवळिया । बहु कृपेच्या कोवळिया ॥ १ ॥ अजन्मया कान्हया । देवकीनंदन तान्हया ॥ चांचर केशीं सहस्रशिरा । मोरमुकुट वाहसी बरा ॥ २ ॥ तव अभाळ भाळीं नागर । मृगमदमिश्रित केशर ॥ अभ्रुवा भ्रुकुटी तीक्ष्ण । शोभति वारिज ईक्षण ॥ ३ ॥ अकर्णा कर्णीं कुंडलें । सरळ नासिक मांडलें ॥ अधर विद्रुम रंगती । माजीं दर्शन झगझगती ॥४॥ तव कंठ निर्मळ गोजिरा । वक्षीं कौस्तुभ साजिरा॥ हरि विश्वबाहू दों बाहीं । आजानु दिसती तव पाहीं ॥ ५ ॥ तुझें हृदय सखोल नेणें मना । पदकीं मुक्तें मुक्त जना ॥ वैजयंति आपाद रूळतसे । सप्रेम अलिकुल घोळतसे ॥ ६ ॥ पीतवसन कटिं मेखळा । वाजति किणिकिणि प्रेमळा ॥ पदीं तोडर वांकी गर्जन । बोलति दानवतर्जन ॥ ७ ॥ तुज तळव्या माणिक रंगलें । अरुण मान भंगलें ॥ तुझे पदअंगुष्ठीं स्थिर गोदा । पवित्र करितो अनुमोदा ॥ ८ ॥ नखचंद्रीं जी रससुधा । प्राप्त ज्या त्या नाहीं क्षुधा ॥ ऐसी गोडी घेतो शंकर । महायोगि जयाचे किंकर ॥ ९ ॥ क्रीडे आपणामाजीं आपण । व्रजपुरवासी हा रमण ॥ रत्नजडितकांबळ पांघुरे । वेणु वाहतां वाहतां विचरे ॥ १० ॥ पाहतां पाहणें नुरे । या ऐकतां ऐकणें पुरे ॥ ह्यासि सांगतां सांगणें मुरे । ह्या पूसतां पुसणें झुरे ॥११॥ ह्यासि कल्पितां कल्पणें विरे । या वानितां वानणें सरे ॥ ऐसें देखणें तें हो बरें । श्रीरमावल्लभदास खरें ॥ १२ ॥ श्री॥

( श्लोक ) फुल्लेंदीवरकांतिमिंदुवदनं बर्हावतंसप्रियम् ।
श्रीवत्सांकमुदार कौस्तुभधरं पीतांबरं सुंदरम् ॥

---

१ पोंवळीं. २ दांत. ३ पायापर्यंत. ४ भ्रमरसमुदाय. ५ असुरांना भीतिप्रद. ६ गंगा.

गोपीनां नयनोत्पलार्चिततनुं गोगोपसंघावृतम् ।
गोविंदं कलवेणुवादनपरं दिव्यांगभूषं भजे ॥ १ ॥

( ओंव्या ) विकासलें कमल जैसें । स्वामीचें चंद्रवदन तैसें । माथां मयूरपत्र कैसें । मुकुटाचें तेज प्रिय ॥ १ ॥ श्रीवत्सांकित उदार । कौस्तुभ धरिले कंठीं हार । पीतांबरें साचार । सुंदर श्याम शोभे ॥ २ ॥ गोपिका नयनोत्पलीं[1] नेमें । तनु अर्चिताति सप्रेमें । गाई गोपाळीं वेष्टिला, क्षेमें[2] । राहिजे ,नाम-स्मरणें ॥ ३ ॥ जय गोविंद गोपाळ हरि । वेणुनादें तल्लीन करी । दिव्यांग भूषणें बरीं । मूर्ति आह्मे मनांत ॥ ४ ॥ मनांत पाहतां मन मावळे । मग श्रीगोपाल सर्वही वळे[3] । मीतूंपण हें नाढळे । श्रीरमावल्लभदास्य फळे ॥ ५ ॥

( प्रबंध २८, राग--झुंजोट, आदिताळ. )

श्रीकृष्ण जय जय श्रीकृष्ण जय जय । जय जय ह्मणतां नाहीं भवभय ॥ ध्रु० ॥ श्रीकृष्ण आदि, श्रीकृष्ण अंत । श्रीकृष्ण मध्य ऐसें, बोलति संत ॥ १ ॥ श्रीकृष्ण स्थूल, सूक्ष्म कारण । ज्ञानविज्ञानघन, श्रीकृष्ण आपण ॥ २ ॥ श्रीकृष्ण देव, श्रीकृष्ण भक्त । श्रीकृष्ण विषयी[4], महाविरक्त ॥ ३ ॥ श्रीकृष्ण भोगी नारी, श्रीकृष्ण ब्रह्मचारी । श्रीकृष्णा भाळल्या वो तरुण कुमारी ॥ ४ ॥ श्रीकृष्ण जय रमावल्लभ-दास गाय । श्रीकृष्ण सकळिक, होउनी ठाय ॥ ५ ॥

( श्लोक ) खं वायुमग्निं सलिलं महीं च । ज्योतींषि
सत्वानि दिशोद्रुमादीन् ॥ सरित्समुद्रांश्च हरेः शरीरम् ।
यत्किंच भूतं प्रणमेदनन्यः ॥ १ ॥

( प्रबंध २९ ; राग—बिहाग. ताल—आदिताल. )

गुरूचा वेगीं घ्यावा हस्तक । त्याच्या ठेवुनियां चरणीं

१ नेत्रकमलांनीं. २ सुखानें. ३ पावतो, स्वाधीन होतो. ४ संसारी, भोगसंपन्न.

मस्तक ॥ तो तो मुक्त येर बंधयुक्त । त्यासी तारीना पुस्तक । चतुरा ॥ गुरूचा० ॥ १ ॥ सौर शाक्त गाणपत्य । शैव वैष्णव ज्ञान वदती ॥ परंतु गुरुपाय, न धरितां भेद ठाय ॥ संत त्यां मूर्ख ह्मणती । चतुरा ॥ गुरूचा०॥ २ ॥ देवाचा मंत्र घेईजे । देव तो मंत्र जाणिजे ॥ मंत्र देव गुरु, तोडी भेद अंकुरु । हेंच स्वहित ह्मणिजे ॥ चतुरा ॥ गुरूचा० ॥ ३ ॥ मानवरूप साक्षात । गुरु न करितां निभ्रांत ॥ स्वप्नीं प्रगट तो, स्वप्नींचा नट । साच नव्हे सिद्धांत । चतुरा ॥ गुरूचा०॥ ४ ॥ आदि गुरु अवतार । श्रीकृष्ण उदार ॥ गुरुघरीं काष्ठ वाहे, प्रसिद्ध बोल आहे । गुरु मार्ग स्थापिताहे । चतुरा ॥ गुरूचा० ॥ ५ ॥ कलयुगीं नामदेव । त्यासी बोलत होता केशव ॥ सत्य न मानिति संत, मग गुरु स्वतंत्र । खेचर विसोबा स्वयमेव । चतुरा ॥ गुरूचा०॥६॥ परमात्मा गुरु संत एक । जगीं पाहतां अनेक ॥ गुरुमुखीं श्रवण, संतमुखीं दृढीकरण। घे तूं मना विवेक । चतुरा ॥ गुरूचा० ॥७॥ वेदशास्त्रपुराण मात । गुरुविण गति नाहीं ह्मणतात ॥ श्रीरमावल्लभदास, सांगुनियां उदास। न मानितां केला आपुला घात । चतुरा ॥ गुरूचा० ॥ ८ ॥ श्री ॥

( श्लोक ) नृदेहमाद्यं सुलभं सुदुर्लभम् । प्लवं सुकल्पं गुरुकर्णधारम् । मयानुकूलेन नभस्वतेरितम् । पुमान् भवाब्धिं न तरेत्स आत्महा ॥ १ ॥

( आर्या ) मर्दितरावणकंसौ सरयूयमुनाविहारिणौ देवौ । अर्पितविप्रकुमारौ हरिपतिहरिकेतनाप्रियौ वन्दे ॥ २ ॥

( श्लोक ) यः पूतनामारणलब्धकीर्तिः । काकोदरो येन विनीतदर्पः । यशोदयालंकृतमूर्तिरव्यात्पतिर्यदूनामथवा रघूणाम् ॥ ३ ॥

( प्रबंध ३०; राग-कापि, ताल-त्रिवट. )

कृष्णा रामा रे, सखया कृष्णा रामा रे । आनंद-धामा रे, माझ्या पूर्णकामा रे ॥ ध्रु० ॥ कृष्णा पुतनिशोषण, रामा ताट-किखोंचण । शोषण खोंचण, माझ्या कृष्णा रामा रे ॥ १ ॥ कृष्णा शकटदंडण, रामा धनुषखंडण । दंडण खंडण, माझ्या कृष्णा रामा रे ॥ २ ॥ कृष्णा गुह्यकउद्धरण[1], रामा अहल्याता-रण । उद्धरण तारण, माझ्या कृष्णा रामा रे ॥ ३ ॥ कृष्णा व्रजनारिखेळण, रामा वानरमेळण । खेळण मेळण । माझ्या कृष्णा रामा रे ॥ ४ ॥ काळयवनदलन, विकटतालछेदन[2] । दलन छेदन, माझ्या कृष्णा रामा रे ॥ ५ ॥ कृष्णा यदुकुल-हर्षण, रामा रघुकुलभूषण । हर्षण भूषण, माझ्या कृष्णा रामा रे ॥ ६ ॥ कृष्णा भीमकीहरण, रामा जानकीवरण । हरण वरण, माझ्या कृष्णा रामा रे ॥७॥ रमावल्लभदास्यपण, कृष्ण देतो आपण । तुझें चरण स्मरण[3], माझ्या कृष्णा रामा रे ॥८॥

( श्लोक ) सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः ।
नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १ ॥
( श्लोक ) वाणी गुणानुकथने श्रवणौ कथायाम् ।
हस्तौ च कर्मसु मनस्तव पादयोर्नः ॥
नित्यं शिरस्तव निवासजगत्प्रणामे ।
दृष्टिः सतां दर्शनेऽस्तु भवत्तनूनाम् ॥ २ ॥
जिव्हे कीर्तय केशवं मुररिपुं चेतो भज श्रीधरम् ।
पाणिद्वंद्व समर्चयाच्युतकथां श्रोत्रद्वय त्वं शृणु ॥
कृष्णं लोकय लोचनद्वय हरेर्गच्छांघ्रियुग्मालयम् ।
जिघ्र घ्राण मुकुंदपादतुलसीं मूर्धन्नमाधोक्षजम् ॥ ३ ॥

---

१ यमलार्जुन वृक्षरूपी दोघे कुबेरपुत्र यांचा उद्धार करणारा. २ सुग्रीवाच्या सांगण्या-वरून रामानें एका रेषेंत नसलेले सात ताडवृक्ष एका बाणानें छेदले. ३. पा. भे. 'शरण.'

( प्रबंध ३१; राग—झुंजोट. ताल—त्रिवट. )

। गोपालराया तुज नमो । पुरे संसार माया मोह शमो । कथा श्रवणीं तुझी पडो । नयनीं रूप तुझें जडो ॥ ... य घ्राणा रुचो हरि । वैष्णव रज त्वचेवरी ॥ १ ॥ रसनीं ाष तुझें घेणें । करां पूजा तुझी देणें ॥ तुझें अधिष्ठान आहे जेथें । ारण जावो वेगीं तेथें ॥ २ ॥ उच्चार वाचे तुझा असो । ानसीं ध्यान तुझें वसो ॥ निश्चय बुद्धि तुझी धरो । चित्त हें ंतन तुझें करो ॥ ३ ॥ रमावल्लभदास सदा । तुझाचि तूं अन्य नाहीं ्दा ॥ नंदनंदना मन दमो । सर्व वासना तुझ्या पायिं शमो ।४॥ इंद्रियवृत्ती उपरमो । स्वरूप गोडी तेथ रमो ॥ रमावल्लभ- ास्य गमो । भेदाभेदातीत नमो ॥ माझ्या सद्गुरुराया० ॥५॥

( श्लोक ) समचरणसरोजं सांद्रनीलांबुदाभम् ।<br>
जघननिहितपाणिं मंडनं मंडनानाम् ॥<br>
तरुणतुलसिमालाकंधरं कंजनेत्रम् ।<br>
सदयधवळहासं विठ्ठलं चिंतयामि ॥ १ ॥

( प्रबंध ३२ ; राग—जोगी असावरी. ताल—धुमाळी. )

मी अनाथ सांवडें तुझें दीन रे विठोबा । सनाथ करावें त्वां अभिन्न रे विठोबा । मनांत वाटत बहु शीण रे विठोबा । या ानांत न घालीं एक क्षण रे विठोबा ॥ १ ॥ येईं रे विठोबा येईं ॥ ध्रु० ॥ येईं रे येईं रे प्रेमरंगा विठोबा । नेईं रे नेईं रे भव ंगा विठोबा । घेईं रे घेईं रे ओसंगा विठोबा । मज देईं रे देईं रे साधुसंगा विठोबा ॥ येईं रे० ॥ २ ॥ जिवलग जगीं दुजें नाहीं रे विठोबा । जीव काकुळती तुजला पाहिन रे विठोबा । जीवाची अहंता तोडुनि राहीं रे विठोबा । जीवाशिव साधक

---

१. गरीब, भोळें माणूस. २. मांडीवर.

सकाळिक हरि आहे । भक्त तेही आपण होये ॥ ७ ॥ कैंचा
रमावल्लभदास । अवघा हरीचा विलास ॥ ८ ॥

( श्लोक ) नवाभ्रनीलं नवनीतलोलं रमानुकूलं रमणीयचैलम् ।
श्रृंगारलीलं करुणालवालं वंदे सुशीलं वसुदेवबालम् ॥ १ ॥
गोपालरत्नं भुवनैकरत्नं गोपांगनायौवनभाग्यरत्नम् ॥
श्रीकृष्णरत्नं सुरमौलिरत्नं भजाम्यहं यादववंशरत्नम् ॥ २ ॥

( प्रबंध ४२; राग—ललित. ताल—दीपचंदी. )

गोपाळु पावला । स्वामी माझा गोविंदु पावला ॥ ध्रु० ॥
अंतर्यामीं मजला स्वामी । अखंडु राहिला ॥ स्वामी माझा० ॥ १ ॥
करुणाकर करुणासागर । मजलागीं तारिला ॥ स्वामी० ॥ २ ॥
निराधार देखुनी उदार । त्वरित धांवला ॥ स्वामी० ॥ ३ ॥
नेणे लाघव कोणीही मानव । भक्तांसी पावला ॥ स्वामी० ॥ ४ ॥
श्रीरमावल्लभ-दास स्वयंभू । प्रेमें हो लाधला ॥ स्वामी० ॥ ५ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



# प्रकरण ३ रें—वारानियम.

## ( १ ) रविवारनियमः । *

( श्लोक ) यद्दर्शनं निगमगीतरहःप्रकाशम् । मुह्यन्ति यत्र कवयो जपका यतन्तः ॥ तं सर्ववादविषयप्रतिरूपशीलम् । वन्दे महापुरुषमात्मनिगूढबोधम् ॥ १ ॥

( प्र० ४३ ) नित्यानित्यविवेक ज्याचेनि भासे । सारासार निवाड होउनी वसे । भेदाभेद विरला असे । तो कृष्ण मनांत चिंतियला ॥ १ ॥ मतें नाना ऐक्या आलीं जयांत । षड्दर्शनें तटस्थ होत । प्रकृति पुरुष हेहि नुरे मात । तो कृष्ण मनांत चिंतियला ॥ २ ॥ क्षराक्षर जयांत लोपे । वेदांतसिद्धांत हारपे सोपे[२] । तत्त्वमसि वाक्य खुंटलें त्यापें[३] । तो कृष्ण मनांत चिंतियला ॥ ३ ॥ ज्याच्या कीर्तनें कीर्ति कीर्तिसी । ज्याच्या विचारें बोध बोधासी । ज्याचा अनुभव भुक्तिमुक्तिसी । तो कृष्ण मनांत चिंतियला ॥ ४ ॥ कल्पांबु डोळां देखिले जेहीं । भूमिजल तया विस्मयो नाहीं । तैसा पूर्ण कृष्ण ओळखावा पाहीं । मग उरि[४] कांहीं नसे मना ॥ ५ ॥ ऐसें मन ज्याचें कृष्णीं जडलें । कृष्णें आपण त्या सवें[५]साटी केलें । रमावल्लभ-दास बोले । कोण ऊरलें कृष्णाविण ॥ ६ ॥ श्रीः ॥

( प्र० ४४ ) ज्याचेनि श्रवण, ऐकती वचन । हरि तो ज्ञानघन, आपण आहे बाप ॥ १ ॥ ज्याचेनि नयन, पाहती रूप गहन । हरि तो ज्ञानघन, आपण आहे बाप ॥ २ ॥ ज्याचेनि जिव्हा, करि रसस्वादन । हरि तो ज्ञानघन, आपण आहे बाप

---

* द्वादशीस जन्मकथा करण्याचा सांप्रदाय ज्या ठिकाणीं असेल, तेथें रविवारानियम एकादशीसही ह्मणावा. १ सहा शास्त्रें. २ आज, आतां. ३ त्यापाशीं. ४ उरणें. ५ समान, बरोबर.

दशा दावीं रे विठोबा ॥ ३ ॥ वायां कां लोटसी दिनमान रे विठोबा । जायाचे देहाचें नलगे ध्यान रे विठोबा । मी या सर्वी सर्व तुजला पाहिन रे विठोबा । तुझ्या पायांची आरति बहुत वाहिन रे विठोबा ॥ ४ ॥ न करीं विलंब न्यावें मज रे विठोबा । लवकरि पाठवीं गरुडध्वज रे विठोबा । रंक हें आपुलें ह्मणवुनि बूझ रे विठोबा । स्वीकार करवावें संतरज रे विठोबा ॥ ५ ॥ आतां राहीं तूं मानसीं सावकाश रे विठोबा । वेगीं अंतर्बाह्य दिसे आस रे विठोबा । राहिला त्रिपूटीचा भास रे विठोबा । पाहिला श्रीलक्ष्मीधर-दास रे विठोबा ॥ येई रे० ॥ श्रीः ॥

( श्लोक ) विठोबा हा शौरी त्रिभुवन दिसे रम्य उदरीं ।
सुरांचा कैवारी परम शिव याचा जप करी ॥
उभा भीमातीरीं कटिवर कराब्जें बहु बरीं ।
भवाचा हा वैरी प्रगट दिसतो पंढरपुरीं ॥ १ ॥

(प्रबंध ३३; राग—पंचम, ताल—त्रिवट.)

पंढरपूरिं वसे । विठोबा पंढरपूरिं वसे ॥ ध्रु० ॥ विश्व हें पंढरी माजिं निजात्मा । सहज नांदतसे ॥ विठोबा० ॥ १ ॥ गुरुकृपा अंजन लेवुनि पाहतां । सबराभरि दिसे ॥ विठोबा० ॥२॥ श्रीगुरु विठ्ठल राज दयार्णव । राघव ध्यात असे ॥ विठोबा० ॥ ३ ॥

( श्लोक ) विकारो विधिकर्ता च ठकारः शंकरः स्वयम् ।
लकारो लक्ष्मीकान्तश्च विठ्ठलेति प्रकीर्तितम् ॥ १ ॥

( प्रबंध ३४ ; राग—सोहिनि, ताल—त्रिवट. )

विठ्ठल वाचें बोल, घडि घडि विठ्ठल वाचें बोल ॥ ध्रु० ॥ विठ्ठलनाम सुधारस सेवुनि ॥ विठ्ठल प्रेमें डोल ॥ घडि घडि० ॥ १ ॥ आसनीं शयनीं भोजनीं गमनीं । वद हें नाम अमोल ॥

---

१. उसना आणलेल्या. २. समज.

घडि घडि० ॥ २ ॥ तरला राघव विठ्ठलनामें । पाहतां रूप सखोल ॥ घडि घडि० ॥ ३ ॥

(श्लोक) जो शोभे यमुनातटीं द्रुमतळीं जो वेष्टिला गोकुळीं।
जो खेळे शिशु गोवळीं मुरलीच्या नादेंचि गायी वळी ॥
ऐसी मूर्ति महेश ही हृदि[1] अहो ध्यातो सदा सांवळी ॥
तो हा विठ्ठल राउळीं तुह्मि पहा तोडील जन्मावळी ॥ १ ॥

(प्रबंध ३५; राग—जोगी, ताल—दीपचंदि.)

येथेंचि पंढरपूर । माझें येथेंचि पंढरपूर ॥ आह्मां जाणें लगे दूर ॥ माझें० ॥ ध्रु० ॥ अणुरेणु व्यापुनि, भरोनि असतां । कसें ह्मणावें दूर ॥ माझें० ॥ १ ॥ संत भिमातिर, भक्ति पुंडलिक । आत्मा विठ्ठल ऊर[1] ॥ माझें० ॥ २ ॥ सद्गुरु-कृपें केशव ह्मणे । नको करूं हुरहूर[2] ॥ माझें० ॥ ३ ॥

(श्लोक) ज्ञानी गंभीर मौनी करयुग जघनीं[3] कुंडलें दिव्य कानीं।
गर्भीं हे लोक तीन्ही रवि शशि नयनीं देव भक्ताभिमानी ॥
दाता मोक्षप्रदानी सकल सुरमुनी वंदिती पाय दोनी ।
ऐसी ही मूर्ति वंद्या भवभयशमनी पांडुरंगाभिधांनी[4] ॥ १ ॥

(प्रबंध ३६; राग—वसंत, ताल—त्रिवट.)

श्रीराज श्रीरंग श्रीगुरु गाईजे । पुंडलिक वरद, अंतरीं त्वां ध्या-इजे ॥ ध्रु० ॥ विटेवरी नीट उभा, ठेवुनियां कटीं कर । चंद्र-भागातटीं, वाट पाहे मनोहर ॥ १ ॥ ज्ञान अनुभव नाहीं, मूढ पतित जन । मुक्त होती दरुशनें सत्य सत्य हें वचन ॥ २ ॥ रमावल्लभदास बोले ही वाचा । हस्तक मस्तकीं त्याचा गुरुकृपें साचा ॥ ३ ॥

(श्लोक) जो वेदीं स्तविला जगीं प्रगटला जो ब्राह्मणीं वंदिला ।
नंदें खेळविला वनीं विचरला[5] गोपांगनीं वेष्टिला ॥

---

१ हृदय. २ चिंता. ३ कंबरेवर. ४ पांडुरंग नांवाची. ५ फिरला.

आनंदें भरला भरोनि उरला भक्तांपुढें राहिला ।
तो हा विठ्ठल पंढरीसि नयनीं भीमातिरीं पाहिला ॥ १ ॥

( प्रबंध ३७; राग—परज. ताल—दादरा. )

सखया कृष्णा तुजविण कोणी नाहीं रे ॥ तूं धांव लवलाहीं रे, तूं मनीं माझ्या राहीं रे ॥ तूं भिन्न नव्हसी कांहीं रे ॥ ध्रु०॥ तुजविण नाहीं सुख रे । तुजविण सर्वहि दुःख रे ॥ पाहिन तूझें मुख रे । होंईं तूं सन्मुख रे ॥ सखया०॥ १ ॥ तुजविण मी तव दीन रे । तूं जळ मी तव मीन रे ॥ मी तुजला पाहीन रे । मी तुजमाजीं राहीन रे ॥ २ ॥ हे देहबुद्धि तोडीं रे । आत्मबुद्धि जोडींरे ॥ माझी विषयगोडी मोडीं रे । मज मुक्त करवुनि सोडीं रे ॥ ३ ॥ हें मी माझें बंधन रे । आतां करीं तूं छेदन रे ॥ करिं सुखी माझें मन रे । भेटविं आपुले जन रे ॥ ४ ॥ त्वां न व्हावें उदास रे । मज लौकिकाचा त्रास रे ॥ ह्मणे रमा-वल्लभदास रे । तुझीच करीन आस रे ॥ सखया०॥ ५ ॥ श्री ॥

( श्लोक ) अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ १ ॥

( प्रबंध ३८; राग—पिलु. ताल-दीपचंदी. )

करिसी तूं करीं मज, अर्पिला देह तुज । तुजवरुतें गुज, न दिसे रे व्यापका ॥ ध्रु० ॥ शिस सुरी करीं, तुझ्या निरंतरीं । तारीं अथवा मारीं हरि, शरण आलों व्यापका ॥ १ ॥ रायासी रंक भावो, रंकासी करिसी रावो । राई मध्यें देसी ठावो । डोंगरासी व्यापका ॥ २ ॥ तुझा जो झाला जनीं । प्रगट तूं तया मनीं । भय नाहीं त्रिभुवनीं, तुझ्या नामें व्यापका ॥ ३ ॥ मायादि काळसत्ता, धरुनी तूं क्रीडता । अहंकारगुणा

परता, नादसी तूं व्यापका ॥ ४ ॥ तूंतें बोलायास, नाहीं मजला भास । ह्मणे रमावल्लभदास, तुझेनि सत्तें व्यापका ॥ ५ ॥

( श्लोक ) सजलजलदनीलं दर्शितोदारलीलम् ।
श्रितसुरतरुमूलं विद्युदुल्हासचैलम् ॥
नतसुरमुनिजालं सन्मनोबिंबलीलम् ।
सुररिपुकुलकालं नौमि गोपालबालम् ॥ २ ॥

( प्रबंध ३९ ; राग—कलिंगडा. ताल—दीपचंदी. )

भज रे गोपालं । मानस भज रे गोपालं ॥ ध्रु० ॥ भज गोपालं, भजनसुचेलं । त्रिजगन्मूलं, दितिसुतकालं ॥ १ ॥ आगमसारं, योगविचारं । भोगशरीरं, भुवनोद्धारं ॥ २ ॥ धृतमंदारं, नंदकिशोरं । हतचाणूरं, हंसविहारं ॥ ३ ॥ कदनकठोरं, कलुषविदूरं । मदनकुमारं, मधुसंहारं ॥ भज रे० ॥ ४ ॥

( श्लोक ) हरेर्नाम्नैव नाम्नैव नाम्नैव मम जीवनम् ।
कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा ॥ १ ॥

( प्रबंध ४०; राग—परज, कालिंगड. ताल—त्रिवट. )

हरि होउनि हरिगुण गावे । तेणें आपणा उद्धरावें ॥ १ ॥ स्वयें हरि झाला नाहीं । तोंवरि हरिभक्ति कैंची पाहीं ॥ २ ॥ नये स्वयें हरिपण ज्यासी । हरिभक्ति कैंची त्यासी ॥ ३ ॥ रमावल्लभदास हरि । आपुली कथा आपण करी ॥ हरि० ॥ ४ ॥

( प्रबंध ४१ ) हरिसी रिघतां शरण । आमुचें गेलें आह्मीपण ॥ १ ॥ आतां बोले चाले हरि । त्याची कथा तोचि करी ॥ २ ॥ होऊनियां श्रोता वक्ता । करी अपुली आपण कथा ॥ ३ ॥ तोचि झाला जन वन । तोचि मनाचें पैं मन ॥ ॥ ४ ॥ तोचि बुद्धीचा निश्चय । चित्ता चिंतन-उदय ॥ ५ ॥ तोचि अहं सोऽहं झाला । अहं सोऽहं गिळोनि ठेला ॥ ६ ॥

॥ ३ ॥ ज्याचेनि त्वचा, पांघुरे वसन । हरि तो ज्ञानघन, आपण आहे बाप ॥ ४ ॥ ज्याचेनि घ्राण, गंध घे पवन । हरि तो ज्ञानघन, आपण आहे बाप ॥ ५ ॥ रमावल्लभदास, मानी प्रेमसण । हरि तो ज्ञानघन, आपण आहे बाप ॥ ६ ॥

(प्र० ४५) साच तो दोर, मिथ्या सर्पाकार । तैसा हा संसार, कळला आत्मा बाप ॥ १ ॥ सत्य ते शिंपी, मिथ्या रजताकार । तैसा हा संसार० ॥ २ ॥ सत्य ते भिंती, मिथ्या चित्राकार । तैसा हा संसार० ॥ ३ ॥ सत्य रवितेज, मिथ्या जलाकार । तैसा हा संसार० ॥ ४ ॥ सत्य जाग्रर्ति झाला, मिथ्या स्वप्नाकार । तैसा हा संसार० ॥ ५ ॥ साच तो सागर, मिथ्या तरंगाकार । तैसा हा संसार० ॥ ६ ॥ सत्य रमावल्लभ, मिथ्या दासाकार । तैसा हा संसार, कळला आत्मा बाप ॥ ७ ॥

(प्र० ४६) पराशरवीर्यसार । सत्यवतीसुत अपार । त्याचें उच्छिष्ट निरोपण । जग सेवि अनुच्छिष्टपण ॥ १ ॥ वेदव्यास श्रीवेद वदायास । भगवंत खास नमन माझें त्यास ॥ ध्रु० ॥ चारी मुखें नाहीं होत । ब्रह्मा होय सृष्टिसहित । चारी भुज नाहींच परी । विष्णु होय अवतार धरी ॥ २ ॥ भाळीं लोचन नाहीं । शंभु होय प्रळया पाहीं । तोचि रमावल्लभदास । देखे जगद्विवर्तभास ॥ ३ ॥ श्रीः ॥

(प्र० ४७) गरुडवाहन हरि, करुणा तुझी बरी । धरुनि सगुणपरी न येसी कां गा ॥ ध्रु० ॥ कामना तुझी धरी, नमन साच करी । श्याम दीननाथ घरीं, न येसी कां गा ॥ २ ॥ भवसर्पें डंकियेलें, जडभान नाहीं गेलें । तंव निष्ठुरपण केलें, न येसी

---

१ 'व्यासोच्छिष्टं जगत्सर्वं.' २ "अचतुर्वदनो ब्रह्मा द्विबाहुरपरो हरिः। अभाललोचनः शंभुर्भगवान्बादरायणः ॥"

कां गा ॥ ३ ॥ ह्मणे रमावल्लभदास, भक्तां तुझी आहे आस। सर्व तूंचि अनुभवास, न येसी कां गा ॥ ४ ॥ श्रीः ॥

(प्र० ४८) अहिअरिवरि बैसुनि येई हरि। भवसर्पें डंकीयलें उतरीं विष झडकरी ॥ ध्रु० ॥ मीपणाचा झेंडू आला, प्राण तेथें गोळा झाला। उच्चार न येचि बरवा, काय करूं मी याला ॥ १ ॥ अविचार लहरी येती, स्मरण समूळ नेती। गोड बोध कडू लागे, विषयविष गा घेती ॥ २ ॥ सज्जनांची निंदा घडे, हाचि फेंस मुखीं चढे। निरूपणीं बैसवेना, तोंचि ताठा गा जडे ॥ ३ ॥ पंचाक्षरी त्रिजगतीं, नाम तुझें यादवपति। धांवे पावे गा मजलागीं, ऐसी ऐकुनी विनंति ॥ ४ ॥ ऐसे ऐकुनियां बोल, प्रगटला देत डोल। रमावल्लभदास झाला, अमोल्या अमोल ॥ ५ ॥

( प्र० ४९ ) पाहे रे आहे ऐसा हरि । अनुभव कोणा उरतो रे ॥ सागरा तरंग पाहों जाये। तंव तो स्वयें विरतो रे ॥ १ ॥ आपुलीचि आधीं घेईं तूं शुद्धि । देही कीं विदेही रे ॥ त्या तुजमाजीं हारपेल जग । भावना नुरेल हेही रे ॥ २ ॥ दिसताहे रे नाना देह । जैसें मृगांबुचे डोह रे ॥ मूढ कुरंग धांवति वेगें । विवेक न पाहती मोहें रे ॥ ३ ॥ अनुतापें शुद्ध साधू सेवुनी । सांगती धरिलें मी साङ्गें रे । श्रीरमावल्लभदास मग । अवघ्यांत आपण आंगें रे ॥ ४ ॥ श्रीः ॥

(प्र० ५० ) कल्याण करी हरि-नाम घेतां हरि । सबराभरी समान परी ॥ कल्याण० ॥ ध्रु० ॥ प्रेम धरी श्रवणीं जरी । स्मरण कीर्तन पादसेवा वरी ॥ कल्याण० ॥ १ ॥ अर्चन वंदन दास्य, सख्य निवेदन । श्रीरमावल्लभदास पावन ॥ कल्याण० ॥ २ ॥

---

## ( २ ) चंद्रवारनियमः ।

( श्लोक ) वंदे शंभुमुमापतिं सुरगुरुं वंदे जगत्कारणम् ।
वंदे पन्नगभूषणं मृगधरं वंदे पशूनां पतिम् ॥
वंदे सूर्यशशांकवन्हिनयनं वंदे मुकुन्दप्रियम् ।
वंदे भक्तजनाश्रयं च वरदं वंदे शिवं शंकरम् ॥ १ ॥

( प्रबंध ५१; शिवपंचरत्नम्. )

वन्हिलोचन नंदिवाहन शेषभूषणभूषित । भस्मलेपन चर्मधारण सृष्टिवाहन पार्थिव ॥ पंचआनन काममर्दन योगसाधनसाधित । हे सदाशिव पार्वतीपते पाहि मां भव पाहि माम् ॥१॥ वर्ण कर्पुर रूप भासुर पादनूपुरगर्जित । चंद्रभास्करकांतिभासुर कर्दमेश्वरपूजित ॥ भूतखेचरसंगसादर प्रेतभूचर भासित । हे सदाशिव० ॥ २ ॥ दिव्यकुंडलहारसोज्ज्वल चंद्रशेखर भूषित । हस्तनिर्मल दंडत्रिशूल भालकोमलधारित ॥ पाहि मां शिव पाहि मां शिव पाहि मां हरिभाषित । हे सदाशिव० ॥३॥ ब्रह्मरूपिणि विष्णुमोहिनि रुद्रशक्तिनि वेष्टित । रूपकामिनि नाग पद्मिनि सर्वशक्तिनिषेवित ॥ पाहि मां शिव पाहि मां० । हे सदाशिव० ॥ ४ ॥ देव किन्नर वेद सागर भूधराधरभूषित । आदि गोचर जानकीवरमंत्रसाधनसाधित ॥ पाहि मां शिव पाहि मां शिव पाहि मां हरिभाषित । हे सदाशिव पार्वतीपते० ॥ ५ ॥

( श्लोक. ) शङ्करस्य चरितं सुधारसं नीलकण्ठपदपद्मसेवनम् ॥ चन्द्रशेखरगुणानुकीर्तनं सम्भवन्तु मम जन्मजन्मनि ॥ १ ॥

( प्र० ५२ ) शंकरा जय शंकरा मज किंकरा झणि मोकळीं । हरहरा वरशुभकरा मम हृदयग्रंथी ऊकेली ॥ ध्रु० ॥

---

१ त्वरित. २ सोडीव.

जटाजूटनाटक तप्तहाटक पापनाशकजीवना । महातरंगा आदि-गंगा संतसंगा भूवना ॥ १ ॥ पंचवदना उंचसदना तूंचि मदना जाळिसी । महाकाल रजतव्याल साजत चंद्र भाळिसी ॥ ॥ २ ॥ जीव जीव तूं शिव शिव तूं नीलग्रीव विराजित । कर्पुरगौरा त्रिशूलधरा डमरु डुमडुम वाजत ॥ ३ ॥ मोहन-मोहना गहनगहना गरुडवहनमनिं वास रे । शंभु हरहर नाम झर झर ह्मणतां भवभय नाश रे ॥ ४ ॥ सकल तूंचि अकळ[1] तूंचि अमेळ[2] तूं अविनाश रे । रमावल्लभदासां सुलभ उमा-वल्लभदास रे ॥ ५ ॥ श्रीः ॥

( प्र० ५३-अभंग ) जय जय विठ्ठल महादेव । काळिकाळा येतो भेव ॥ १ ॥ आदीं विठ्ठल ह्मणतां बापा । दचक लागे महापापा ॥ २ ॥ मग ह्मणतां महादेव । हडबडे कर्मठेवा ॥ ३॥ रमाउमावल्लभदास । ह्मणा ह्मणा सावकाश ॥ ४ ॥

---

## ( ३ ) मंगलवारनियमः ।

( श्लोक ) दुर्गा दानवनाशिनी हरजटाश्रेणीभरोल्लासिनी ।
वीणाशङ्खकरालतोमरधरा मुण्डप्रचण्डाधरा ॥
रक्तोद्भासितरक्तबीजमथिनी भक्त्या सदाऽऽनन्दिनी ।
पायात्सा परमेश्वरी प्रतिदिनं कल्याणमुक्तिप्रदा ॥ १ ॥

( प्र० ५४ ) आदि निर्गुण प्रगटली भवानी । मोह महिषासुरमर्दनालागोनि । त्रिविधतापाची कार्यकारिणी । भक्तांलागीं पावसी निर्वाणीं ॥ १ ॥ आईचा जोगुवा जोगुवा मागेन । द्वैत सांडूनी माळ मी घालीन । हातीं बोधाचा झेंडा मी झेलीन । भेदरहित वारीसी जाईन ॥ ध्रु० ॥ निजबोधाची

---

१ अगम्य. २ मलरहित.

घेईन परडी । आशातृष्णेची पाडीन दरडी । करीन कुरवंडी । विवेकरसाची भरीन दुरडी ॥ २ ॥ भक्तीच्या नवरात्रा । करुनि पोटीं मागेन ज्ञानपुत्रा । जाणुनि सद्भाव अंतरींचा मित्रा । दुर्धर संसार सोडीन कुपात्रा ॥ ३ ॥ आतां साजणी झालें मी निःसंग । विकल्प नवऱ्याचा तोडियला संग । काम क्रोध हे झाडियले मांग । झाला मोकळा मारग सुरंग ॥ ४ ॥ आईचा जोगवा मागूनी ठेवीला । जाऊनि महाद्वारीं नवस म्यां फेडीला । एका जनार्दनीं एकपणें देखीला । जन्ममरणाचा फेरा चुकवीला ॥ ५ ॥

(प्र० ५५) नाटक कृष्णाबाई रंगा येईं वो कान्हाई । विश्वगोकुळीं गगनपोकळीं नांदसी निर्वाहीं । शुकसनकादिक सिद्ध साधक तुजचि ध्याती पाहीं । त्रिकुट—शिखरीं वसासि सुंदरी मज निज भेट देईं ॥ ध्रु० ॥ ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म नाम तुझें साचें । मूळारंभीं निजात्मभावें गाईन मी वाचें । निजरूप तुझें पाहिन फेडीं पारणें नयनाचें । टाळ घोळ मृदंगरंगीं रंगू-नियां नाचे ॥ १ ॥ तुझेनि रंगें सकळ रंगा रंग पूर्ण माये । तुझेनि भोगें सकळ भोगा भोग पूर्ण पाहे । तुझेनि योगें सकळ योगा योग पूर्ण होये । सर्वव्यापिनि सर्वसाक्षिणी धांव मनीं राहे ॥ २ ॥ भक्तजननी भाव जाणुनी गुरुकृपें प्रगटली । हृदयरंगणीं ठाण मांडुनी सबाह्य उभी ठेली । गगन भरोनी आणि उरोनी सहज कोंदाटली । पहातां पहातां पहाणें न सरे मन बुद्धी लाजली ॥ ३ ॥ भजन तुझें करितां नुरे भज्य भजक भजन । ध्यान तुझें धारितां नुरे ध्येय ध्याता ध्यान । ज्ञान तुझें लाहतां नुरे ज्ञेय ज्ञाता ज्ञान । कांहीं नहोनी होसी सर्व सबराभरी पूर्ण ॥ ४ ॥ येणें जाणें तुजला नाहीं परि मी भावें बोले । हा अपराध क्षमा करीं वो कृष्णाई माऊले ।

देहविदेह विसरुनि तुझिया छंदें छंदें डोले । राघवदासें सहजीं सहजस्वरूप ध्यान केलें ॥ नाटक० ॥ ५ ॥

( प्र० ५६ ) कृष्णाई, विश्वाची तूं जननी, मन्मनिं राहीं गे । ' मातेसम, अन्य दैवत नाहीं ' ऐसें ह्मणती गे । यास्तव अति दीनभावें, आळवीतों तुजला गे । कृपाळे, तुझें सच्चिदानंदरूप दावीं गे ॥ ध्रु० ॥ अनेक योनीं जन्म घेउनी, नरजन्मा मी आलों गे । विषयमदांधें तुझी आठवण, मजला होत नाहीं गे । भवरोगें मी पीडित होउनि, त्रितापें पोळलों गे । मजला पदरीं घेउनि सत्वर, मनिंची आर्त पुरवी गे ॥ कृष्णाई० ॥ १ ॥ अति चंचल मन सैरावैरा, धांवत स्थीर न राही गे । इंद्रिय चळवळ सोसवेना, काय करूं मी यासी गे ॥ ' अहं मम ' उपाधी निरसुनि, लक्ष चौऱ्याशीं चुकवीं गे । मजवरि करुणापूर लोटुनी, मतिचा कळंक क्षाळीं गे ॥ २ ॥ तव सुखरूप नेणुनि लोक, बाह्य प्रवृत्तीं भुलले गे । सर्वां जी अक्षय सुखेच्छा, जीवनकळा ती तूंचि गे । अंतर्मुख गुरुलक्ष्य धारितां, सर्वां दर्शन देसी गे । चिदचिद्ग्रंथी भेदुनि दहरीं, चित्स्फूर्ती उगविसी गे ॥ ३ ॥ सद्भक्त संगती घडवुनी, सच्छ्रद्धा उपजवीं गे । असंभाव–संशय–विपरित–भावनात्रय नुरवीं गे । श्रवण मनन निदिध्यासें माझी, बुद्धी ही परिपक्वविं गे । तुझें स्वरूप साक्षात्कार–अमृतफळ खाववीं गे ॥ ४ ॥ विश्वीं नाना रूपें धरुनी, अससी रूपातीत गे । अनेक नामें ख्याति तुझी तरि, अनाम तूं अनंत गे । व्यक्ताव्यक्तीं अभिन्न सत्ता,–स्फूर्ती तूं एकली गे । जगन्माते ही दृष्टी मज, देउनि आनंदवीं गे ॥ ५ ॥ सद्भक्त सन्मूख होतां, त्यासी वेडाविसी गे । वेडयासाठीं वेडी होउनि, त्यासंगें नाचसी गे । वेडावेडी एक होउनी, एकपणेंविण रहासी गे । तुझें गारुड

24471

तुजविण कोणा, कधीं कळूं नेदिसी गे ॥ ६ ॥ सच्चित्सुख नित्यपूर्ण—परब्रह्म कृष्णाई गे । सर्वशक्ति तूं सर्वनियामक, सर्वांतर्यामिणी गे । विश्वचक्षु तूं विश्वा चालक, पालक तोषक माते गे । शरणागतासी वज्रपंजर, दासा अभयदाते गे ॥ कृ० ॥७॥

( प्र० ५७– **मानसपूजा** ) ‘ उदो उदो बाई गे आतां, गोंधळ हा सुखाचा गे ’ । हेंचि स्फुरण घेउनि वृत्ती, निद्रेंतुनी ऊठली गे । प्रेमाचे पाझर वरिवरी, उठूं ते लागले गे । काय वानूं अंतर्यामीं, कृष्णाईची लीळा गे ॥ ध्रु० ॥ जगन्माता कृष्णाईला, हृदयासनिं बसविलें गे । प्रेमाश्रूनें पाद्यार्घ्याचमनाभिषेक संपविले गे । विषयवासनावसनार्पणें मन, दग्धपटापरि झालें गे । क्लेशपाशोपवीतार्पणें चित्तपाश ते सुटले गे ॥ उदो० ॥ १ ॥ सत्वसुगंध आंगीं लेपितां, सत्ववृत्ति उपजली गे । सुमनपत्राक्षतार्पणानें, सद्बुद्धी वाढली गे । अहंधूप जाळितां सोऽहं, सुवासनांतरिं भरली गे । त्रिगुण त्रिवर्ती एकारतिनें, सर्वेंद्रियरति निमली गे ॥ उदो० ॥ २ ॥ सद्भाव नैवेद्य तांबुलें, प्रसन्नवदना झाली गे । बोध दिवटी घेउनि मंगळ-आरति आरंभिली गे । आरतीची प्रभा गगनीं, दाहिं दिशा फांकली गे । विश्वरूपी कृष्णाई ती, सर्वां दिसुं लागली गे ॥ उदो० ॥ ३ ॥ उदो उल्हास सुमनमाळा, विश्वभुजा घातली गे । प्रदक्षिणा घालितां आई, सन्मुख उभी ठेली गे । एका भावें नमन करितां, प्रेममिठी दीधली गे । पूर्वपुण्याई ती सद्गुरु-राजकृपें फळली गे ॥ उदो० ॥ ४ ॥ गोंधळ घालितां ब्रह्मानंदमेघ वर्षला गे । कृष्ण कृष्ण जय कृष्ण कृष्ण जय, अखंड घोष झाला गे । स्वानंदें नाचतां समूळ, देहभाव आटला गे । जगदंबा कृष्णाईपायीं दीनदास विनटला गे ॥ उदो० ॥ ५ ॥

## (४) बुधवारनियमः।

(श्लोक) यस्माद्विश्वमुदेति यत्र रमते यस्मिन्पुनर्लीयते।
भासा यस्य जगद्विभाति सहजानन्दोज्ज्वलं यन्महः॥
शान्तं शाश्वतमक्रियं यमपुनर्भावाय भूतेश्वरम्।
द्वैतध्वान्तमपास्य यान्ति कृतिनः प्रस्तौमि तं पूरुषम्॥१॥

(प्रबंध ५८; राग–केदार, ताल–त्रिवट.)

ओमिति एक अक्षर सार। अकारादि गण उच्चार॥ जयाचा स्वामी तो उदार। झाला साचार गणेश॥ ध्रु०॥ नमितां जो ये नरकुंजर। चतुर्भुज अतिसुंदर॥ जग समाविलें लंबोदर। शेष[1] मनोहर नागबंध॥१॥ अविद्या छेदी परशू करीं। ओढी अंकुश मन आंवरी॥ कमळें भक्तां पूजूं आदरी। मोदक करीं ज्ञानाचा॥२॥ स्वानंद लाडु सोंडि झेलित। प्रकृति पुरुष[2] पद दावित॥ खुण् खुण् खुण् वाद्य वाजवित। श्रुति मिरवित घाग-रिया॥३॥ घरचाळक[3] मूषक बरा। तोचि वाहन करुनी त्वरा॥ भूमंडलीं आला एकसरा। एकत्वें धरा एकदंत॥४॥ उपरी सकळ सिद्ध आहे। विघ्नांचा ऱ्हास होईल पाहे॥ रमावल्लभदास्य लाहे। तंव दिसताहे परिपूर्ण॥५॥ श्रीः॥

(प्रबंध ५९; राग–बिहाग, ताल–त्रिवट.)

रमावल्लभ माया लाघवी। रमावल्लभ रमा रमवी॥ रमावल्लभ देवोदेवी। सर्व गोसावी रमावल्लभ॥१॥ रमावल्लभ मतिची मती। रमावल्लभ धृतिची धृती॥ रमावल्लभ शांतिची शांती। दांतिची[4] दांती रमावल्लभ॥२॥ रमावल्लभ सावध श्रोता। रमावल्लभ बोलका वक्ता॥ रमावल्लभ रहस्यकथा। मतें शोधिता रमावल्लभ॥३॥ रमावल्लभ ज्ञानासी ज्ञान। रमावल्लभ

---

१ शेष हा ज्याचा कडदोरा. २ प्रकृति व पुरुष हे ज्याचे पाय. ३ मनोजय. ४ इंद्रियदमन.

ध्यानासी ध्यान ॥ रमावल्लभ मौनासी मौन । साध्यासी साधन रमावल्लभ ॥ ४ ॥ रमावल्लभ जपासी जप । रमावल्लभ तपासी तप ॥ रमावल्लभ सुखा सुखरूप । स्वरूपा रूप रमावल्लभ ॥५॥ रमावल्लभ स्वयंप्रकाश । रमावल्लभ जगदाभास ॥ रमावल्लभ संदेहनाश । रमावल्लभदास रमावल्लभ ॥ ६ ॥ श्रीः ॥

( प्रबंध ६० ; राग—भूप, ताल—दीपचंदी. )

धरणीचे रजःकण, धरणीच साचार। तैसा नमस्कार, विश्वंभरा बाप ॥ १ ॥ सागरींचे तरंग, सागर साचार । तैसा नमस्कार, विश्वंभरा बाप ॥ २ ॥ अग्नीचे स्फुल्लिंग, अग्नीचि अपार । तैसा० ॥ ३ ॥ गगनींचा वायु, गगनीं धरी थार । तैसा० ॥ ४ ॥ देहाचे कर देहा भजति सार । तैसा० ॥ ५ ॥ रमावल्लभदास एकाचि उच्चार । तैसा नमस्कार विश्वंभरा ॥ ६ ॥

( प्रबंध ६१; राग—धनाश्री, ताल—एकताल. )

उपजतां चतुर्भुज, आयुधें सहित । वसुदेव वर्णित, तो हा कृष्ण बाप ॥ १ ॥ मृत्तिका भक्षिताहे, यशोदा मुख पाहे । विश्वरूप दाविताहे, तो हा० ॥ २ ॥ बाळ बळवंत, दैत्य निर्दाळित । परि कळों नेदित[1], तो हा० ॥ ३ ॥ वत्स वत्सपाळ[2], होउनियां सकळ । ब्रह्मया मोहिलें, तो हा ० ॥४॥ रासक्रीडारंगें, गोपिकांच्या संगें । भुलविला अनंग[3], तो हा० ॥ ५ ॥ आपुल्या आंगीं कैसा, दावी विश्वभास । रमावल्लभदास तो हा० ॥ ६ ॥

(प्र० ६२) अक्षर अविनाश, माया विरे[4] ज्यांत । तें रूप साक्षात, गोपाळाचें ॥ १ ॥ उत्पत्तिस्थितिलयाहूनि भिन्नगत[5] । तें रूप० ॥ २ ॥ विश्वमुखें भोक्ता, पाहतां सिद्धांत । तें रूप० ॥ ३ ॥ सकळहि देहीं, व्यापक निभ्रांत । तें रूप०

१ देत नाहीं. २ गोपाळ गडी. ३ मदन. ४ लय पावते. ५ निराळा.

॥ ४ ॥ अध्यास धरितां मीतूंपणे जात । तें रूप० ॥ ५ ॥ श्रीरमावल्लभदास निर्वाणांत । तें रूप साक्षात ॥ ६ ॥

( प्र० ६३ ) देव तो एक आहे, स्वामि तो एक आहे । कल्पांबु सरिता, जेविं सिंधूचि पाहे ॥ १ ॥ कोणि ह्मणती गणेश, कोणि ध्याती रवीश । कोणि ह्मणती चंडीमाया, नेणति परेश ॥ २ ॥ कोणी ह्मणती महादेव, मैराळाचा घेती भेव । मार्तंड भैरव ह्मणती, नेणतील देव ॥ ३ ॥ कोणी ह्मणती मानव, आह्मीं धरिला माधव । वैष्णव ह्मणवुनि फुगती नेणती लाघव ॥ ४ ॥ देहबुद्धि न सांडिती, देह मीच ह्मणती । देहातीत बोध नाहीं, संदेहीं पडती ॥५॥ आत्मबोधप्रकाश, करि गुरु सावकाश । सर्व देव देखण्यास, ह्मणे रमावल्लभदास ॥ ६ ॥

( प्र० ६४ ) जोडलें रे हरिप्रेम जोडलें रे । अखंड ह्मणतां नाम, माझें मीपण झडलें रे ॥ ध्रु० ॥ सज्जनसंगति अति, श्रवणमननरति । निजध्यास साक्षात्कार, सद्गुरुकृपा पावती ॥ १ ॥ बरें आणि वाईटाचें, बंधन न घडे साचें । कर्मफळापासुनि मुक्त, हें तंव वाक्य श्रीकृष्णाचें ॥ २ ॥ हरि सर्वभूतीं सम, अरिमित्रीं नाहीं विषम । ऐसें जाणोनियां भजतां, संत होय तो परम ॥ ३ ॥ सकळही करणें घडे, खाणें जेवणें पडे । होम दान तप करितां, हरिचा विसरु न पडे ॥४॥ श्रीरमावल्लभदास, जगीं नेणे दुजा भास । निरंतर तया स्मरतां, झाला पूर्ण प्रकाश ॥ ५ ॥

( प्रबंध ६५; राग— पिलू, ताल—त्रिवट. )

श्यामसुंदरवर, वृंदावनिं पाहिला । पाहिला तो पाहिला, येउनि मनीं राहिला ॥ध्रु०॥ ठाण त्रिभंग, सुरस वेणु वाहिला । रस मधुर नभीं, जाई ना तो मायिला ॥१॥ गायीं गोपाळ गोपीं मुनिजनीं ध्यायिला । श्रीरमावल्लभदासें, आवडीनें गायिला ॥ २ ॥

( प्र० ६६ ) हृदयमंदिर, सावळ्या हें तुझें । शुद्ध करीं मानस, पाहवेना दुजें ॥ ध्रु० ॥ त्यागोनी मंदिरा, जातोसी तूं देवा । धंणी[1] नाहीं मग, उद्धट[2] केशवा ॥ १ ॥ काम क्रोध लोभ, उंदिर मातले । तुजवीण गृह, सर्वहि चाळिलें ॥ २ ॥ तृष्णा थोर घूस, स्वार्थ हा उंदिर । खणूनीयां बहु, व्यापिलें मंदिर ॥ ३ ॥ वासनेच्या पिसा, स्वार्थ हा किरात । जीवासी तोडित, गुप्त शरीरांत ॥ ४ ॥ ममतेची पाल, चिटचिट बाहती । स्परुश तियेचा, अशुभ ते गति ॥ ५ ॥ भुजंग हा मोह, राहिलासे घरीं । विषें तयाचिया, कैंची मग उरी ॥ ६ ॥ दंभ मान दोघे, तस्कर रिघोनी । परमार्थरचना, भंगिती लागोनि ॥ ७ ॥ अविवेक श्वान, राज्य झालें त्याचें । लाज धरीं देवा, विनवितों साचें ॥ ८ ॥ ऐकुनियां धांवा, मुकुंद पातला । अनुतापा आधीं, निरोप दिधला ॥ ९ ॥ [3]तेणें गृह शुद्ध, करूं आरंभिलें । वैराग्य साहित्य, सवेंचि पातलें ॥ १० ॥ विवेक अद्वय, शुद्ध सत्व करी । रज तम मळ, नाशिले निर्धारीं ॥ ११ ॥ गुरुवाक्यमंत्रें, मोहसर्पु गेला । अविवेक श्वान, पूर्वींच पळाला ॥ १२ ॥ दंभ मान दोघे, देशधडी झाले । सदा अनुतापें, वसूं आरंभिलें ॥ १३ ॥ पूर्ण बोध कृष्ण, येतो हा स्वलीला । हृदयींचा गेला, अहंकार मेला ॥ १४ ॥ निर्मळ मंदिर, देखोनी पूर्ण तो । पावला सत्वर, कृपाळू जाण तो ॥ १५ ॥ भक्त[4]इच्छेंकरि, सगुण निर्गुण । होउनी अंतरीं, राहिला आपण ॥ १६ ॥ मुकुट मस्तकीं, तेजोराशि निका । खचित तिलक, भाळीं साजे रेखा ॥ १७ ॥ सुरेख भोंवया, वारिजलोचन । सरळ नासिक, सौंदर्यमंडण ॥ १८ ॥ गंडस्थळीं तेज, कर्णकुंडलांचें । प्रवाळ अधर, दंत हिरे साचे ॥ १९ ॥

१ धनी, यजमान. २ प्रसिद्ध. ३ त्या अनुतापानें. ४ भक्तांच्या इच्छेप्रमाणें.

हनुवटी नीट, कंब्वाकृति[1] कंठ । कौस्तुभ मणि तो, साजिरा उत्कट ॥ २० ॥ माळा वैजयंती, आपाद रुळत । चतुर्भुज श्याम, आयुधें मंडित ॥ २१ ॥ हृदयीं पदक, उदर वेल्हाळ । लांछन द्विजपद, दक्षिणे निर्मळ ॥ २२ ॥ पीतांबर कांसे, सहित मेखळा । प्रावर्ण अपूर्व, दुजा सोनेसळा[2] ॥ २३ ॥ वांकी तोडरादि, ब्रिदावाळि पायीं । अनुपम्य रूप, वानूं किती काई ॥ २४ ॥ हृदयमंदिरीं, संपूर्ण दाटला । देहभाव तेणें, समूळ आटला ॥ २५ ॥ रूप सावळ्याचें, न्याहाळीं विवरीं[3] । तंव हा देखणा, दिसे चराचरीं ॥ २६ ॥ चराचरा आंत, असोनियां नसे । तरंग जीवनीं, नानाविध जैसे ॥ २७ ॥ विस्मया विस्मय, संपूर्ण जाहला । अनुभवीं अनुभव, देखोनि मुरला ॥ २८ ॥ ऐशा दशेवरी, रमावल्लभाचें । दास्यत्व संपूर्ण, होत असे साचें ॥ २९ ॥

## गुरुस्तवनाष्टक.

( प्रबंध ६७ ; राग–विहाग, जाति–आदिताल. )

सर्व तूं अवनीं, जिवनीं तूं दहनीं । पवनीं तूं गगनीं एक रे ॥ गंध तूं रस रूप, स्पर्श तूं हर्ष भूप । शब्द तूं अमूप, एक रे ॥ इंद्रियदशक तूं, अंतर पंचक तूं । व्याप्त तूं व्यापक एक रे ॥ १ ॥ जय जय श्रीगुरुनाथा ॥ तव चरणीं माझा माथा रे ॥ ध्रु० ॥ जाग्रति स्वप्न निद्रा, तूर्या तूं नरेंद्रा । उन्मनि तूं योगींद्रा, एक रे ॥ उत्पत्ति स्थिति लय, त्रिगुणअन्वय । व्यतिरेक निर्भय, तूं एक रे ॥ अन्वय व्यतिरेक, करणें जो विवेक । त्यावरि तूं सम्यक एक रे ॥ जय जय० २ ॥ त्वंपद तत्पद, असिपदीं विशद[4] । तुजविण प्रेममद, नाहीं रे ॥ सत्यवचनमात्रें, सत्य निवति गात्रें[5] । तस्मात् सद्भाव पात्रें,

१ शंखाप्रमाणें. २ भरजरी शेला. ३ हृदयगुहेंत. ४ स्पष्ट. ५ इंद्रियें.

पाहीं रे ॥ भाव अभाव दोन्ही तुजमाजिं, हारपोनी । न ये परतोनी, कांहीं रे ॥ जय जय० ॥ ३ ॥ वाच्य निरसोनि जनीं, लक्ष्य धरविसि मनीं । वाच्यवाचकवदनीं, तूंच तूं ॥ देह विराट छाया, अदृश्य दृश्य माया । न कळे अगम्य काया, तूंच तूं ॥ लीलाविलासी नर, होसि तूं सुंदर । नव्हसि इतरांपरि, तूंच तूं ॥ जय जय० ॥ ४ ॥ अष्टांगयोग कृतीं[1], यागादि भाग त्रेतीं[2] । द्वापारीं तीर्थोंतीर्थीं, पूजा रे ॥ कलयुगीं कीर्तन, करी नित्य नूतन । देसी त्याप्रति तनु[3]–गुजा रे ॥ गुज पाहतां मग, तूंचि सकळ जग । भाव न धरी तगें[4], दूजा रे ॥ जय जय० ॥५॥ अपान प्राण सम, करोनि जें उत्तम । योगी साधिति ब्रह्म, स्थान रे ॥ विसरतां पाय तुझे, अपायीं बहु रुजे[5] । रुजे तो न बुझे, ज्ञान रे ॥ हरुनियां अहंभाव, करुनियां सोहंभाव । पावे मग संप्रदाव,–मान रे ॥ जय जय० ॥ ६ ॥ सद्रूप चिद्रूप, आनंद तद्रूप । रूपी तूं अरूप–बीज रे ॥ बीज अबीज तूं, रहित निज तूं । तुजविण बोल सर्व, [6]खीज रे ॥ भजनकरि[7] सार, करिसी कृपा अपार । पडत भ्रमासी फार, झीज रे ॥ जय जय० ॥ ७ ॥ दीनदयाकृत, दीनदयाश्रित । दीनदयामृत, सार रे ॥ दीनदयांबुधि, दीनदयानिधि । देसि त्या ऋद्धि सिद्धि, फार रे ॥ श्रीमंत श्रीरमावल्लभदास सम । राजगुह्य उत्तम, सार रे ॥ जय जय० ॥ ८ ॥ स्तवन अष्टक इति, गाति ऐकति प्रीतीं । पूर्णब्रह्मस्थिति, प्राप्त रे ॥ गुरुशिष्यविलास, लोपे जगदाभास । आनंदें आनंदास, व्याप्त रे ॥ मग बोल खुंटला, अबोल तूटला । परिपूर्ण नटला, आप्त रे ॥ ९ ॥ जयजय श्रीगुरुनाथा । तव चरणिं माझा माथा रे ॥ श्रीः ॥ ॥

---

१ कृतयुगांत. २ त्रेतायुगांत. ३ स्वरूपरहस्य. ४ टिकाव. ५ रुपतो, बुडतो. ६ व्यर्थ. ७ भजनाच्या योगें.

## तारकाष्टक.

( प्रबंध ६८ ) ॐ कार हें बीज घेऊं, होउनि मग नाम गाऊं। ॐ नमो ह्मणोनियां, सद्गुरुराज गात जाऊं ॥१॥ ॐ नमो ॐ नमो, देव देव देव कृष्णा । ॐ नमो ॐ नमो ॥ ध्रु० ॥ नमूनियां सिद्धजन, नसोनियां देहीं मन । नटोनियां सर्वरूपें, क्रीडताहे हरिघन ॥ २ ॥ मोहजाळ हरि शमो, विराग भक्ति परि गमो । मोल फार भाविकांसि, चित्त सार तरी रमो ॥३॥ दैहिकं[1] त्यजोनि वदे, देऊनि ढेंकरु मदें । देशिकें[2] कीर्तन करी, गुंफेना तो जनपदें ॥ ४ ॥ वरिष्ठ हें अभिनव, वरदहीन जे मानव । वदनिं ब्रह्म गात मात, तर्के ना तो लाघव ॥ ५ ॥ वचनिं वदतां शिव, वाराणसीं[3] तारी जीव । वरिष्ठ हें तारक नाम, सत्य हो देईल दिव्य ॥ ६ ॥ रेखिलेसे मनीं बरें, देह मूर्ति अतित्वरें । रोशिमापरीस मऊ कुरुळे जयाचे खरें ॥ ७ ॥ सखा सर्व प्राणियांस, समासम समस्तांस । सद्गदीत होति भक्त, स्वानुभव पूर्ण ज्यांस ॥ ८ ॥ ऐसें हें सुंदर नाम, कैसें हो करील आराम । रमावल्लभदास ह्मणे, सौंगड्यासी मज काम ॥ ॐ नमो० ॥ ९ ॥ इति तारकाष्टकं संपूर्णम् ॥

## अथ वनमाल्यष्टकम्.

( प्रबंध ६९; राग–बिहाग. जाति–आदिताल. )

नंदनंदन वनमाळी । मुनिजनवंदन वनमाळी । दानवमर्दन वनमाळी । सुरवरवर्धन वनमाळी ॥ १ ॥ जय जय जय जय वनमाळी । वस तूं हृदयीं वनमाळी । आनंदमय तूं वनमाळी । तोडीं भवभय वनमाळी ॥ २ ॥ पूतनाशोषण वनमाळी । यादवहर्षण वनमाळी । मृत्तिकाभक्षण वनमाळी । सकळनिरीक्षण

---

१ देहभाव. २ गुरु. ३ काशीक्षेत्रांत.

वनमाळी ॥ ३ ॥ दामोदरवर वनमाळी । सर्व निरंतर वनमाळी । हातिं लोणीभाकर वनमाळी । न कळे हरिहरां वनमाळी ॥ ४ ॥ गोवत्सें चारिसि वनमाळी । प्रीतिकाला करिसी वनमाळी । बहुरूपें धरिसी वनमाळी । मग ब्रह्मया मोहिसी वनमाळी ॥ ५ ॥ दमिला कालिया वनमाळी । वरि नृत्य टाळिया वनमाळी । वाजविसि पांवया वनमाळी । गोपिका यावया वनमाळी ॥ ६ ॥ खेळे रास धुंमाळी वनमाळी । परि एकचि ताळी वनमाळी । कामरूपावळी वनमाळी । अतिगर्वें ढाळी वनमाळी ॥ ७ ॥ तुझें रूप अरूप वनमाळी । न कळे अमूप वनमाळी । गूढमायाकुलूप वनमाळी । निघे नामरूपें वनमाळी ॥ ८ ॥ सद्गुरु उदास वनमाळी । मज भेटलासि वनमाळी । रमावल्लभदास वनमाळी । धरि श्रीचरणास वनमाळी ॥ ९ ॥ श्रीः ॥ इति श्रीवनमाळीअष्टक । ह्मणतां मनिं होय तुष्टक । मग तो भक्त मुक्त नैष्ठिक । अति सुटंक प्रेमळ पैं ॥

( प्रबंध ७०; राग—कालंगडा, ताल—दादरा. )

त्रिविधताप बाई जाईल, भेट देईल । विठू पंढरिराजा ॥ प्रसिद्ध पुंडलिक भाविक, महासात्विक । आला त्याचिये काजा॥ भीमापुष्पवती संगमीं, उभा राहोनि । मुरड[2] देऊनि मोंजा[1] ॥ ठाण त्रिभंग बरें देखिलें, मनिं रेखिलें । विरे कंदर्पराजा ॥ १ ॥ नवलनवल हें तव रूपडें, पाहे चौकडे[3] । चंद्रभागातटीं ॥ समचरण विठे लाधलीं, प्रीति बाणली । ठेवि करतळ कटीं ॥ ध्रु० ॥ तळव्या अरुणरंग बोधला, टांचों[4] कोवळ्या । संध्याराग जेवीं ॥ कंज ध्वज वज्र अंकुश, ऊर्ध्व रेखस । वानुं कीर्ति मी केवीं ॥ साधनचतुष्टयावरुतें, प्रेम पूरतें । आहे त्याचीचि ठेवी ॥ स्थिर गोदा पदअंगुष्टीं, शिवमुकुटीं । वाहे पवित्र देवी ॥ नवलनवल

१ धांगडधिंगा. २ कंबरेस वांक देऊन. ३ पा. भे. 'चोखडें'. ४ पायाच्या खोटा.

हें तव रूपडें० ॥ २ ॥ नखचंद्रामृत भक्त चकोर, घेति निरंतर । अन्य नेणति कांहीं ॥ बरवी चवी ते जाणती, गोड ह्मणती । प्रीतीं डोलति पाहीं ॥ इतर शब्दब्रह्म बोलती, जगीं खोलती[1] । त्याची प्राप्तिहि नाहीं ॥ तरीच वणवण न चुके, विषयां विके[2] । हिंडे दिशा दाहीं ॥ नवल० ॥ ३ ॥ वांकि नेपुर अंदू तोडरु, करि गजरु । देहबुद्धीवरी ॥ राजसतामसस्वभाव, घोर दानव । जगिं तेचि ते अरि ॥ तया भासत काळस्वरूप, भक्तां निजरूप । आनंदेंकरी[3] ॥ सर्व सांडुनि पाहे लंपट, तया निपट । देतो आपणा हरि ॥ नवल० ॥ ४ ॥ नील वर्तुळ घोटे बरवे, जोनु[4] ओतिवे । पोटरिया जैशा ॥ पीतांबर तया गांठी हो, कटितटीं हो । रत्नजडित तैशा ॥ किंकिणि क्षुद्रघंटा मेखळा, ध्वनि विवळा[5] । अनुहात जैसा ॥ उदरीं त्रिवळि[6] रोमराजित, नाभि विराजित । भोंवरा कालिंदीं जैसा ॥ नवल० ॥ ५ ॥ शुभ्रचंदनउटि पातळ, तनु सुनीळ । अंगीं लावण्य असे ॥ आजानुबाहू भूषणें, हिरे कंकणें । साम्य दूसरें नसे ॥ आपाद वैजयंति रूळत, माळा घोळत । तुळसीही वसे ॥ हृदयीं पदक चिन्ह श्रीवत्स, प्रीति बहुवस । दावी प्रसन्नदशे ॥ नवल० ॥ ६ ॥ वक्षिं कौस्तुभ करी झळफळ, कंठ निर्मळ । हनुवटी नीट ॥ अधर प्रवाळ सुंदर, सुधामंदिर । गोपी ग्राहिका धीट ॥ ओंठीं पांवा देवें घातला, रसु ओतला । नीचनवा[7] नेट ॥ त्रैलोक्य जेणें मोहिलें, प्रेम दोहिलें । मूळआनंदपीठ ॥ नवल० ॥ ७ ॥ दर्शन[8] दाळिंबबीज लाजत, हिरे विराजित । उजियेडे येणें ॥ श्रवणीं कुंडळ झळफत, तेज लखलखित । गंडस्थळीं तेणें ॥ सरळ नागर नासिक, अति सुवासिक । निवे वसंत जेणें ॥ आकर्ण लोचन वरि भ्रुकुटी, देखे तिकटी[9] । नपुरे उपमा देणें

१ उघड करून दाखवितात. २ विकला जातो. ३ आनंदाच्या योगें. ४ गुढघे. ५ स्पष्ट. ६ पोटावरच्या तीन वळ्या. ७ नित्य नवा. ८ दांत. ९ तीरकमठा, धनुष्य.

॥ नवल० ॥ ८ ॥ केशरकस्तुरीचंदन, तया वंदन । भाळिं मंडन झालें ॥ सुरंगखचित अक्षत, अतिआरक्त । तेज माणिका आलें ॥ माथां मुकुट मिरवला, रवि दीपला । महातेज निवालें ॥ शिखेसी दोरि ती शोभली, विचित्र भली । सये[1] मानस धालें ॥नवल०॥९॥ हास्यवदन अतिरहस्य, भजतां दृश्य ।गाळी मीतूं-पण ॥ सुख समाधीचें निकें[2] हो, होय फीकें हो । हरिखाचा[3] सण ॥ पाहतां पाहतां शेखीं पाहँतें[4], पाहणें[5] होतें । द्रष्टा आपुला आपण ॥ यावरि बोलणें खुंटलें, मौन तुटलें । परि मी न सोडीं चरण ॥नवल०॥१०॥ द्वारका गोकुळ अतिअंतर, भेटि दुस्तर । विठोबा शोभे कैसा ॥ भोळियां भाविकांसि सुलभ, नव्हे दुर्लभ । विठोबा सोपा तैसा ॥ आषाढिकार्तिकिचेनि मिसें[6], दिसे जगदीश । विठोबा आपण ऐसा ॥ परिपूर्ण गुरुविणें नेणती, कोणी निश्चितीं । विठोबा कल्पांबु जैसा ॥ नवल०॥११॥ पांडुरंगरूप रसिक, तया भाविकां । प्रीति बहुत आहे ॥ आपणाविण दुजें नेणती, या त्रिजगतीं । वाट त्यांचींचि पाहे ॥ देईन आलिंगन तांतडीं, मनिं आवडी । उभा तिष्ठत आहे ॥ लक्ष्मीधरदासें जाणोनी, प्रीति बाणोनी । मिठी घातलि आहे ॥ नवलनवल हें तव रूपडें०॥१२॥

( प्रबंध ७१; चाल—वरील. )

सगुण रूप हें पाहतां, ध्यानिं बैसतां । दोनी एकचि झालें ॥ द्वैत तेथें कैंचें बाई गे, बोलूं नये गे । ऐसें गुरुनें गे केलें ॥ १ ॥ अनुभव अभिनँव[7] सांगतां, बाई सांगतां । साँगतें[8] नुरे ॥ सांगा-या बोलाया कारणें, मजकारणें । सगुण केलें गे खरें ॥ ध्रु० ॥ मीतूंपण दोन्ही गिळूनि, अहो साजणी । हरिभक्ती गे उठी ॥ तें सुख सांगतां अनुभूतीं, संतसंगतीं । त्यासि नाहीं गे तुटी ॥

---

१ सखे. २ चांगलें. ३ हर्षाचा. ४ पाहणारें. ५ दर्शन (ज्ञान) स्वरूप. ६ निमित्तानें. ७ नवलाचा. ८ सांगणारा.

॥ २ ॥ सागरिं कल्लोळ उमटती, त्यासि भेटती । तो काय आहे गे भिन्न ॥ श्रीरमावल्लभदास्यत्व, दिसे भिन्नत्व । परि तें आहे अभिन्न ॥ अनुभव अभिनव सांगतां० ॥ ३ ॥ श्रीः ॥

---

## ( ५ ) गुरुवारनियमः ।

ब्रह्मानन्दं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं
द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम् ।
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतं
भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥ १ ॥

( प्रबंध ७२; राग–विहंग, ताल–आदिताल; चाल–अहा रे दैवा. )

गुरुवीण कोणा नाहीं गति । वेद शास्त्र पुराणें सांगतीं । सकळैक जन हें ऐकती । कोणीं केल्या करूं गा ह्मणती ॥ १ ॥ परि तो गुरु न कळे सर्वथा । घरोघरीं करिती पैं कथा ॥ नाना मतें नेणती सर्वथा । उपदेश जीविताच्या अर्था ॥ परि तो गुरु न कळे सर्वथा ॥ ध्रु० ॥ कोणी हठयोग पैं दाविती । कोणी टीळे मुद्रा पैं लाविती । कोणी आह्मी वैष्णव ह्मणती । मुद्रा तप्त लावूनी झकविती ॥ परि तो० ॥ २ ॥ कोणा रुचे जंगमभावना । कोणा रुचे ज्योतीषसूचना । कोणा मंत्र तंत्र यंत्र नाना । कोणा दंभवाद तो आपणा ॥ परि तो० ॥ ३ ॥ कोणी नाथपंथी पैं जहाले । कोणी अवधूत होतां ठेले । कोणी संन्यास घेत आले । कोणी उंच जटा बुंचडा घाले ॥ परि तो० ॥ ४ ॥ मंत्र तंत्र उपदेशिते जन । प्रपंचांत ते गुरु गहन । परमार्थ दुर्लभ पावन । आत्मज्ञानी तो जगजीवन ॥ परि तो० ॥ ५ ॥ तोच गुरु पहावा जनांत । तोच गुरु रहावा मनांत । मीपण हें सांडूनी निवांत । आपणांत मिळवी निभ्रांत ॥ तोच गुरु पहावा ॥ ६ ॥ भागवतगी-

---

१ लाटा.

तानिरूपण । करोनी नेघे गुरुत्व आपण । लेऊनियां शांतीचें भूषण । कोणासि कांहीं ठेवी ना दूषण ॥ तोच गुरु० ॥ ७ ॥ सर्वभूतीं[1] भगवंत पाहे । तंव तो भगवंत एक आहे । भूतीं भगवंतीं भेद न राहे । अभेद हें बोलणें न साहे ॥ तोच गुरु० ॥ ८ ॥ त्याचें प्रेम धरी तोचि चेला । प्रेम टाकी वायां तोचि गेला । सर्वां उपदेशु त्याणें केला । सर्वां मतीं तोचि तो उदेला ॥ तोच गुरु० ॥ ९ ॥ जाती कुळ न पाहे कवणाचें । आर्त[2] एक देखोनि मनाचें । घ्यावया प्रेम धांवतो तयाचें । शरीर हें जाणोनि जायाचें ॥ तोच गुरु० ॥ १० ॥ चाड नाहीं शिष्य करायाची । चाड नाहीं गुरुत्व घ्यायाची । चाड नाहीं मत स्थापायाची । चाड नाहीं ख्याति व्हावयाची ॥ तोच गुरु० ॥ ॥११॥ चाड जया साचार भावाची । चाड जया साचार देवाची । वाणी रमावल्लभदासाची । चाड तया प्रेम बोलायाची ॥ तोच गुरु पहावा जनांत ॥ १२ ॥ श्रीः ॥

( प्र० ७३ ) मी कोण हें नेणोनी, भवभय अति दुस्तर । अनुभवें तुवां निर्भय केलें, निवविलें अति सत्वर ॥ १ ॥ गुरू तुझे उपकार, गुरो तुझे उपकार ॥ ध्रु० ॥ श्रीगुरुराया सद्गुरु-राया, अगणित गणित पार । सर्वीं सर्वपण अलिप्त केलें, अगाध बोध–विचार ॥ गुरु० ॥ २ ॥ गुरु तुजवीण आह्मां कळलें, ह्मणे तें बोलणें वावो । दृष्टि देखणें परि अंध होय, नुगवे जों दिनमणिरावो[3] ॥ गुरु० ॥ ३ ॥ गुरु भेटतां कैसें कैसें पां, झाडिसि अहंपण । ऐकणें पुसणें नलगे कांहीं, मनिं नाहीं वणवण ॥ गुरु० ॥ ४ ॥समीं विषम जग हेमीं नग हें, पाहतां दूजें नाहीं ।

---

१ पा. भे. ‘ सर्वभूतीं समत्वेंचि पाहे । सर्व स्वयमात्मा देखताहे ।’
२ आवड, उत्कंठा. ३ सूर्य.

एकीं एकपण बोल न साहे, अवघा मी आपण होईं ॥ गुरु० ॥ ५ ॥ दुजें नसोनी परोपरि गुरु–भजना दिधली वोजें । रमावल्लभदास अवघा, मग तूं श्रीगुरुभोजें ॥ गुरु० ॥ ६ ॥

( प्र० ७४ ) भाग्य कोण माझें जाण, भेटला हा सद्गुरु । दृष्टिमात्रें सर्व गात्रें नीवाविलिं सत्वरु ॥ भवमूळ कल्पनाहि नासिळीसे दुस्तरु । लक्ष्मीधर गुरुवर मज सार पूज्य हो ॥ १ ॥

( ओंव्या ) माझें भाग्य हो कवण । भेटला सद्गुरु आपण । त्याचें विस्तार निरूपण । गुरुभक्ति ऐकावी ॥ १ ॥ ऐकावें चहूं दिशें चालत । आज्ञा ती स्थिर ' साम्राज्य ' वसत । उभयभोगीं विरंजित । तें पैं ' भौज्य ' जाणावें ॥ २ ॥ जाणावें ' स्वाराज्य ' स्वर्गाचें । ' भूराज्य ' नाम भूमंडलाचें । ' वैराज्य ' सिद्धांच्या भोगाचें । ' पारमेष्ठि ' तो ब्रह्मलोक ॥ ३ ॥ लोक ' पाताळ ' शेषाचा । ' वैकुंठ कैलास ' हरिहरांचा । इत्यादि भोग मिथ्या साचा । एक भेटतांचि सद्गुरु ॥ ४ ॥ गुरु जगीं कैसा आहे । सगुण निर्गुण बोल न साहे । शेखीं सर्व होऊनि राहे । गुरुत्वा न लगे गुरुपण ॥ ५ ॥ गुरुपणें नलगे गुरुत्व । शिष्यपणें नुरे शिष्यत्व । मग वाढवित ममत्व । अतिप्रेम संवादाचें ॥ ६ ॥ संवादाचें पैं कारण । होतां जयाचें ईक्षण । सर्व गात्रें विरोनि आपण । जीवन्मुक्त शिष्य झाला ॥ ७ ॥ झाल्यावीण कल्पनेचा नाश । चित्त स्थिरावे ना कवणास । तें मूळ जन्ममरणास । त्याचें स्वरूप सांगेन ॥ ८ ॥ सांगेन त्रिविध प्रकार । त्रिविध भेद जाणावा विचार । ' मी देह ' ह्मणुनी अविचार । ' विजातीय ' भेदकल्पना ॥ ९ ॥ कल्पना ' सजातीय ' ओळखावी । ' मी जीव ' आहें ऐसें जो

१ चांगुलपण, उत्तेजन. २ श्रीगुरुराजा. ३ भूमीवरील व स्वर्गादिलोकांतलि भोगैश्वर्यांत विरक्त.

भावी । लक्ष चौऱ्याशीं योनी भोगावी । ईश्वरातें नेणोनी ॥ १० ॥ नेणोनी आपुलें पूर्णत्व । जो कल्पिताहे ब्रह्मत्व । तो ' स्वगत ' भेद ममत्व । माया परम जाणावी ॥ ११ ॥ जाणावी लोहाची बेडी जैसी । सोन्याची त्याहून तैसी । बाधक होय आपैसी । कांहीं केल्या तुटेना ॥ १२ ॥ तुटेना देहाची कल्पना । हेंचि भवमूळ आणीं मना । न करितां हरिगुरुभजना । दुस्तर तरवेना सत्य ॥ १३ ॥ सत्य देह मुळींच नाहीं । विदेह ह्मणणें भ्रम पाहीं । भ्रम नासल्या लवलाहीं । होते भेटी जयाची ॥ १४ ॥ ज्याची भेट झाल्यावीण । बुडती कल्पनेंत प्रवीण । शब्दब्रह्म पावोनि[1] शीण । वादविवाद करिताती ॥ १५ ॥ करिताती सद्गुरुभक्ति । जाणावयासी हरिव्यक्ति । पावोनि ज्ञान विरक्ति । कृतकृत्य पैं झाले ॥ १६ ॥ लक्ष्मीधर गुरुवर । मज सार निरंतर । पूज्य आहे अतःपर । दूजे नाहीं पाहतां ॥ १७ ॥ श्रीः ॥

( प्र० ७९ ) जन्ममृत्यु नाहीं सत्य । कृपा होतां जाहलें । स्वप्नप्राय भवभय आत्मसुख पाहिलें ॥ तेणें साच मज मींच भेटविलें वहिलें । लक्ष्मीधर गुरुवर मज सार पूज्य हो ॥ २ ॥

( ओंव्या ) कृपा होतां जयाची । वाट मोडे जन्ममृत्यूंची । जैसी राज्यस्थिती स्वप्नींची । जागृत झाल्या पैं नाहीं ॥ १ ॥ नाहीं आत्मसुख पाहिलें । भवभय होतोंचि राहिलें । मग मी नेणें वहिलें । कोण आहे साचार ॥ २ ॥ साचार देह ' माझा ' ह्मणतां । तो देह नव्हे, भिन्न वसंता[2] । तैसें इंद्रियासी जाणता[3] । आणि प्राणअंतःकरणा ॥ ३ ॥ अंतःकरणादि देखणा । तो जीव मुकला जीवपणा । मग तो भेटे आप आपणा ' तें तूं आहे '[4] ह्मणतांच ॥ ४ ॥ ह्मणतां गुरूनें ' तें तूं आहेस ' । मग मी जहालों पूर्णपरेश । जाहलों ह्मणणें याचा लेश । लागों

१ वेद पढून· २ वसणारा· ३ जाणणारा· ४ ' तत्त्वमसि· '

नेदी मजलागीं ॥ ५ ॥ नैराश्यदशा अंगीकारित । लक्ष्मीधर तो त्वरित । गुरुवर सबराभरित । मजला सार पूज्य हो ॥ ६ ॥

( प्र० ७६ ) मृगजळ विषय हो सत्य जैसें भासत । मीच देह हेंचि गुह्य दृढ मना दीसत ॥ भ्रांति ऐसी गेली सर्व अनुभव विस्मित । लक्ष्मीधर गुरुवर मज सार पूज्य हो ॥ ३ ॥

( ओंव्या ) सूर्यरश्मीचीं तीव्र झळ । मृग मानी तेंचि जळ । तैसी विषयांची तळमळ । मीच मानितां देह ॥ १ ॥ देह लटिका ऐसा कळल्यावरी । वासना नुरे अणुभरी । मग लटिक्याचा शोक कोण करी । भ्रांति गेलिया सर्व ॥ २ ॥ सर्वहि वासुदेव झाला । अनुभवीं अनुभव मुराला । विस्मयीं विस्मयो बुडाला । शब्द निश्शब्दीं आटे ॥ ३ ॥ आटलें मीतूंपणाचें भान । ऐसें गुरुकृपाविधान । जाणोनि त्याचें महिमान । काय म्यां वानावें उक्तीं ॥ ४ ॥ श्रीः ॥ आगळी नैराश्यलक्ष्मी । दुर्लभ आगमीं निगमीं । ती राहिली सर्वोत्तमीं । मज गुरु मान्य तोच तो ॥ १ ॥

( प्र० ७७ ) भागवतगुह्यअर्थ दाविलासे प्रगट । श्रीगीता शास्त्रसार अर्थ तोहि उद्भट । मजपाशिं अर्थमय केलें असे विनट । लक्ष्मीधर गुरुवर मज सार पूज्य हो ॥ ४ ॥

( ओंव्या ) सगुण निर्गुण अन्वय । पाहतां एकचि तन्मय । मग उत्पत्तिस्थितिलय । मायामय सकळिक ॥ १ ॥ सकळ लय जाहलिया । माया नुरे कांहीं केलिया । मग ब्रह्मीं ब्रह्मत्व गेलिया । व्यतिरेकें निर्भय ॥ २ ॥ निर्भय भागवतसार । गुह्यार्थ दाविला उदार । श्रीगीता ही शास्त्रसार । उपयोगी परमार्थीं ॥ ३ ॥ परमार्थीं अर्थ काढिती । ते अर्थचि करूनि ठेविती । अर्थमय केल्या, किती । वानूं उपकार गुरूचे ॥ ४ ॥ गुरूचे उपकार

---

१ भासमान, मिथ्या. २ देहादि अहंकारोपाधीहून निराळेपणा.

गुरुभक्ति । जोडल्या धन्य शिष्यव्यक्ति । मग तो पावूनियां बोधक शक्ति । तेणें उद्धारु जगांचा ॥ ५ ॥ श्री ॥ अतर्क्य तर्कैना गुरुवर । साच कोणी लक्ष्मीधर । तो मज पूज्य निरंतर । सारासार त्रिभुवनीं ॥ १ ॥ श्रीः ॥

( प्र० ७८ ) मतें नाना पाहतांचि गुरुभक्ति आगळी । ब्रह्मा विष्णु शिव येती गुरुभक्ति जवळीं ॥ मिथ्या माया गुरु पाय भजतांचि समूळीं । लक्ष्मीधर गुरुवर मज सार पूज्य हो ॥५॥

( ओंव्या ) सर्वही शास्त्र[1] आलोडिती । पुनः पुनः विचारिती । त्यांत सार निवडिती । ध्येय नारायण सदा ॥१॥ सदा नारायण स्मरतां । नारायण होणें प्रेमरता । हें वर्म नेणोनि नाना मतां । भेदु जाहला अभिमानें ॥ २ ॥ अभिमानें नाना संप्रदाय । झाले परि ते गुरुपाय । आठवितां तेणें जाय । भ्रम सर्व मनाचा ॥ ३ ॥ मनाचा भ्रम गेल्यावरी । गुरु सर्व सबराभरी । जाणोनि अभेद-भक्ति करी । धन्य धन्य तो एक ॥ ४ ॥ एक जाणोनि अनेक वाद । टाकोनि, घ्यावा प्रेमसंवाद । तेणेंकरोनि आल्हाद । ब्रह्मा विष्णु शिव येती ॥ ५ ॥ येती निश्चय करूनि देती । आत्मसुख प्रेम लेवविती । लेवूनि गुरुनाम घेती । गुरुभक्तां माझारीं ॥ ६ ॥ माझारीं गुरुभक्तां भारी । त्रिकांडवेद[2] निर्धारीं । अर्थ करोनियां विचारी । देताति सांगोन कैसा ॥ ७ ॥ कैसा कर्ममार्ग सांगती । फळाशा त्यागून करी म्हणती । भेद त्यागूनियां अंतीं । उपासनाप्रामाण्य ॥८॥ प्रामाण्य तत्त्वमस्यादिक । ज्ञान धरिती वरिष्ठ[3]िक । तेणें माया सकाळिक । मिथ्या होय गुरुपायीं ॥ ९ ॥ श्रीः ॥ तो गा वरिष्ठवरिष्ठ । जाणोनि त्या निगर्विष्ठ । सार पूज्य आत्मनिष्ठ । निरंतर ध्यायिजे ॥ १ ॥ श्रीः ॥

---

१ ( श्लोक ) " आलोड्य सर्वशास्त्राणि विचार्य च पुनः पुनः । इदमेव सुनिष्पन्नं ध्येयो नारायणः सदा ॥ " २ कर्म-उपासना-ज्ञानकांडात्मक. ३ श्रेष्ठ.

( प्र० ७९ ) काळ तोहि गुरुवाक्यें सत्य होये नेमला। ब्रह्मा ब्रह्म ठेवी नाम गुरु पूर्ण आपुला ॥ नाहींतरि ब्रह्म कोण ह्मणतसे तयाला। लक्ष्मीधर गुरुवर मज सार पूज्य हो ॥ ६ ॥

( ओंव्या ) काळ जगासी भक्षित। तो गुरुवाक्यें सुनिश्चित। नेमला राहे सुचित्त। गुरुवाक्य कैसें जाणावें ॥ १ ॥ जाणावें पंचमहाभूतांसी। अहंकारीं लय त्यांसी। अहंकारु महत्तत्त्वासीं लय जाहले मायेंत ॥ २ ॥ माया विरली पुरुषांत। मग ब्रह्मा ब्रह्म साक्षात। गुरूनें ह्मणविलें निभ्रांत। एरव्हीं कोण ह्मणेल ॥ ३ ॥ ह्मणेलें ब्रह्म गुरुवरी। न ह्मणावा अंकितें तरी। यालागीं धन्य धरणीवरी। सद्भाविक हो शिष्य ॥ ४ ॥ श्रीः ॥ गुरुपद नलगे ज्यास। गुरुवर ह्मणा त्यास। नलगे वित्त घे चित्तास। मजला सार पूज्य हो ॥ १ ॥ श्रीः ॥

( प्र० ८० ) पूर्णब्रह्म कृष्णरूप वानिताहि नेणती। तोच गुरुरूपें भेट देईल तें जाणती ॥ गुरु ब्रह्म एकरूप तेचि भक्त देखती। लक्ष्मीधर गुरुवर मज सार पूज्य हो ॥ ७ ॥ श्रीः ॥

( ओंव्या ) माया ब्रह्म हा विचार। ज्यामाजीं हारपे साचार। तो श्रीकृष्ण उदार। पूर्णब्रह्म ह्मणिजेती ॥ १ ॥ ह्मणिजेति ब्रह्मादिकें। सांगिजेति पुराणिकें। गाइजेति सकळिकें। शेखीं नेणिजे अनुभव ॥ २ ॥ अनुभवनिष्ठांकित। मग तो गुरुरूपें भेटला अंकित। सद्भावें वरटिक जाणत। गुरु कृष्ण एकचि त्या ॥ ३ ॥ श्रीः ॥ तो गुरुवर मजकारणें। सार पूज्य हो जाणणें। आठवितां म्या नुरणें। मग बोलणें तेणेंचि ॥

( प्र० ८१ ) काळ कोपे तैं हा राखे हरि स्वयें भक्तांसी।

---

१ ब्रह्मवस्तूला ' ब्रह्म ' हें नाम गुरु ठेवतात. २ गुरूहून ब्रह्म अधिक आहे असें ह्मणतो त्यास अंकित ह्म. शिष्य ह्मणूं नये.

हरि कोपे तेव्हां कोण राखावया तयासी ॥ तेव्हां गुरुराय सत्य राखेल हो सर्वांसी । लक्ष्मीधर गुरुवर मज सार पूज्य हो ॥८॥श्रीः॥

( ओंव्या ) विषयांची आवडी जया । काळ कोपे साच तया । तो हरिनामें पावे निर्भया । हरिभक्त साचार ॥ १ ॥ साचार करिती संतनिंदा । मग तो नावडे गोविंदा । तेणें न पावे पदारविंदा । हरि कोपे त्यावरी ॥ २ ॥ त्यावरी गुरूसी आल्या शरण । धरिल्या साचार श्रीचरण । मग तो करूनि प्रबोध सण । उपरी हरि समजे ॥ ३ ॥ समजे हरि वो साचार । ऐसा गुरूचा बडिवांर[1] । परी नेणती जे विचार । जन्ममरण न खंडे ॥४॥ श्रीः ॥ ह्मणवुनी श्रीलक्ष्मीधर । श्रेष्ठ सार परात्पर । आठवो मज निरंतर । मीतूंपण दवडिलें ॥ ५ ॥ श्रीः ॥

( प्र० ८२ ) गुरु रुसतांच कोण अंगीकार करीना । द्वैत-भेद जाचलि त्या अहंभाव मरेना ॥ येणें अंगीकार केल्या अन्य कांहिं चालेना । लक्ष्मीधर गुरुवर मज सार पूज्य हो ॥९॥श्रीः॥

( ओंव्या ) नेणे गरूचें अंतर । आज्ञा मोडे वादीं भरे[2] । मग गुरु रुसोनि सत्वर । त्याग करी तयाचा ॥ १ ॥ तयाचा हो अंगीकार । कोणी न करिती साचार । घडे द्वैताचार फार । भेद मार होतसे ॥ २ ॥ होतसे अहंभावाची वाढी । कोण मग तेथून काढी । नुकले संसाराची अढी[3] । कांहीं उपाय चालेना ॥ ३ ॥ चालेना उपाय जाणोनी । मग मी अपराधी ह्मणवुनी । विनवी शिष्य पायां पडोनी । मग तो सहजचि कृपाळु ॥ ४ ॥ कृपाळुवें अंगीकार । केलिया धन्य होई फार । मग कोणाचा विचार । दूषणाचा चालेना ॥५॥ श्रीः ॥ साचार लक्ष्मीनैराश्य । धरी त्याचें मग दास्य । तोचि सद्गुरु उपास्य । दैवत न चढे त्यावरी ॥ १ ॥ श्रीः ॥

---

१ मोठेंपणा. २ तत्परता, नाद. ३ ग्रंथि, दुर्घटता.

( प्र० ८३ ) बहुजन्मीं हरिभक्ति तरी गुरु भेटेल । गुरुकृपें[2] संसार पाहतांच नासेल ॥ गुरुआज्ञा मोडितांच तीच कृपा जाईल । लक्ष्मीधर गुरुवर मज सार पूज्य हो ॥ १० ॥ श्रीः ॥

( ओंव्या ) संसारसुटकेकारणें । बहुत हरि हो सेवणें । तरीच गुरुमार्गी लागणें । मग संतसंग आवडे ॥ १ ॥ आवडे विवेक वैराग्य । शमदमादिक मुमुक्षुसौभाग्य । पाविजे करूनि ऐकाग्र्य । व्हावें ऐसें अंतरीं ॥ २ ॥ अंतरीं एकाग्र झाल्यावरी । मग त्या गुरु भेटे लौकरी । बोध महावाक्याचा करी । हस्तक ठेवूनि मस्तकीं ॥ ३ ॥ मस्तकीं हस्तक लागलिया पाहे । मीतूंपण भाव सर्व राहे । ऐसी गुरुकृपा सार आहे । जाणे तो आज्ञा न मोडी ॥ ४ ॥ न मोडी आज्ञा कृपे वरूनि । चेला ह्मणति सिद्धमुनि । यालागीं सर्व लाभ सांडूनि । गुरु-आज्ञा करावी ॥ ५ ॥ करावी गुरुआज्ञा जेणें । परम लाभ होईल तेणें । इतर हानीमाजीं येणें । जळो जिणें तयाचें ॥ ६ ॥ ह्मणवुनि गुरु पूज्य सार । लक्ष्मीधर तो उदार । धरितां तयाचा विचार । मीतूं प्रकार लोपला ॥ ७ ॥ श्रीः ॥　　॥

( प्र० ८४ ) गुरुकृपा फळल्याची वळखणें मर्यादा । स्वामि-पाशीं आपणचि नव्हे पूज्य पैं कदा ॥ सर्व नेम शिरावरी गुरु-आज्ञा सर्वदा । लक्ष्मीधर गुरुवर मज सार पूज्य हो ॥ ११ ॥

( ओंव्या ) गुरु शिष्य एकरूप । 'असि' पदीं हो अमूप । कृपा फळे तोचि भूप । निर्गुण सायुज्यमुक्तीचा ॥ १ ॥ मुक्ती-चा धणी झालियावरी । गुरुमर्यादा राखे बरी । स्वामी असतां शिरावरी । आपण गुरुत्व घेईना ॥ २ ॥ घेईना कोणाची पूजा । लावी गुरुपदांबुजा । गुरु सांगे ह्मणे गुजा । तरीच सांगे नेमस्त ॥ ३ ॥ नेमस्त सर्व नेमावरी । गुरु आज्ञा-शिरीं

---

१ नैराश्यलक्ष्मी, तीव्र वैराग्य.　२ पा. भे. 'गुरुकृपेवरी सार पाहतांचि नसेल.'

धरी । मग तो शिष्य जग उद्धरी । गुरुनाम घेऊनियां ॥४॥ घेऊनि लक्ष्मीधरनाम । पावला गुरुवरधाम । तेणें सर्वही आत्माराम । सेवितााति विनोदें ॥ १ ॥ श्रीः ॥

( प्र० ८५ ) शरण मी गुरुलागीं अपराधी ह्मणून । त्राहि त्राहि दयावंता नेणे लीला आपण ॥ लावि सेवे गुरुराया पूर्ण-कृपें वळोन । लक्ष्मीधर गुरुवर मज सार पूज्य हो ॥ १२ ॥

( ओंव्या ) घेतां गुरु तुझें नाम । पावलों कैवल्याचें धाम । चरण तुझे पूर्णकाम । उतराई मी नव्हे ॥ १ ॥ नव्हे नव्हे मी उतराई । त्राहि त्राहि मी अन्यायी । नेणें लीला सुखदाई । दयावंत परि तूं ॥ २ ॥ तुझ्या मज सेवे लावीं । कृपें वळोनि प्रेम दावीं । मीपण हरोनियां लावीं । गुरु पूर्णसागरा ॥ ३॥ सागरीं गंगा मिळाली जैसी । उरली जगीं आहे कैसी । भक्ति दावी साचाचि तैसी । श्रीमद्रमावल्लभदासाची ॥ ४ ॥ इति श्रीगुरु-स्तुति पवित्र । प्राकृतभाषा वदलों विचित्र । श्रीमद्रमाव-ल्लभदास सत्पात्र । गुरुस्तवनें कृतकृत्य ॥ ५ ॥ श्रीः ॥

---

## ( ६ ) शुक्रवारनियमः ।

( श्लोक ) राधा पुनातु जगदच्युतदत्तचित्ता मन्थानमाक-लयती दधिरिक्त पात्रे । यस्याः स्तनस्तबकचूचुकलो-लदृष्टिर्देवोऽपि दोहनधिया वृषभं दुदोह ॥ १ ॥ नायातः सखि निर्दयो यदि शठस्त्वं दूति किं दूयसे स्वच्छन्दं बहु वल्लभः स रमते किं तत्र ते दूषणम् । पश्याद्य प्रियसङ्गमाय दयितस्याकृष्यमाणं गुणैरुत्क-ण्ठार्तिभरादिव स्फुटमिदं चेतः स्वयं यास्यति ॥ २ ॥

( प्रबंध ८६; राग-काफी, आदिताल )

नंदाच्या नंदना, मनाच्या मोहना । तुजवांचुनी ताप जाई-ना ॥ १ ॥ तूं ये रे कान्हा । भेट देई रे मधुसूदना ॥ ध्रु० ॥

संसारयातना, आतां मी सोसेना । शोक अनेक दुःखमोचना ॥ तूं ये रे कान्हा । भेट० ॥ २ ॥ सख्याची वासना । गोविंदीं विटेना । चित्त चंचळ स्थिर होईना ॥ तूं ये रे कान्हा ॥ भेट देई रे० ॥ ३ ॥ राजीवलोचना, सहवेना वेदना । जीव देईन जरि तूं येसी ना ॥ तूं ये रे कान्हा । भेट० ॥ ४ ॥ कृष्णसंभावना, गोपिका टांकेना । कृष्णीं तल्लीन मनभावना ॥ तूं ये रे कान्हा ॥ भेट० ॥ ५ ॥ जीवाच्या जीवना, सुखाच्या निधाना । श्रीरमावल्लभें दास मायेना ॥ तूं ये रे कान्हा । भेट देई रे मधुसूदना ॥ ६ ॥

* ( गद्य ) राधा खेद करी ह्मणे मजवरी कां रूसला श्रीहरी ॥ तंव पातली दूतिका बरी । ह्मणत सुंदरी । चिंता त्यजूनि चाले झडकरी ॥ पाचारिलें तरी गमन धरीं । प्रेम आहे तुजवरी ॥ श्रीरमावल्लभदासवैखरी । गाती प्रबंध कूसरी ॥

स्मरोनि राधा हरि वेणु बाहे । शब्दें निःशब्दीं अतिशब्द लाहे ॥ सच्चित्सुखानंद त्रिभंग पाहे । तें रूप साचें हृदयांत आहे ॥ १ ॥

( प्र० ८७ ) वेणु वाजवणें, तुझेनि स्मरणें । ठाण त्रिभंग मनिं धरणें ॥ तूं चाल राधे । श्याम पाचारी तुजकारणें ॥ १ ॥

( श्लोक ) तरोन देहा कारुण्य साधी । साधूनि भावें स्वमनीं अराधी । आराधितां देइ स्वप्रेम गूज । गुजावरी त्यासि अभेद तूज ॥ २ ॥

हें देह तरणें, श्रीकृष्णा अर्पणें । मग नाहीं जन्ममरणें ॥ तूं चाल राधे । श्याम पाचारी तुजकारणें ॥ २ ॥

( श्लोक ) ज्या भेटतांची सकळीक वावो । नुरे समूळीं शिवजीवभावो ॥ जगदात्म जग हा मग बोल आटे । मीतूंपणासी निरसूनि दाटे ॥ ३ ॥

---

* हा व पुढील या प्रकरणांतील इतर श्लोक यांत अशुद्धें दिसतात, पण पुष्कळ प्रयत्न करूनही समाधानकारक पाठभेद आढळले नाहींत, त्यास उपाय नाहीं।

तयासी भेटणें, दृश्यासि आटणें । द्रष्टृदर्शनभाव सारणें ॥
तूं चाल राधे । श्याम पाचारी तुजकारणें ॥ ३ ॥

( श्लोक ) मी एक तूं एक हा बोल नाहीं । एकांतिं याचा मनिं साच पाहीं ॥ अभेदीं भेद हें बोलणें न साहे । मिळणें तयासी हें साच लाहे ॥ ४ ॥

एकांतीं मिळणें, भेदासी गाळणें । भेद अभेद दोनी वारणें ॥
तूं चाल राधे । श्याम पाचारी तुजकारणें ॥ ४ ॥

( श्लोक ) विलंबु आतां न करीं रसाळे । न धरींच कांहीं संदेहमाळे ॥ देह मानवी हें साफल्य कीजे । श्रीहरिरूपांत अति मेळवीजे ॥ ५ ॥

सत्वर ऊठणें, संशय टाकणें । जन्म सार्थक व्हावयाकारणें ॥
तूं चाल राधे । श्याम पाचारी तुजकारणें ॥ ५ ॥

( श्लोक ) जन्मांतरीं तूं हरि कल्पशील । तरि जन्म नाहीं कां क्षीणशील ॥ बुद्धीसि वैर करिजेत नाहीं । हो मुक्त त्याचा वर देह लाहीं ॥ ६ ॥

पुनरपि जन्मणें, दुर्लभ जाणणें । याचि देहीं त्यासि पावणें ॥
तूं चाल राधे । श्याम पाचारी तुजकारणें ॥ ६ ॥

( श्लोक ) रत श्यामरूपीं हा धर्म थोर । हरिवीण जो तो अधर्म घोर ॥ तल्लीनता लोक पावे चरित्रें । त्या मीळे, गात्रें निववीं पवित्रें ॥ ७ ॥

निजधर्म स्थापणें, अधर्म नासणें । लोकत्रयीं कीर्ति पावणें ॥
तूं चाल राधे । श्याम पाचारी तुजकारणें ॥ ७ ॥

( श्लोक ) हें नित्य नूतन गाणें जयाचें । गोडांत गोड अतिगोड साचें ॥ वदे रमावल्लभदास सार । तरताति लोक भवाब्धिपार ॥ ८ ॥

---

१. भेट घे, ऐक्य पाव.

नीचंनवें गाणें, गोडासि गोडपणें । श्रीरमावल्लभदासाकारणें तूं चाल राधे । श्याम पाचारी तुजकारणें ॥ ८ ॥

॥ इति श्रीराधाष्टकं संपूर्णम् ॥

---

( श्लोक ) हे राधे तव रूप चिंतुनि हरी, राधामयी जाहला । तैसें त्वां हरिरूप चित्तिं धरितां तादात्म्यही तूजला ॥
संधी ही बरि साधिं गे चल झणीं मोदें हरीमंदिरा ।
गाढालिंगन देइं भूतसुहृदा सच्चिद्धना सुंदरा ॥ १ ॥

( प्रबंध ८८; राग—भैरवी, ताल—दादरा. )

धन्य धन्य राधिके । प्रीतिनें तूं आधिके ॥ भाळला गोपाळ तुज, स्वरूपसमाधिके ॥ ध्रु० ॥ भोंवया मेढा ओढिसी । नयनबाण सोडिसी ॥ चित्तचोरटा मृग, लक्ष्य लावुनि पाडिसी ॥ धन्य० ॥ १ ॥ हृदय आच्छादिसी । पल्लवातें लाविसी ॥ तेणेंकरुनि श्यामाचित्त, आधिक तूं भुलविसी ॥ धन्य० ॥ २ ॥ मी गेलें होतें त्याजवळीं । तेणें धरिलि मौन गुराळि ॥ अवस्था तुझीच आहे, मनें माझ्या तर्कें कळली ॥ धन्य० ॥ ३ ॥ राधिका बोलावूं काई । ह्मणतां हास्य आलें बाई ॥ मग मी आलें तुजपाशीं, चल भोग सुख धायी ॥ धन्य० ॥ ४ ॥ ऐसें ऐकुनियां वचन । राधा तेव्हां करी गमन ॥ रमावल्लभदास ह्मणे, आनंदलें असे मन ॥ धन्य० ॥ ५ ॥ श्रीः ॥ ॥

( श्लोक ) साश्रुसाध्वसमानन्दे गोविन्दे लोललोचना ।
सिञ्जन्ती मञ्जु मञ्जीरं प्रविवेश निवेशनम् ॥ १ ॥
आतिक्रम्यापाङ्गश्रवणपथपर्यन्तगमनप्रयासेनेवाक्ष्णोस्तरलतरतारं पतितयोः ॥ इदानीं राधायाः प्रियतमसमालोकसमये पपात स्वेदाम्बुप्रसर इव हर्षाश्रुनिकरः ॥ २ ॥

---

१ नित्य नूतन, अवीट.

( प्रबंध ८९; राग–भाग्यश्री. ताल–त्रिवट. )

ते श्यामभेटीं, राधा चालली निजमंदिरीं ॥ ध्रु० ॥ उपचार करीं, घेवोनि परोपरी । निर्भर तन्मय होत अंतरीं ॥ ते श्यामभेटीं० ॥ १ ॥ भावार्थाचीं बरीं, लेणीं चराचरीं । शोभा, शोभताहे अतिकूसरीं ॥ ते श्यामभेटीं० ॥ २ ॥ आनंद-सागरीं, समरस आदरीं । गाइजे गंधर्व गीत किन्नरीं ॥ ते श्यामभेटीं० ॥ ३ ॥ सुमनाची सरी, वर्षाव अंबरीं । श्रीरमावल्लभदासा उद्धरी ॥ ते श्यामभेटीं, राधा चालली निजमंदिरीं ॥ ४ ॥

## ( ७ ) शनिवारनियमः ।

( श्लोक ) यं वै न वेद वितथाक्षपथैर्भ्रमद्धीः । सन्तं सुखेष्वसुषु हृद्यपि दृक्पथेषु ॥ तन्माययावृतमतिः स उ एव साक्षादाद्यश्च योऽखिलगुरोरुपसाध्यवेदः ॥ १ ॥

( प्रबंध ९०; राग–झिंजोट जिल्हा. )

प्रगटाचि कृष्ण आहे, असतांहि कळों नेदी । अघटित माया याची, घाली जन देहबुद्धी ॥ १ ॥ ये रे कृष्णा अंतरंगा, तुजवीण नाहिं बरें । म्हणें विसरू घालिसी, आपुलाचि मज तूं रे ॥ ध्रु० ॥ गातांति वानितांति, सर्वां सर्वही भ्रांती । पदोपदिं गुरुरूपें तूं, भेटसि तरी सर्व सिद्धि ॥ ये रे० ॥ २ ॥ तुझा आठवे नाठवे, संसारिं असतां रे । तुज नेणतां लौकिक, मज तें ओझें बा रे ॥ ये रे० ॥ ३ ॥ माझें मीपण मज नको, सर्वहि तूं होय देवा । तुझ्या भक्तांची संगति, मज तो पूर्ण द्यावा ॥ ये रे० ॥ ४ ॥ भक्तां तुज वेगळिक नाहीं, ऐसि मज देई सेवा । म्हणे रमावल्लभदास, तोडीं भेदाभेद मावा ॥ ये रे० ॥ ५ ॥ ॥ श्रीः ॥

१ नाना प्रकारचीं सुगंधी द्रव्यें इ०. २ अलंकार. ३ एकरस, ऐक्य. ४ लाभ. ५ माया, गारूड.

( प्रबंध ९१; राग—भैरवी. साकीच्या चालीवर. )

गोपाळा मी तुझाचि दास, करिसी कां मन उदास । क्षीण केलें शरीरास, बळ नाहिं भजायास ॥ १ ॥ बरें बरें कृष्णा बरें, करिशील तें तूं बरें । माझें कांहीं न चले खरें, शरण आहें एकसरें[1] ॥ ध्रु० ॥ कृष्णावीणें विषयभोग, त्याचे पोटीं आहेति रोग । वैराग्य नाहीं आत्मयोग, तेणें होय दुःखसंयोग ॥ २ ॥ भक्त ह्मणे विषय भोगिले, तें तें सुख तुज वाहिलें । नेदिसी कां प्रेम वहिलें, आत्मसुख दुराविलें ॥ ३ ॥ महाराज ह्मणे वरटिक, बोलशील तें तें लटिक । प्रेम तुज दिलें सकळिक, तरीच शब्द अलौलिक[2] ॥ ४ ॥ भक्तवचन आइकिलें, समाधान अति वाहिलें । श्रीरमावल्लभदासें पाहिलें, शिर चरणावरी ठेविलें ॥५॥

( प्र० ९२—अभंग ) असतां श्रीकृष्ण शिरीं । जन काय करितिल बहिरीं ॥ १ ॥ कोणाची नाहीं परवा । मज पाहतां कृष्ण बरवा ॥ २ ॥ आह्मीं धरिले कृष्णपाय । जन करील आमुचें काय ॥३॥ श्रीकृष्ण आमुचा सखा । सर्वत्र पाठीराखा ॥ ४ ॥ श्रीकृष्ण आमुचा धणी । वागवी पूर्णपणीं ॥ ५ ॥ कोणी घालिती बलाय[3] । ती चुकवित कृष्णमाय ॥ ६ ॥ आह्मीं धरूं जातों भय । तंव कृष्ण दे निर्भय ॥ ७ ॥ कृष्ण आहे आह्मांकडे । काय करितिल दुर्जन गडे ॥ ८ ॥ काय पडे उणें तेथें । परिपूर्ण कृष्ण जेथें ॥ ९ ॥ श्रीरमावल्लभदास । श्रीकृष्ण वरद त्यास ॥ १० ॥ श्रीः ॥

( प्र० ९३ ) हरि हा एक हरि हा एक, एकपणाविण संचला[4] । सकळ होउनि सकळ राहुनि, दिसत भास वेंचला[5] ॥ ध्रु०॥

१ सत्वर. २ अलौकिक. ३ भानगड, संकट. ४ भरला. ५ नाहींसा झाला.

पतीतपावन अतीतभावन[1], नेणे तूं कोणासी । निजरक्षण स्वधर्मरक्षण, जाणवे तो भक्तासी ॥ १ ॥ सारासार अतिविचार, नेणे निर्धार निजाचा । संतसंग पापभंग, मनीं रंग हरीचा ॥ २॥ जीवशिव ब्रह्मभाव, न कळे नवल तयाचें । साधनाचे बोल वाचें, नव्हे मार्ग मुक्तीचे ॥ ३ ॥ भक्ति मूळ ज्ञान फळ, वैराग्य फूल तयाचें । सद्गुरुचरण सर्वस्वशरण, मन उन्मन तयाचें ॥ ४ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति पाहीं, अवस्था कांहीं नसती । तुर्या उन्मनी गेली बुडोनि, कोण तया पूसती ॥ ५ ॥ पिंडब्रह्मांड माया रांड, नाहीं खांडचि तो । ठाण माण कैंचें जाण, नुरेचि आपण अभेद तो ॥ ६ ॥ काय मी पाहूं कोठें मी राहूं, ठावु नाहिंच ऊरला । रमावल्लभदास स्वयें, भरोनि आपण ऊरला ॥७॥ श्रीः ॥

**भजनें**—त्या त्या वार-नियमाच्या आरंभीं ह्मणायाचीं.

**रविवार**—श्रीरघुनंदन राक्षसकंदन । राम दयाघन पालय मां ॥
**सोमवार**—शिव हर रे शिव हर रे शंभू शंकर शिव हर रे ॥
**मंगळवार**—त्रिपूरहरणी जगदुद्धरणी । नारायणी गे नारायणी ॥
**बुधवार**—दत्ता दिगंबरा ये रे ॥ सांवळ्या भेट मला दे रे ॥
**गुरुवार**—सद्गुरुनाथ सद्गुरुनाथ । मी अपराधी घ्या पदरांत ॥
**शुक्रवार**—चित्त चोरट्या गोवळिया । राधारमणा सांवळिया ॥
**शनिवार**—श्रीकृष्ण विभो जय कंसारे । पाहि हरे मामिह संसारे ॥

---

1 भावनेच्यापलीकडे.



# प्रकरण ४ थें—भक्ति.

(प्र० ९४) आतां अवघ्यांनीं उठावें । रामनाम हें ह्मणावें ॥ १ ॥ झाला संतांचा शेजार । करा नामाचा गजर ॥ २ ॥ विनवी एका जनार्दन । भक्तां पावतो भगवान ॥ ३ ॥

(भजन) दीनोद्धरणा रामा रे । दीनदयाळा कृष्णा रे ॥
गोपीजीवन गोपाळा । भज, राधारमणा गोविंदा ॥ १ ॥

(श्लोक) श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ॥
अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ १ ॥
श्रीकान्तश्रवणे परीक्षितिरभूद्वैयासकिः कीर्तने
प्रल्हादः स्मरणे तदङ्घ्रिभजने लक्ष्मीः पृथुः पूजने ॥
अक्रूरस्त्वभिवन्दने कपिपतिर्दास्येषु सख्येऽर्जुनः
सर्वस्वात्मनिवेदने बलिरभूत्कैवल्यमेषां फलम् ॥ २ ॥

(प्रबंध ९५; राग—केदार. ताल—दीपचंदी)

हरिकथाश्रवण, परीक्षिति सुजाण । ऐके तें आपण अंगें होये ॥ होय नव्हे ऐसा, संशय नाहीं । पूर्णत्वें परिपूर्ण पाहे ॥ राहिलें गेलें, देहचि तो नेणे । देहींच विदेही होये ॥ श्रवणीं समाधी, नित्य नवा आनंदु । ब्रह्माहमस्मि न साहे रया ॥१॥ नवविधा भक्ति, नव रात्री व्यक्ति । अवघिया एकचि प्राप्ती ॥ एका जनार्दनिं अखंडता तैं, मुक्तीचीही फिटे भ्रांती रया ॥ ध्रु० ॥ हरिच्या कीर्तनें, शुक आणि नारद । छेदिति अभिमानाचा कंदु ॥ गातां पैं नाचतां, अखंड आनंद । कीर्तनीं परम आल्हादु ॥ हरिनामगजर, स्वानंदें हुंबरे । जिंकिला मायेचा बाधु ॥ श्रोता वक्ता दोघे, सुखरूप झाले । वोसंडला ब्रह्मानंदु रया ॥ नवविधा० ॥ २ ॥ हरिचेनि स्मरणें, द्वंद्वदुःख नाहीं । हे भक्ति प्रल्हादा-ठायीं ॥ कृतांत कोपलिया, रोम वांकुडि नोहे । निर्भयता निज देहीं ॥ अग्नि विष आप, नेदी त्या संताप । न तुटे शस्त्राचे

घायीं ॥ स्मरणाचेनि बळें, परिपूर्ण झाला । देह विदेह दोन्ही नाहीं रया ॥ नवविधा० ॥ ३ ॥ हरिचरणामृत गोड, मायेसी उठी चाड । लांहलाहत झाली रमा ॥ चरणद्वय भजतां, मुकली द्वंद्वभावा । ह्मणोनि पढिये पुरुषोत्तमा ॥ हरिपद लागतां, शिळा उद्धरली । अगाध श्रीचरणाची महिमा ॥ हरिचरणीं विनटोनि, हरिरूप पावली । परि चरण न सोडी रमा रया ॥ ॥ नवविधा० ॥ ४ ॥ 'शिवें शिवें यजिजे', हें वेदींचें वचन । पृथुराया बाणलें पूर्ण ॥ पूज्यपूजकभाव, सांडोनीयां रावो । सद्भावें करी पूजन ॥ देहिं देव दाटला, भक्तभाव आटला । हें मुख्य पूजाविधान ॥ त्रिगुण त्रिपुटि छेदुनियां ते । पूजेमाजीं समाधान रया ॥ नवविधा० ॥ ५ ॥ हरिचरणरजरेणु, वंदुनी मस्तकीं । पावन झाला अक्रूर ॥ पावनपणें प्रेमें, वोसंडे तेणें । वंदी तो श्वान सूकर ॥ वृक्ष वल्ली तृण, घाली लोटांगण । सद्भावें वंदीं गोखर ॥ दंडाचीये परि, लोटांगण घाली । हरिरूप दिसे चराचर रया ॥ ६ ॥ जीव जावो जिणें, वचन नुलंघणें । सेवेचा मुख्य हा हेतु ॥ या सेवें विनटोनि, सर्वस्वें भजोनि । दास्य करी हनुमंतु ॥ शस्त्राचेनि बळें, न तुटे न बुडे न जळे । देहीं असुनि देहातीतु ॥ या सेवेच्या बळें, जन्म मरण होळी । भजनें धन्य कपिनाथू रया ॥ ७ ॥ सख्यत्वें परपार, पावला अर्जुन । न पुसतां दे ब्रह्मज्ञान ॥ खड्गाची खणखण, बाणाची सणसण । उपदेशाचें तेंचि स्थान ॥ युद्धाचिये संधीं, लाविली समाधि । कल्पांतीं न मोडे जाण ॥ निजसख्यें दोघां, पडलें आलिंगन । नाहीं भिन्नाभिन्नपण रया ॥ ८ ॥ बळीची दान-दीक्षा ती कैसी । जीव देउनि सर्वस्वेंसीं ॥ अनंत अपरंपार, त्रिविक्रम सधर । आकळिला हृषिकेशी ॥ हृद-

---

१ लसलसित. २ आवडती. ३ 'शिवो भूत्वा शिवं यजेत्.।' ४ गायी व गाढव.

यांचा हृदयस्थ, आकळितां तंव । देव तो निज माया ग्रासी ॥ यापरि सर्वस्व, देउनियां दान । घरद्वारीं बांधी देवासी रया ॥ ९ ॥ भक्ति हे अखंड, अधिकाराचें तोंड । खंडोनि केलें नव-खंड ॥ एकएका खंडें, एकएक तरला । बोलणें हेंचि वितंड ॥ अखंडता जंव, साधिलि नाहीं तंव । मुक्त म्हणे तो पाषांड ॥ बद्धता मुक्तता, दोन्ही नाहीं तेथ । ब्रह्मत्वें नुरे ब्रह्मांड रया ॥ १० ॥ सहजस्वरूपस्थिति, ते नाम निज भक्ति । भगवद्भाव सर्वांभूतीं ॥ ऐसिये भक्तीप्रति, अंगें लाधे मुक्ति । दास्य करी अहोरातीं ॥ दासिसी अनुसरणें, हें तंव लाजिरवाणें । मूर्ख ते मुक्ति मागती ॥ एका जनार्दनीं, एकविधा भक्ति । चारी मुक्ति मुक्त होती रया ॥ नवविधा० ॥ ११ ॥ श्रीः ॥

( भजन ) जय जगदंबे अंबाबाई । मला ठाव द्यावा पायीं ॥
जय जगदंबे कृष्णाबाई । येउनि माझे हृदयीं राहीं ॥

( प्रबंध ९६; राग–झींजोट. ताल–दीपचंदी. )

( माझे ) कान्हाई जगदंबे, स्वानंदकदंबे, पंढरपूरं रहासी । पुंडलिकाचें मीसें, युगें अठ्ठाविसें, भक्तांची वाट पहासी । भव-भयमोचने, तन्मयलोचने, करद्वय कटिं वाहासी । तुझें नवरात्र प्रसिद्ध, भक्ति नवविध, भावार्थें गोंधाळें नाचतेसी ॥ चाल ॥ कैसि प्रसन्न वदनें दिसतेसि ॥ कैसि प्रसन्न वदनें दिसतेसि, गे विठ्ठले । तूं माझी माऊली ॥ १ ॥ साधुजनांचि साऊली, संत जनांची माऊली । प्रेमपान्हा निचनव पाजिसी, आतां होसी होसी गाऊली ॥ आतां होसि होसी गाऊली गे विठ्ठले, तूं माझी माऊली ॥ ध्रु० ॥ पहिलें उपोषण, 'श्रवण' मनन, भागवत बरें केलें । अवधान व्यवधान, हेंचि हें विधान, घटासि ये स्थापियलें । गहनासि गहन, तुझें आवाहन, सद्भावें होऊनि

१ ( पा० भे० ) " जाग्रति आणि स्वप्न सुषुप्तीं । निरंतर भगवद्भक्ति ॥
भक्तीचिया प्रति अंगीं राहे मुक्ति । हे मुख्य भाक्ति मागती ॥ "

ठेलें । बहुत मानवला, परीक्षिति भला, उठविलें प्रेम निजेलें ॥ चाल ॥ माझें मनाचें मनपण गेलें ॥ माझें मनाचें मनपण गेलें गे विठ्ठले । तूं माझी माऊली ॥ २ ॥ 'नामसंकीर्तन,' दुसरें हें पूजन, क्षुधा तहान गेली । त्यजुनि मान दंभ, होऊनि स्वयंभ, कल्पना निःशेष मेली । भक्ति आणि मुक्ति, सकळिक युक्ति, धरिलीही प्रीतीच्या वेलीं । नारद व्यासासि, शुक योगियासि, समाधि लाजत ठेली ॥ चाल ॥ ऐसि कुरवंडि ती मज केली ॥ ऐसि कुरवंडी ती मज केली गे विठ्ठले । तूं माझी माऊली ॥ ३ ॥ उपोषण तीजें, 'स्मरण' बीजें, स्मरतसे रात्रंदिवस । जिकडे पाहे तिकडे, तूंच चहूंकडे, दुसरें नाहीं परेश । जळांत स्थळांत, काष्ठपाषाणांत, तत्त्वें तूंचि पंचवीस । प्रल्हादासी वर्म, ठावें हें परम, निर्भय तोडितां शीर्स ॥ चाल ॥ तो नव्हे मनिं कासावीस ॥ तो नव्हे० ॥ ४ ॥ चवथा उपवास, 'चरणकमळिं वास' । उपवास नाठवे कांहीं । ठक्के[2] पडलेंसे, मन जडलेंसे, देहचि न दिसे कांहीं । जगत्रयजननि, भीमकनंदिनि, जागत रुचि निर्वाहीं । भली भली ह्मणे, स्वरूपपणें, मंगळ याहूनि नाहीं ॥ चाल ॥ आतां मंगळरूपें तूं राहीं ॥ आतां० ॥ ५ ॥ पंचम दिवसीं, 'अर्चन' मानसीं । करून धरिली हांवं[3] । तंव पूजक पूज्या, तूंच चतुर्भुजा, त्रिपुटी बुडतां ठाव । (आतां) कांहींच नूरोनि, पाहीं गे फिरोनि, सकळिक तूं रूपनांव । अखंड अर्चन, होतसे गहन, पृथुराव घेतसे धांव ॥ चाल ॥ तुझें पूर्णरूप अथांव[4] ॥ तुझें० ॥ ६ ॥ साहवे दिवसीं, तुज मी गिंवसी[5], देख पडे सर्वां ठायीं । अष्टाहि अंगें, सुप्रेम रंगें, लोळत सकळां पायीं । करितां 'वंदन,' देवकिनंदन, पाहिला दुहित गायी । अक्रूराची खूण, धरवीं मज गुण, न

---

१ डोकें. २ दृष्टि ताटस्थ्य. ३ प्रबळ इच्छा. ४ अगाध. ५ शोधतों.

हिंडे न हिंडे वांयी ॥ चाल ॥ मजला सनाथ करीत जाई ॥ मजला० ॥ ७ ॥ सप्तम परम, 'दास्यत्व' संभ्रम, नाठविसी अपराध । मग सकळिक जीव, ब्रह्मादिक शिव, मायेचा नाहींच बाध । सांवळ्या तुझें जाण, वचनचि प्रमाण, दुसरें नमनीं अगाध । उद्धव हनुमंत, मानवले संत, ह्मणति मज साधं[1] साध ॥ चाल ॥ तुझें पूर्णरूप अगाध ॥ तुझें० ॥ ८ ॥ अष्टमरात्र, तुज प्रीतिपात्र, जाहलों अत्यंत सार । 'सख्यत्वेंसिं' पाहीं, उणें पुरें कांहीं, नाठविसी साचार । अति उतावेळीं, संकटमेळीं, पावसि तूं अपार । तुझें हो सख्यत्व, बहुत ममत्व, अर्जुना चाडलें[2] फार ॥ चाल ॥ तो नेणे गे दुजा विचार ॥ तो नेणे० ॥ ९ ॥ नववे दिवसिं आतां, नवरस गातां, सर्वहि तुज 'निवेदावें[3]' । देहादि पसारा, संपत्ति दारा, माझें कांहिं न ह्मणावें । पारणें फेडिलें, सर्वहि होमिलें, उरलें तेंचि मज द्यावें । आपणास देईजे, तुज हो घेईजे, वर्म हें बळीस ठावें ॥ चाल ॥ तरी तूं द्वारपाळ होसि भावें ॥ तरि तूं ॥१०॥ (ऐसि) नवविधा भक्ति, नवरात्रि व्यक्ति, माजीं एक जया घडे । सकळिकांचें फळ, एकचि सफळ, सद्भावें गोंधळ पडे । सद्गुरूस्वरूपें, नटुनियां रूपें, पाहसि भक्त साबडे । श्रीलक्ष्मीधरदास, तुझी करित आस, न करि आन बड-बड ॥ चाल ॥ तुजला आठवितों घडीघडीं । तुजला० ॥११॥

( ओंव्या ) जैसी नवखंडीं एक क्षिति । कीं नवरत्नीं एकचि कांति । तैसी नवरात्री नवभक्ति । भुक्ति मुक्ति एकचि ॥ १ ॥ तेवीं नवविधांची एक निजस्थिति । तेंचि नवविधहि एक भक्ति । ती एकात्मा गाऊं गीतीं । पूजूं प्रीतीं स्वात्मानंदें ॥ २ ॥ तेथें पूज्य पूजक पूजनक्रम । देवो देवी सकळ नाम । एक चिदानंद कृष्ण परब्रह्म । आत्माराम तो वंदूं ॥ ३ ॥ ॥ श्रीः ॥

---

१ साधून घे. २ आवडलें. ३ अर्पण करावें.

# प्र० ५ वें—ध्यानोपासना, गोंधळ इ०

( भजन ) सद्गुरु धांव बा जगदीशा । जयजय पुराणपुरुषा ॥

## ( १ ) ध्यानोपासना.

( प्रबंध ९७ ; राग—गौरी; ताल—धुमाळी. )

सद्गुरुसुंदरे, ब्रह्मादिकां अगोचरे हो । न कळे तुझी महिमा, भक्तांलागीं तूं साकार हो । अनंत अपरंपारे, निजसुखे प्रेमसारे हो। तुज माये नमितां, भेदाभेद कांहीं नुरे हो ॥ सद्गुरुसुंदरे ॥ध्रु०॥ जगें मज सांडिलें, जाहलों जगा मी वेगळा हो । ह्मणवुनि तुज शरण, आई आलों उताविळा हो । देउनि आपुलें प्रेम, मजला तारिजे अवलीळा[1] हो । दृश्य आणि द्रष्टा, सर्वहि तुझा हा सोहळा हो ॥ सद्गुरुसुंदरे ॥१॥ सरत्या[2] जगांत, मीच जहालों सरता[3] हो । विचित्र वेष तुझा, कोणा न कळसि तूं तत्त्वता हो । तुझेनि वचनमात्रें, ब्रह्मबोध शिष्यचित्ता हो । कृपावंत ऐसी, आणिक न दिसे शोधितां हो ॥ सद्गुरु० ॥ २ ॥ ऐसें तुझें रूप, व्यक्त अव्यक्त अतीत हो । क्षर आणि अक्षर, तेथें नाहींच भासत हो । मतें नाना ऐक्या, आलीं सर्वहि तुझ्या आंत हो । मीतूंपण नुरे, वाचा राहिली निवांत हो ॥ सद्गुरु० ॥ ३ ॥ तुजला पहातां मानसीं, सर्वां ठायीं तूं अससी हो । एक भावार्थावांचुनी, भेटि आणिका न देसी हो । जागृति आणि स्वप्न-सुषुप्ति नाहीं तुजपाशीं हो । तूर्या आणि उन्मनी, बुडोनि गेली समाधिसीं हो ॥ सद्गुरु० ॥४॥ अर्भकं[4] मूढमती, करूं नेणे तुझी स्तुती हो । परि मजलागिं कनवाळु, तुझी मजवरि बहु प्रीती हो । वेगीं माझें मन, आतां आणी तूं निवृत्तीं हो । रमावल्लभदास, भक्त येतो काकुळती हो ॥ सद्गुरुसुंदरे० ॥ ५ ॥ श्रीः ॥

---

१ सहज, लीलेनें. २ नाशवंत. ३ कृतकृत्य. ४ बालक.

(ओंव्या) ऐसें गुरुदेवतावंदन । करितां वंद्यवंदकपण । एकवटलें येणें जाण । करिती[१] खूण ऐसी असे ॥ १ ॥ सागराचें गडगर्जन । लहरी गर्जून दावी पूर्ण । परि तो सागरु लहरीसिं जाण । वेगळेंपण उरों नेदी ॥ २ ॥ तैसें वंद्यवंदकत्वें वंदन । करी हा आपुलें आपण । पुढें ध्यातृध्येय स्वयें होऊन । मूर्तिध्यान चालवी ॥ ३ ॥

(भजन) राधाकृष्ण जय कुंजविहारी । मुरलीधर गोवर्धनधारी ॥
राधाकृष्ण जय कुंजविलासा । गोपीमानस-राजहंसा ॥
राधाकृष्ण जय मुरलीवाला । चला गड्यांनो पाहूं त्याला ॥

( प्रबंध ९८; राग–खमाज, ताल-धुमाळी. )

हृदयवृंदावनीं, उभी सद्गुरु सांवळी हो। मांडुनि त्रिभंग ठाण, गोपीगोपाळांच्या मेळीं हो । अरुण प्रभा दीप्ति, लाजे चरण-कमळीं हो । ध्वज वज्र पद्म, ऊर्ध्व रेखा तेजागळी[३] हो ॥ १ ॥ सद्गुरु-व्यापके, कोण्हा न कळे तुझा पार हो । सगुण गुणातीत, तूंचि होऊनी साकार हो । गाती तुझें नाम, त्यांसी करिसी तदाकार हो । देउनि आपुलें प्रेम, नुरविसी भेदा थार हो ॥ सद्गुरु-व्यापके ॥ ध्रु० ॥ दशदिशां आंगुलिका, नखीं नक्षत्रांचा मेळा हो । सुनिळ वर्तुळ साजिरे, घोंटीं फांके रत्नकिळा[४] हो । वांकी तोडर झणत्कार, कांपे असुरांचा मेळा हो । मर्गजस्तंभ[५] जैसे, तैशा पोटऱ्या सरळा हो ॥ सद्गुरु-व्यापके ॥ २ ॥ जानु जंघा नीट, पीतांबर कटितटीं हो । किंकिणि क्षुद्रघंटा, गर्जति अनुहात बोभाटी हो । नभीं विद्युल्लता दाटी, कासे साजे मल्लगांठी हो । बहु मेखळा गोमटी, दिसतसे जगजेठी हो ॥ सद्गुरु० ॥ ३ ॥ न कळे उदरगरिमा, नाभीकमळीं झाला ब्रह्मा हो । अनेक मुक्तपदकें, शोभताति हृदयधामा हो । पुष्पमाळा कौस्तुभ, गळां

१ करण्याची. २ या पदांत मूर्तिध्यान पायांकडून मस्तकापर्यंत क्रमानें केलेलें आहे. ३ तेजानें श्रेष्ठ अशी. ४ रत्नाचें तेज. ५ मरकत म्ह० पाचूचे खांबाप्रमाणें.

दिसतसे मेघश्यामा हो । आपाद वानिंची माळा, वैजयंती पुरु-षोत्तमा हो ॥ सद्गुरु० ॥ ४ ॥ आरक्त करकमळ, नखीं चंद्र-प्रभाकीळ हो । जडित मुद्रिका बोटीं, त्यासी जडले इंद्रनीळ हो। हस्त कडगिं बाहुवटीं, काय वानूं तो मी ढाळ हो । विश्वभुज तमालनीळ, कैसा शोभतो गोपाळ हो ॥ सद्गुरु० ॥ ५ ॥ हणुवटि अतिगोमटी, प्रवाळ फळ लाजे ओंठीं हो । दंतपंक्ति हिरिया-ज्योति, न ये बोलतां ती गोठी हो । नासिक सरळ पद्मनेत्र, कैशा तीक्ष्णें भ्रुकुटी हो । अभाळभाळिं केशर टिळा, अक्षता माणिक ललाटीं हो ॥ सद्गुरु० ॥ ६ ॥ मकराकृति कुंडलें, तेज गंल्लीं[1] हें अपार हो । चांचर कुरुळिं देव सकळ, भ्रमर जाहले साचार हो । कोटि अर्क त्यांहुनि अधिक, मुकुटप्रभा हा विस्तार हो । बर्हपत्रें अतिविचित्रें, शिरिं शोभिन्नली फार हो ॥ सद्गुरु० ॥ ७ ॥ हांसतमुख अतिसुरेख, न कळे महिमा चतुरानना हो । सहस्र फणि स्तवितां, वदनीं जिव्हा चिरल्या जाणा हो । वेदश्रुतीं न ये व्यक्ति, सहा अठरा नव्हे गणना हो । अपरांपरीं न कळे थोरी, अनुमाना न ये जाणा हो ॥ सद्गुरु० ॥ ८ ॥ यमुनातटीं उभे धीट, वेणु वाजवीत छंदें हो । वायु अंबरीं तल्लिन पार, तैसें स्थिर झालें नादें हो । गायी पक्षी तेंचि लक्षी, वृत्ति वेधल्या आनंदें हो । त्रिभुवना मोहन गहन, घातलें नंदानंदें हो ॥ सद्गुरु० ॥ ९ ॥ ऐसी ब्रह्मानंदमूर्ति, परमसु-खाची तूं दाती हो । केवळ ज्ञानाची निभ्रांती, सुखदुःखासी अतीत हो । व्योमाची उपमा ती, तुज न साहे निश्चितीं हो । रमावल्लभदासा, सर्वांठायीं सदोदीत हो ॥ सद्गुरु-व्यापके ॥ १० ॥

( ओव्या ) ऐसें मूर्तिध्यान करूनि सावकाश । अंतरींच मूर्ति भावितां स्वयंप्रकाश । तंव ती प्रगटली सन्मुखास । त्या

---

१ गालावर.

सुखास पार कैंचा ॥ १ ॥ सांवळी सुंदरी सगुण मूर्ति । देखिली ज्या रूपाची अलौलिक स्थिति । मग जयजयकारें संस्तुती । करवी सुवृत्ती स्वानंदें ॥ २ ॥ जैसें जें सगुण रूप दाखवी । तैसें तें अगुण रूप माखवी । ऐसें हें गुणागुणस्वरूप चाखवी । सहसें रमाधवकविदासासी ॥ ३ ॥ श्रीः ॥

( भजन ) कृष्णाई प्रेमपान्हा देई । मजला घडीघडीं ॥

( प्रबंध ९९ ; राग पिलू, ताल दीपचंदी. )

यमुनातटीं[1] नेटकी, बाई नेटकी । मुखिं वाजवि पांवा ॥ हास्य वदन चांगलें, बाई चांगलें । कैसा शोभत यावा[2] ॥ सुरासुरगण स्तविती, बाई स्तविती । मनिं धरूनि भावा ॥ सुमनवर्षाव वर्षती, बाई वर्षती । महादेवादिदेवा ॥ १ ॥ ऐसी ही माझी कान्हाई, माझी कृष्णाई । माझ्या अंतरिं भरली ॥ सर्वही चाळक पाळक, बाई पाळक । सर्वठायीं व्यापिली ॥ जिव्हेची व्यक्ती होउनी, बाई होउनी । पाहें बोलवी बोली ॥ भावार्थ गोंधळिं आपण, बाई आपण । स्वयें नाचूं लागली ॥ ऐसी० ॥ ध्रु० ॥ माथां मुकुट सोज्ज्वळ, बाई सोज्ज्वळ । भाळिं केशर टिळा ॥ सुरंग खचित अक्षत, बाई अक्षत । लाजे माणिककीळा ॥ नयन झळक वारिज, बाई वारिज । न ये बोलतां लीळा ॥ नासिक सरळ सुंदर, बाई सुंदर । शोभे कौस्तुभ गळां ॥ ऐसी० ॥ २ ॥ पदक हृदयिं चांगलें, बाई चांगलें । मुक्तें जडलीं त्यास ॥ आपाद वनमाळा हो, वनमाळा हो । नाभीं जन्म ब्रम्ह्यास ॥ कटितटिं पीतांबर मेखळा, बाई मेखळा । अनुपम्य प्रकाश ॥ पायीं नूपुर अंदु तोडरु, करी गजरु । नादें असुरां नाश ॥ ऐसी० ॥ ३ ॥ अहं कोल्हासुर वधोनी, बाई वधोनि । कोहं कंस मारिला ॥ दंभ दर्प अभिमान । बाई अभिमान ।

---

१ या पदांत मूर्तिध्यान मस्तकाकडून पायापर्यंत केलेलें आहे. २ डौल.

त्याचा संहार केला ॥ क्रोध निंदा अज्ञान, बाई अज्ञान । त्याचा ठाव पुसीला ॥ अविद्या थोर ती राक्षसी, बाई राक्षसी । तिचा गळा निवटीला ॥ ऐसी० ॥ ४ ॥ नखचंद्र अतिसोज्ज्वळ । बाई सोज्ज्वळ । तळव्या अरुणरंगें ॥ ध्वज वज्र आणि पद्म हो, बाई पद्म हो ॥ पाहतां भ्रांति ही भंगे ॥ अंकुश आणि ऊर्ध्वरेखा हो, ऊर्ध्वरेखा हो । भक्तिलागिं मानवत गे ॥ श्रीरमावल्लभदास हो, हरिदास हो । तेथें रंगला रंगें ॥ ऐसी ही माझी० ॥ ५ ॥

( भजन ) चित्त चोरटा विठेवरला । तो हरि माझ्या मनिं भरला ॥

( प्रबंध १००; राग—ललित, ताल—दीपचंदी. )

व्यक्ताव्यक्तअतीत, बाई अतीत । तुझा न कळे पार ॥ अनादि सिद्ध तूं अविनाश । बाई अविनाश । अनंत परात्पर ॥ चिन्मय चिदाकाश तूं, चिदाकाश तूं । परब्रह्म साकार ॥ निर्गुण तें तूं सगुण, बाई सगुण । भक्तांलागिं आकार ॥ १ ॥ ऐसी सद्गुरु माउली, गुरु माउली । तुझी अकळ कळा ॥ मस्तकिं ठेवुनि हस्तक, बाई हस्तक । मज तारिलें अवलीळा ॥ श्रवणिं निजगुज सांगोनी, बाई सांगोनी । लावी नामाचा चाळा । अज्ञान-तिमिर नाशिलें, बाई नाशिलें । ज्ञानअंजन डोळां ॥ ऐसी सद्गुरु० ॥ ध्रु० ॥ आकार निराकार तूं, निराकार तूं । अप्रमेय सदोदित ॥ आधार निराधार तूं, निराधार तूं, विश्वीं विश्वातीत ॥ विश्वपाळक तूंच तूं, बाई तूंच तूं । आन नाहीं दिसत ॥ परात्पर तूं अधिक, बाई अधिक । भक्तां हित अपरिमित ॥ ऐसी० ॥ २ ॥ नकळसि भाव अभाव, बाई अभाव । काय बोलूं मी गोष्टी ॥ परिपूर्णभावें तूं संपूर्ण, बाई संपूर्ण । वोळंसि स्वानंदवृष्टि ॥ पूर्णब्रह्म तूं व्यापक, बाई व्यापक । दिससि स्वानुभवें मोठी ॥ भाविक भक्तां देखोनि, बाई देखोनि । तेथें घालिसि मीठी ॥ ऐसी०

१ वेद. २ अगम्य. ३ वर्षतोस.

॥ ३ ॥ श्रवण नयन घ्राण हो, बाई घ्राण हो । त्वचा रसना पाहीं ॥ वाचा आणि कर पद हो, कर पद हो । गुप्त इंद्रियें तींही ॥ मनादि बुद्धी चित्त हो, बाई चित्त हो । यांसि न कळसि कांहीं ॥ अहंकार अंतःकरण, अंतःकरण । सर्व चाळक देहीं ॥ऐसी० ॥४॥ अहं-कोऽहं-सोऽहंभावना, बाई भावना । सर्वही तुझा प्रकाश ॥ जागृति स्वप्न सुषुप्ती, बाई सुषुप्ती । तेथें तुझाचि भास ॥ तुर्या आणि हो उन्मनी, बाई उन्मनी । हाही तुझा विलास ॥ सर्वां ठायीं तुज देखत, बाई देखत । रमावल्लभदास ॥ ऐसी सद्गुरु० ॥ ५ ॥ ॥ श्रीः ॥ ॥ श्रीः ॥

[ सूचनाः—जन्मकथेच्या दिवशीं येथून पुढें जन्मकथा चालवावी. ]

( भजन ) सच्चित् प्रेमानंदू । भज रे गोविंदू गोविंदू ॥

( श्लोक. ) रमावल्लभापासुनी बोध झाला । नमस्कार माझा तया सद्गुरूला[1] ॥ दयावंत तो संत तो भक्त पाहीं । तयासारिखा मुक्त कोणीच नाहीं ॥ १ ॥

( प्रबंध १०१; राग–कमोद, ताल–झंपा. )

सुचिरं रचितचकोरनरम् । सचराचरसर्वगतैकरसम् ॥ गुरुमीश्वरमात्मपदं चरमम् प्रणमामि कथं प्रणमामि कथम् ॥ १ ॥ न नमामि कथम्, न नमामि कथम् ॥ ध्रु० ॥ गुरुतन्मयभावमभावपदम् । गुणतोप्यवियुक्तवियुक्तपदम् ॥ गुणदोषविवर्जितसर्वगतम् । प्रणमामि कथं न नमामि कथं ॥ २ ॥ अविरोधविरोधविरोधपदम् । अविरुद्धविरुद्धमनादिपदम् ॥ अविकल्पकसर्वगतात्मरसम् । प्रणमामि कथं० ॥ ३ ॥ आगमागमयुक्तवियुक्तपदम् । निगमागमगुप्तनिगुप्तपदम् ॥ अवधूतनिरंजनमोक्षपदम् ॥ प्रणमामि कथं न नमामि कथम् ॥ ४ ॥ ॥ श्रीः ॥

---

१ ( पा० भे० ) यादवाला.

## ( २ ) गोंधळ.



( भजन ) रंगशिळा ही चित्तभूमी । निर्मळ करिं अंतर्यामीं ॥ १ ॥
रंगशिळेवरि ये रंगा । करिं रे भवभ्रांतीभंगा ॥ २ ॥
रंगशिळेवरि ये गोपाळ । शमवीं इंद्रियचळवळ ॥ ३ ॥
रंगशिळेवरि ये श्रीपती । भजनीं रंगविं माझी मति ॥ ४ ॥
रंगशिळेवरि ये कृष्णा । उघडीं दहरीं चिन्नयना ॥ ५ ॥
रंगशिळेवरि ये गोविंद । अंतरिं स्फुरवीं ब्रह्मानंद ॥ ६ ॥
रंगशिळेवरि ये श्रीहरि । वृत्ति खलवीं विश्वंभरीं ॥ ७ ॥
रंगशिळेवरि ये श्रीराम । कृष्णदासा निजसुखधाम ॥ ८ ॥

( श्लोक ) प्रणाम केला नव रंगड्याला । श्रीगोपवेषा हरिदेवड्याला ॥ हृद्वारिजान्तीं[2] स्वतःसिद्ध आहे । विचार्यमाणे परिपूर्ण पाहे ॥ १ ॥

आनंदरूपे निजबोधरूपे । ब्रह्मस्वरूपे श्रुतिसाररूपे ॥
वेदान्तरूपे सिद्धान्तरूपे । श्रीरंगरूपे रमतां मनो मे ॥ २ ॥

( प्र० १०२ ) येई वो रंगदेवते रंग भरीं, रंग भरीं । सर्व साहित्य संगीतकळा तुझ्या अंतरीं ॥ ध्रु० ॥ तानमानप्रबंध शुद्ध करीं, शुद्ध करीं । हाव भाव ध्रुपद तूंचि आवरीं ॥ १ ॥ तुझेनि शोभा शोभे चराचरीं, चराचरीं । समाधान होय सुर-नरकिन्नरीं ॥ २ ॥ त्रिभंग अभंग ठाण धरीं, ठाण धरीं । सद् चिद् आनंद नामना वरीं ॥ ३ ॥ त्वंपद तत्पद चाळुनि बरीं । असिपदिं रंग तुझ्या परोपरीं ॥ ४ ॥ श्रीरमावल्लभदास उत्तरीं, दास उत्तरीं । प्रसन्नवदना आली अतिगजरीं ॥ ५ ॥

---

१ दहराकाशांत. २ हृदयकमलांत.

# ( ३ ) गुरुयात्रा.

[ **सूचना**—खालील गुरुयात्रेचें भजन व पदें होईपर्यंत उपासकानें व भजनमंडळीनें रंगशिळेपासून देवाच्यासमोर पुढें हळू हळू चालत जाऊन, मागें वळतांना देवाकडे पाठ न करितां ( मूर्तीकडे पहात पहात ) रंगशिळेपर्यंत मागच्या पावलीं हळू हळू पावलें टाकीत यावें, व पुन्हा तसेंच पुढें जावें. हा गुरुमार्गांतील सांप्रदाय आहे. याचें रहस्य असें कीं, आपण घरांत शिरतांना घरासन्मुख होऊन जातों, व बाहेर येतांना घराविन्मुख होऊन ( घराकडे पाठ करून ) बाहेर येतों; तसेंच सुषुप्तींत जाते वेळीं एकंदर बाह्योपाधि सोडून जात असतों व तिकडील आनंद अनुभवितों, परंतु परत येतांना त्या आनंदाकडे पाठमोरे होऊन येतों, व त्यामुळें आपण स्वरूपानंदास मुकतों. यासाठीं तसें न करितां सुषुप्तींतील अतींद्रिय सौख्याची—निर्विषयानंदाची—स्मृति गुरुखुणेनें जाग्रतींत घेऊन यावी. ह्मणजे सर्वोपाधित्यागरूप व्यतिरेकध्यानाभ्यासयोगानें वृत्तिलयसाक्षित्व अनुभवून ( सच्चिदानंदात्मस्वरूपाची—श्रीकृष्णाची—प्रत्यक्षता करून घेऊन ) वृत्त्युदयकाळीं तेंच स्वरूप जलतरंगन्यायें व्याप्यव्यापकरूपानें ( अन्वयानें ) सर्व जगांत—सर्वप्रपंचकार्यांत—विषयभोगसमयीं पहावें. ही खूण गुरुपुत्रांनीं—सत्साधकांनीं लक्षांत बाळगावी. ]

( भजन ) * हळू हळू चालावें । सांवळ्याला भेटावें ॥
मार्गीं हळू हळू चाला । वाचे बोला हरिविठ्ठला ॥

( प्रबंध १०३; राग—भूप, ताल—त्रिवट. )

धरीं धरीं मना, धारणा हे बरी । सद्गुरु श्रीहरी पूर्णब्रह्म ॥ ध्रु० ॥ सद्गुरू वेगळें जरी ब्रह्म असे । तरि फळ दिसे ऊंसावरी ॥ १ ॥ चंदनासि येती परिमळाचीं फुलें । तरी गुरु वेगळें ब्रह्म दिसे ॥ २ ॥ श्रीरमावल्लभदास शिकविती । कोण झकविती मग त्यासी ॥ ३ ॥ श्री ॥

( प्रबंध १०४; राग—खमाज, ताल—दीपचंदी. )

गुरूचें भजन हेंचि माझें ध्यान । तेंचि पूर्ण ज्ञान जाण माझें ॥ ध्रु० ॥ माझा मायबाप सद्गुरु सांवळा । बहूत कोंवळा

* या भजनांत श्रीमद्भगवद्गीतेंतील ‘ शनैः शनैरुपरमेत्० ’ या गुरुमार्गाचें रहस्य ध्वनित केलें आहे.

मजलागीं ॥ १ ॥ सद्गुरूचे पाय हेचि माझी यात्रा । तयावीण क्षेत्रा नेणें मी हो ॥ २ ॥ तोचि माझा देवो सर्वांचा गोंसायी। रमावल्लभपायीं दास पूर्ण ॥ ३ ॥ श्रीः ॥

( प्रबंध १०५; राग-झिंझोट, ताल-त्रिवट. )

कांहीं केली नाहीं सेवा । मज तारीं सद्गुरुदेवा ॥ ध्रु० ॥ आह्मी अन्यायी अपराधी । आह्मां नाहीं दृढबुद्धी ॥ १ ॥ असो पडो कीर्तनीं काया । ऐसें करीं गा पंढरिराया ॥ २ ॥ रमावल्लभदास बळी । जीव दिधला पायांतळीं ॥ ३ ॥

( प्र० १०६ ) अपराध क्षमा, करीं गा गोपाळा । परम-कृपाळा, देवदेवा ॥ ध्रु० ॥ सर्वगता तुज, एकदेशीं पाहे । यात्रा करिताहे, तीर्थोतीर्थीं ॥ १ ॥ चित्तातीता तुज, चित्तीं माझे धरीं । अपरिमिता करी, परिमितसे ॥ २ ॥ चहूं वाचा-तीत, स्तुतीचा विलास । रमावल्लभदास, करूं धांवे ॥ ३ ॥

( प्र० १०७ अभंग ) आला प्रसादु देवाचा । भक्तां आनंद साचा ॥ १ ॥ आला आला हरिप्रसादु । संतुष्टला परमानंदु ॥ २ ॥ जी जी अपेक्षा असेल । ती मज दातार पुरवील ॥ ३ ॥ रमावल्लभदास ह्मणे । याहुनि कायसें मागणें ॥ ४ ॥ श्रीः ॥

( भजन ) गुरु महाराज गुरु । जय जय परब्रह्म सद्गुरु ॥ ध्रु० ॥ चारी मुक्तिदायक दाता उदार कल्पतरु ॥ जय जय गुरु० ॥ १ ॥ रूप जयाचें मनबुद्धीपर वाचें अगोचरु ॥ जय जय० ॥ २ ॥ अलक्ष्य अनाम अरूप अद्वय अक्षय परात्परु ॥ जय० ॥ ३ ॥ बद्धमुमुक्षुसाधकशरणा-गता वज्रपंजरू ॥ जय० ॥ ४ ॥ आत्मारामी रामदास गोपाळ करुणाकरू ॥ जय० ॥ ४ ॥

( सूचना—याप्रमाणें गुरुयात्रा झाल्यावर देवास व गुरुपीठास सर्वांनीं नमस्कार घालून फुलाचा प्रसाद ग्रहण करून रंगशिळेवर येऊन पुढचीं पदें ह्मणावीं. )

---

१ “ त्वद्यात्रया व्यापकता हता ते । ध्यानेन चेतःपरता हता ते ॥
स्तुत्या त्वया वाक्परता हता ते । क्षमस्व स्वामिन् व्यपराधमेतत् ॥ १ ॥ ”
—अवधूतगीता.

# ( ४ ) संतपूजा.

( भजन ) विठोबा केशरी गंध । विठोबा तुझा मला छंद ॥
विठोबा केशरी टीळा । विठोबा गळां तुळसिमाळा ॥
विठोबा केशरी उटी । विठोबा देई मला भेटी ॥

( सूचना—हें भजन चाललें असतां सर्व संत मंडळींना—भजन करणाऱ्यांस व इतर सर्वांस—पुष्पमाळा, बुका, गंध वगैरे अर्पण करून नमस्कार करावे. बायकांनीं बायकांस हळदकुंकू गंध पुष्पमाळा वगैरे देऊन नमस्कार करावा. ही संतपूजा होय.)

( प्र० १०८ ) संतपदरजाचा, निजदास मी साचा । निरंतर वाचा, मी गात असे ॥ १ ॥ संतपायां पडताति, ते खुणेसि[1] पावताति । उपरि करिताति, बा लोटांगण ॥ ध्रु० ॥ कृष्ण त्यांचें दैवत, माझे आंगीं संचरलें । अकळ विस्तरलें, सकळरूपें ॥ २ ॥ आपुलें नाम सांग देवा, तूं कोठें वसतोसि । तंव दासवाक्यासी, काय बोले ॥ संतपायां० ॥ ३ ॥ परा वाचा खुंटे, परेश हें नाम । त्रिपुटी[2] लोपे धाम, तेंचि माझें ॥ संतपायां० ॥४॥ पुढें होईल काय, ऐसें पुसताहे । तंव तो हांसताहे, चाडपूर्ण ॥ संतपायां० ॥ ५ ॥ मागें पुढें मीच मी, आतां मीच आहें । निश्चळ साच राहें, मजमाजीं ॥ संतपायां० ॥ ६ ॥ करूं कैसी तुझी सेवा, आतां सांग सांग देवा । एक भावार्थाचा ठेवा, मज पूर्ण आहे ॥ संतपायां० ॥ ७ ॥ निवांत मद्रूपीं, हेंचि हें सेवन । लौकिकपूजन , मिथ्या मज ॥ संतपायां० ॥ ८ ॥ असावें रे अखंड, न खंडति डोल । बोलती सखोल, छंदोछंदें॥ संतपायां० ॥ ९ ॥ ( आतां ) नव्हे नव्हे प्रहीला, श्रीरमावल्लभदास । ह्मणि ह्मणाल त्यास, लोका ऐसा ॥ संतपायां० ॥ १० ॥

---

१ यांत भक्ताचा देवास प्रश्न व देवाचें भक्तास उत्तर अशीं खुणेचीं प्रश्नोत्तरें आहेत. ही खूण संतांच्या पायीं घालून घेणारासच प्राप्त होते व खूण पटल्याउपरही पुन्हा संतांच्या पायीं कृतज्ञतेनें सत्साधक लोटांगणें घालतात, हें ज्ञानोत्तर भक्तीचें लक्षण या पदांत दर्शविलें आहे. २ भ्रूमध्यस्थान.

( प्रबंध १०९; राग–झिंझोट. ताल–त्रिवट. )

देवगिरिगडीचा राजा । अंबर प्रधान त्याचा ॥ सकळ महालाचा साचा । लेखक होतों मी त्याचा ॥ संचार झालासे मज । उतार नव्हेच याचा ॥ १ ॥ वेडें वेडें गे केलें । कान्हाईनें मन नेलें ॥ म्लेंच्छसेवे सांडविलें । आपुल्या सेवे लावियलें ॥ वेडें० ॥ ध्रु० ॥ परमार्थ महाल सार । लेहवी तो मजकरवीं ॥ हिरोनी घेऊनि शीण । हातांत लेखणी धरवी । वाचीं रे वाचीं रे ह्मणे । प्रबंधरचना बरवी ॥ वेडें० ॥ २ ॥ संसार हा झाडावया । सद्गुरु लवकरीं आला ॥ भागवतमंत्राक्षरीं । संचारु अधिक झाला ॥ पहिलेंपण नाहीं नाहीं । झेलितों अनुभव भला ॥ वेडें० ॥ ३ ॥ देहबुद्धि खोंचियली । जनमान खोंचियला ॥ मायादेवी खोंचियली । विरोनि अहंकार गेला ॥ प्रवृत्ति निवृत्ति खोंचियलीं । स्वानंदें मुरोनि ठेला ॥ वेडें० ॥ ४ ॥ शिव जिणें मोहीयला । जीवु माझा तिणें नेला ॥ काय झालें तें मी नेणें । सनकादिकां विस्मय झाला ॥ रमावल्लभाचा दास । कान्हाई होऊनि ठेला ॥ वेडें० ॥ ५ ॥ ॥ श्रीः ॥

( प्र० ११० ) दुग्धापासुनि घृत झालें । त्यांत न मिळे कांहीं केलें ॥ १ ॥ ऐसा जाण पां अनुभव । साधु संत तेचि देव ॥ ध्रु० ॥ हळदी चुनियाच्या संगें । तेथें एकचि होय रंगें ॥ २ ॥ गंगा सागरा मिळाली । तेथें सागर होउनि ठेली ॥ ३ ॥ रमावल्लभदास पाहीं । तेथें उरलें कांहीं नाहीं ॥ ४ ॥ श्रीः ॥

१ या पदांत रमावल्लभदासांनीं आपलें पूर्ववृत्त ( आत्मचरित्र ) सांगितलें असून, लढाईनंतर लुटीमध्यें एकनाथी भागवत सांपडल्यावर त्याच्या वाचनानें पूर्वस्थिति बदलत जाऊन पूर्णत्व कसें प्राप्त झालें, याबद्दलचे उद्गार स्वतः सांगितले आहेत. पुढील अभंगही यासच अनुसरून असून त्यांत कृतार्थतेचे उद्गार त्यांस शोभण्यासारखे आहेत.

## ( ५ ) लोटांगण.

( भजन ) विठूचा, गजर हरिनामाचा, झेंडा रोविला।
संताचा, मेळा गोपाळांचा, डाव मांडिला ॥ १ ॥

(प्र० १११) नलगे योग ब्रह्मज्ञान। नलगे कर्मअनुष्ठान ॥१॥ रजीं घोळेन घोळेन। संतचरणीं लोळेन ॥ ध्रु० ॥ नलगे वेदांचें पठण। नलगे योगाचें भूषण ॥२॥ नलगे तप देहदंडण। नलगे संन्यासग्रहण ॥ ३ ॥ व्रतें न करवती सहज। नलगे दातृपण मज ॥४॥ न पडे आगमप्रवाहीं। न पढे मंत्र तंत्र कांहीं ॥५॥ यम नियम पुरश्चरण। नलगे तीर्थांचें भ्रमण ॥ ६॥ नलगे देवपण घेणें। नलगे लोकीं मान देणें ॥ ७ ॥ नलगे शिष्यांसि सांगावें। नलगे गुरुपण घ्यावें ॥ ८ ॥ रमावल्लभदासां डोहळा। पंढरपुरीं हा सोहळा ॥ ९ ॥ श्रीः ॥

( भजन ) नामाचा बाजार। पंढरी नामाचा बाजार ॥
आषाढि कार्तिक यात्रा भरती। करिती जयजयकार ॥ पंढरी० ॥
गोपाळपूरीं काला झाला। लाह्यांचा भडिमार ॥ पंढरी० ॥
ठायीं ठायीं संत मिळाले। विठ्ठल हा सरदार ॥ पंढरी० ॥
नामचि घेती नामचि देती। कोटि कुळां उद्धार ॥ पंढरी० ॥
ह्मणे तुकाराम संतसज्जना। धरा हा निर्धार ॥ पंढरी० ॥

(प्र० ११२) गोवर्धनगडीची, गडीची आई। यमुना थडीची, थडीची आवा ॥ सांवळ्या वर्णाची, वर्णाची आवू। कोंवळ्या मनाची, मनाची आवे ॥१॥ वृंदावनींची, वनींची आई। शंकर-मनींची, मनींची आवा ॥ चरणीं गंगा गे, गंगा गे आई। पापभंगा गे, भंगा गे आवे ॥ २ ॥ बरवीं पाऊलें, पाऊलें आई। कुंकुम लावीलें, लावीलें आवा ॥ नखीं ग्रहण, ग्रहण आवू। चंद्रधरण धरण आवे ॥३॥ सर्प काळी गे, काळी गे आई। गर्व टाळी गे, टाळी गे आवा ॥ बिरिदावळी गे, वळी गे आवू। दैत्यां दळी गे, दळी गे आवे ॥ ४ ॥ पोटीं पोटऱ्या, पोटऱ्या आई। मांड्या बऱ्या गे, बऱ्या गे आवा ॥ पिंवळा पाटोळा, पाटोळा कांसे।

मेखला त्यावरी, त्यावरी भासे ॥ ५ ॥ नाभीकमळ, कमळ खोल । ब्रम्ह्या अकळ, अकळ बोल ॥ आंगीं चंदन, चंदन उटी । करूं वंदन, वंदन दिठीं ॥ ६ ॥ हृदयीं पदक, पदक बरें । महिमा अटंक, अटंक खरें ॥ आपाद वनींची, वनींची माळा । कौस्तुभमणीची, मणीची ढाळा ॥ ७ ॥ आजानु भूजा गे, भूजा गे आई । भेटों तूज गे, तूज गे आवा ॥ कानीं कुंडलें, कुंडलें आवू । तेज मांडलें, मांडलें आवे ॥ ८ ॥ ओठीं पोंवळें, पोंवळें रंगे । दांतीं दाळिंब, दाळिंब भंगे ॥ नासिक सरळ, सरळ साजे । डोळां कमळ, कमळ लाजे ॥९॥ भोंवया मेढा गे, मेढा गे आई । लाविसी वेढा गे, वेढा गे आवा ॥ भाळीं केशर, केशरटिळा । अक्षत माणीक, माणीककिळा ॥ १० ॥ चांचर कुरूळ, कुरूळ माथां । तत्पर प्रेमळ, प्रेमळ नाथा ॥ देखतां भ्रमर, भ्रमर होणें । उतरे जीवाचें, जीवाचें लोणें ॥ ११ ॥ मुकुट मयूर, मयूरपत्र । दिसत तरूचें, तरूचें छत्र । त्रिभंग वाजवी, वाजवी पांवा । अनंग लाजवी, लाजवी आवा ॥ १२॥ गोपीं गोपाळीं, गोपाळीं आई । मुखें हांसत, हांसत बाई ॥ भावार्थ गोंधळीं, गोंधळीं आवे । प्रीतीं नाचत, नाचत पाहे ॥ १३ ॥ देवां दुर्लभ, दुर्लभ आई । भक्तां सुलभ, सुलभ आवा । रमावल्लभ, वल्लभदासां । समागमाची, गमाची आशा १४

( भजन ) भक्तवत्सले सद्गुरु माय । दावीं आपुले चिन्मय पाय ॥

( प्र० ११३ ) पिंड आणि ब्रह्मांड, जेथें नाहीं माया रांड रे । भेदाभेद खंडे, शेखीं नुरेचि पाखांड रे ॥ चहुं वाणींचा मांड, तेथें नुरे तो अमांड रे । अनुभव साचार, जाणे ह्मणेल तो भोंड रे ॥ १ ॥ सद्गुरु माउली, ह्मणतां अरूप अनाम रे । भरपुर गाउली, दूभे अनंत रूप नाम रे । संतांची साउली, निर्वि-

---

१ हें ह्मणते वेळीं संतांस आलिंगन देतात. २ वाचाळ, भिकारी.

कल्प गुणग्राम रे । स्वयें देव भक्त, आपें आपणया विश्राम रे ॥ सद्गुरुमाउली० ॥ ध्रु० ॥ प्रथम चतुर्भुजा, झाली ब्रह्मयाच्या गुजा रे । सृष्टिरचना पूजा, करी तो भाव सांडुनि दुजा रे । अगाध विश्वभूजा, नानारूपें धरिसी वोजा[1] रे । द्वापाराचे अंतीं, ह्मणवी रामाची[2] अनुजा रे ॥ सद्गुरु० ॥ २ ॥ परात्पर अधीक, जीचीं बाळें ब्रह्मादिक रे । नारद व्यासादिक, शुक सनकादिक सकळीक रे । योगियां वरिष्टिक[3], शिव ध्यातो प्रमाणीक रे । अर्जुन उद्धवावरि, कृपा अलोलीक रे ॥ ३ ॥ नाना वर्ण नाना रूप, धरूनि ते अरूप रे । कीर्तनीं सुखरूप, भक्तांलागीं ती अमूप रे । प्रेमवन्त भूप, त्यासि न बाधी भवकूप रे । देह दिवटी ऊजळे, जळे त्रिगुण तेल तूप रे ॥ सद्गुरु० ॥ ४ ॥ बालकमी निपटणें[4], बोलूं नेणें आर्जवपणें रे । मग माझें बोलणें, बरवें इयेनें करणें[5] रे । सकळिकीं मानणें, मीतूं नुरेचि जाणणें रे । प्रेमपान्हा पाजीं, रमावल्लभदास्यपणें रे ॥ सद्गुरु० ॥ ५ ॥

( भजन ) अंबां भजामि जगदंबां भजामि ।
त्रिपुरांबां भजामि शारदांबां भजामि ॥

( प्र० ११४ ) गुरुकृपा अंबे, जय जगदंबे । प्रीतिकदंबे, सारासारनितंबे ॥ ध्रु० ॥ गुरुकृपा परमेश्वरी, जयातें हातीं धरी । अनंत तयाच्या होती, सुंदर लहरी ॥१॥ गुरुकृपा तीचि भक्ति, गुरुकृपा तीचि शक्ति । गुरुकृपा परिपूर्ण, शांति विरक्ती ॥ २ ॥ गुरुकृपा आदिमाता, धन्य ज्या आली हातां । गुरुकृपेवीण जन्म वांयाचि जातां ॥ ३ ॥ गुरुकृपेविण वावो, देवीसहित देवो । गुरुकृपा जहालिया, नाहींच भेवो ॥४॥ श्रीगीता भागवत, गुरुकृपा भावत । श्रीरमावल्लभदास, महावाक्य पावत ॥ ५ ॥

( भजन ) गोविंद गोविंद गोपाल राधाकृष्ण । गोविंद गोविंद० ॥

---

१ उत्तम. २ बळरामाची. ३ श्रेष्ठ, वंद्य. ४ अगदीं. ५ माझें वेडें वांकडें बोलणें त्या आईनेंच सारखें करून घेतलें पाहिजे.

# प्रकरण ६ वें–पूजोपचार ( आरत्या वगैरे ).



( प्र० ११५– धूपारति ) आवडीं गंगाजळ देवा न्हाणिलें । भक्तीचें भूषण प्रेमगंध अर्पिलें ॥ १ ॥ अहंधूप आणिला श्रीहरी-पुढें । जो जो धूप जळे तो तो देवा आवडे ॥ २ ॥ रमावल्लभदासें अहंधूप जाळिला ॥ एकारतीचा मग आरंभु केला ॥ ३ ॥

( प्र० ११६– दीपारति ) सोहंदीप ओंवाळूं बाळ गोविंदा। समाधी लाजे पाहतां मुखारविंदा ॥ १ ॥ हरिख हरिख होतो मुख पाहतां । चाकाटल्या नारी सर्वहि अवस्था ॥ २ ॥ सद्भावालागीं देव बहु भुकेला । रमावल्लभदासें हा नैवेद्य अर्पिला ॥३॥ श्रीः ॥

(प्र० ११७– गुरुपूजा ) हृदयआसनीं सद्गुरुरूपडें । बैसवूं चोखडें पूजावया ॥१॥ आर्तगंध प्रेम सुमन तें बरें। वाहूं पैं आदरें आवडीनें ॥ २ ॥ यापरि सद्गुरु-पूजन हें करूं । हृदयीं तें धरूं ध्यान याचें ॥ ३ ॥ अहं हा धूप, निःशेष जाळूं । सोहं हा ओवाळूं दीप मग ॥ ४ ॥ भावाचा नैवद्य गोडीसि आला । भावें तृप्त झाला श्रीगुरुनाथ ॥ ५ ॥ ॥ श्रीः ॥

(प्र० ११८–नैवेद्य) खिसमिस अक्रुट[1], बदाम ते घनवट[2] । अंजुर तें बरवंट[3], यादवेंद्राकारणें ॥ १ ॥ खारिक खोबरें ओलें, दिव्य द्राक्षघड आले । नारिंग अमृतफळें, यादवेंद्राकारणें ॥ २ ॥ खिरणस ऊंस गोड, दाळिंब पनस वाड । ऐसा भेवा बहु गोड, यादवेंद्राकारणें ॥ ३ ॥ रमावल्लभाचे दास, नित्य घेती त्याचा शेष । बैसले हो सावकाश, यादवेंद्राकारणें ॥ ४ ॥

( प्र० ११९ ) तिळव्या साखर लाडु, सैंध्य[4] तूप त्यासि गोडु । अमृताचा पडिपाडु[5], कोडबळीं तळलीं ॥ १ ॥ खाजीं करांजिया सार, दुग्ध खवा मनोहर । नाबंदीं[6] ऊंसांचीं

---

१ अक्रोड. २ भरीव. ३ चांगले. ४ लोणकढत. ५ साम्यता. ६ खडीसाखरेंत.

पेरें, मिरकुटें घोळलीं ॥ २ ॥ दहीं दूध साय मध, पात्रें भरियेलीं सिद्ध । आणिकही बहुविध, नारी[1] आल्या जवळीं ॥ ३ ॥ परवेडी[2] यादवास, दावितातो सावकाश । रमावल्लभाचे दास, दर्शनासि भुकेले ॥ ४ ॥ ॥ श्रीः ॥

---

( प्र० १२०—मंगलारती ) फळ तांबूल दक्षिण वाहिलें । तया-उपरी निरांजन मांडिलें ॥ १ ॥ आरति आरतीं करूं गोपाळा । मीतूंपण सांडुनि वेळोवेळां ॥ २ ॥ पंचप्राण पंचारति उजळली । दृश्य लोपलें तया प्रकाशातळीं ॥ ३ ॥ आरतिप्रकाशें सूर्य चंद्र दीपले । सुर नर सकळिक तटस्थ ठेले ॥ ४ ॥ देवभक्तपण न दिसे कांहीं । ऐसें वरी[3] दास्य रमावल्लभ पायीं ॥ ५ ॥ श्रीः ॥

( प्र० १२१ ) धन्य भक्ति हे गोकुळ, धन्य भक्ति भावार्थ। धन्य तांडववेष, कृष्ण स्वयें क्रीडत ॥ १ ॥ धन्य हृदयकमल, माजीं विराजे हरि । आरति स्वानंदें करिति पुरुषनारी ॥ २ ॥ धन्य प्रेम कवळ, करीं नवनीताचा । धन्य वामहस्त, अभय देतसे साचा ॥ ३ ॥ धन्य वांकि पायीं, गर्जति गजरीं । ह्मणति जन्म मरण, नाहीं नाहीं निर्धारीं ॥ ४ ॥ धन्य भक्ताधीन ऐसा, दावितो कैसा । एक पायावरी उभा राहे सरीसा ॥ ५ ॥ धन्य भक्ति आवडी, नृत्य करित असे । जैसा खेळवीत, तैसा खेळत असे ॥ ६ ॥ धन्य गगनीं विमानीं, ब्रह्मादिक पाहती । रमावल्लभ-दास, जयजयकारें गर्जती ॥ ७ ॥ ॥ श्रीः ॥

( प्र० १२२ ) धन्य वृंदावन, धन्य कल्पतरुवर । धन्य ते भूमिका जेथें, कृष्ण निरंतर ॥ १ ॥ धन्य माया यमुना, पूर्ण ब्रह्म तटाकीं । गोपाळ वेषें कृष्ण, खेळे नाटकी ॥ २ ॥ धन्य

---

१ ( पा. भे. ) ‘ नारियळ जवळीं ’ २ प्रकार. ३ ( पा. भे. ) ‘ ऐशा परी दास रमावल्लभ पाहीं ’.

ठाण माण कैसें, शोभे त्रिभंगी । धन्य अलंकार पाहा, मिरविले आंगीं ॥ ३ ॥ धन्य धेनु वत्सें ज्यांसि, लक्ष्य कृष्णाचें। धन्य पांवा अधरामृत घेतसे साचें ॥ ४ ॥ धन्य गोपांगना झाल्या, कृष्णा सकाम । धन्य ते सौंगडे पूर्णरूपीं आराम ॥ ५ ॥ धन्य ते अवनी कृष्ण जेथें चालता । धन्य ब्रह्मादिक रज वंदिति माथां ॥ ६ ॥ धन्य वृक्ष वल्ली वायु लागे कृष्णाचा । धन्य धन्य लोक पार न कळे पुण्याचा ॥ ७ ॥ धन्य नंद यशोदेचा पुत्र ह्मणती । धन्य त्यांचें जिणें, मध्यें निजे श्रीपति ॥ ८ ॥ धन्य त्रिगुणातीत कृष्ण कीर्ती चोखडी । धन्य रमावल्लभदास गाती आवडीं ॥ ९ ॥ श्रीः ॥

( प्र० १२३ ) सिद्ध ऋषी मुनि भक्त देव अन्यत्र । ह्मणति चला पाहूं कृष्णपूजा विचित्र । ऐसी अभिनव आरति कृष्णा लावविया । भजावें तयासी ज्याची अतर्क्य माया ॥ १ ॥ याचा मायापार ब्रह्मा शंकर नेणे । मा याची लीळा कोण जाणत ह्मणे । यासि जाणावया सनकादिक विरक्त । मुक्त न ह्मणविति पहा झाले ते भक्त ॥ २ ॥ तुंबर नारदा नाममहिमा न कळे । रूप जाणों ह्मणे त्यांचें ज्ञान कोंवळें ॥ याचे भक्तिमार्गीं देहसांडणी करा । रमावल्लभदास धरी याचि निर्धारा ॥ ३ ॥

( प्र० १२४ ) नवल हा वेषधारी, महाराज मुरारि । नवल हा वेणु वाहे, वेधी जीव सर्व भारी । नवल या वृत्ति गोपी, करि तन्मय नारी । नवल हा रासरंगें, प्रेम आनन्दकारी ॥ १ ॥ जयजया गोपवेषा, चिदानन्द परेशा । आरती तुज भावें , हरी कंदर्पलेशा ॥ ध्रु० ॥ नवल हें रूप तुझें, गुणा निर्गुणातीत । नवल हें पाहतां पहा, हरादिक विस्मित । नवल हें प्रेम धालें, हरे वासना वित्त । आवडे दास्यपण, रमावल्लभीं चित्त ॥ २ ॥

( प्र० १२५ ) कोटि ब्रह्महत्या अगम्यागमन । श्रीमुख

न्याहाळितां होतसे दहन ॥ १ ॥ देवा आरती रे आरती रे। आरतीनें दोष निवारती रे ॥ २ ॥ रमावल्लभदास बोलती रे। जय जय जय जय जयजयकारें डोलती रे ॥ ३ ॥ श्रीः ॥

# वारांच्या आरत्या.



( प्र० १२६–रविवार ) सन्मुनिसज्जनसेवित परतरनिजबोधा। अखंडैकवृत्ति भवरहित विबाधा ॥ १ ॥ जय देव जय देव सद्गुरु अनंता। भावाभावातीता त्रिपुटीरहिता ॥ ध्रु० ॥ निर्गुण निर्विकारा निजसुखदातारा। निस्सन्देहा नित्या निरुपम उदारा ॥ २ ॥ त्रिकूटशिखरस्थिता जय तुर्यातीता। तत्त्वमसिबोधका जय सद्योजाता ॥ ३ ॥ ओंकाराक्षररूपा सत्य चिद्रूपा। सहजानंदप्रभा नाशकभवतापा ॥ ४ ॥ रमावल्लभदासवेषा सर्वेशा। सुरनरसज्जनपोषा स्वामी परेशा ॥ ५ ॥ ॥ श्रीः ॥

( प्र० १२७–इंदुवार ) ज्योतिस्वरूप शिवा सकळीं अससी। सकळ होऊनियां सकळां न कळसी। अकळ माया तुझी हृदयीं भेटसी। भोळ्या भक्तांलागीं स्वयंभ नटसी ॥ १ ॥ जय देव जय देव लिंगादिलिंगा। मजमाजीं तूं गा तुजमाजीं मीं गा ॥ ध्रु० ॥ सूक्ष्म रूप तुझें अनुभवुनी पाहे। थोरी विचारितां गगनावरि आहे। आत्मा सबराभरित अंतरबाह्य। भावें भजतां जीव भ्रांति न राहे ॥ २ ॥ तीर्थोतीर्थीं तुज साधक पाहती। भावेंवीण केवीं भावे प्रतिमा ती। भावें प्रतिमा शिव जे पूजिताति। ते अंतीं स्वयमेव तुज देखताती ॥ ३ ॥ मानसपूजा जे भक्त करिताती। मनामाजीं प्रबोध ते देखताति। प्रबोधगुरु संत अति

१ " कोटयो ब्रह्महत्यानामगम्यागमकोटयः। दहत्यालोकमात्रेण विष्णोः सारार्तिकं मुखम् ॥ १ ॥ "—अध्यास.

मेळताति । हरहर शिवशिव नाम जप करिताती ॥ ४ ॥ शिव होऊनीयां शिवा यजावें । जीवन्मुक्त साच तया ह्मणावें । भजनेवीण ज्ञान अळणें जाणावें । श्रीरमावल्लभदास ह्मणतसे भावें ॥ ५ ॥

(प्र० १२८–मंगळवार) हरिविरहित मग वर्णिती शक्ति । परि शक्तिस मानेना तयाची व्यक्ति ॥ १ ॥ ह्मणवुनि हरिभक्तां मूळमायाभक्ति । होउनि देत असे ज्ञानविरक्ति ॥ ध्रु० ॥ दुग्धाविण साय लाभेना जैसी । आदिशक्ति कैंची हरिवीण तैसी ॥ २ ॥ गूळचि नाहीं तेथें गोडी कैसी गा । नसतां तैसा हरि नये शक्ति अंगा ॥ ३ ॥ हरि तोच गुरु गुरु तोच हरि । ऐशा अभेद भजनीं शक्ति किंकरी ॥ ४ ॥ हरिभक्तां वागणें हरिचेनि अंगें । देखुनि शक्ति लोण उतरी निजांगें ॥ ५ ॥ हरिच्या दासाचें करितां हेळण । क्षोभूनी जगदंबा करि ज्ञानहरण ॥ ६ ॥ हरिभक्तासी मान जे शाक्त देती । ते ते भवानीनें संत ह्मणिजेती ॥ ७ ॥ बाळ मुकुंदाची मार्कंडेया भक्ति । ह्मणूनि त्याच्या देहा न विसंबे शक्ति ॥ ८ ॥ रमावल्लभदास ह्मणे मत्सर सांडा । भगवंत भगवतीं एकभाव मांडा ॥ ९ ॥

(प्र० १२९–बुधवार) ॐकाराचें मूळ तो हा गोपाळ । निजानन्दें वेणु वाहे अनुभवें रसाळ । मोहिल्या वृत्तीगोपी केला सुकाळ । सद्गुरुकृपें मिळणें एरव्हीं तो अकळ ॥ १ ॥ जय देव जय देव लक्ष्या अलक्ष्या । सद्गुरुवचन झालें आह्मां प्रत्यक्षा । कां रे निजगार तुह्मां विषयांची लक्षा । ते सांडुनि पहा वेगीं निर्मळ ज्ञानाक्षा ॥ ध्रु० ॥ त्रिपुटीं दावित कैसें ठाण त्रिभंग । इहामूत्रफळभोगीं त्यागी जो संग । त्यासि तुझें दर्शन मग तो होय निस्संग । होउनि सर्व पाहतां गुरु आत्मलिंग ॥ २ ॥ क्षराक्षरविरहित सद्गुरु गोपाळा । तो तूं आह्मां भक्तां आला सांवळा । सगुणनिर्गुणातीत तूंच प्रेमकळा । देहबुद्धी कुरवंडुनि

पाहूं वेळोवेळां ॥ ३ ॥ दिवस ना रजनी नाहींच जेथ । जागृति स्वप्न सुषुप्ति ती कैंची तेथ । तुर्या आणि उन्मनि बुडाली येथ। सद्गुरु गोपाळीं प्रेम लाधलें तेथ ॥ ४ ॥ देहभाव नाहीं राहिलें स्थानमान । अनुहात ताळी ना जप तप ध्यान । ध्येय आणि ध्याता बुडालें ध्यान । रमावल्लभदास कृष्णभक्त जाण ॥ ५ ॥

( प्र० १३०—गुरुवार ) अनसूया पतिव्रता, ऋषिअत्रीची कांता । तियेची निष्ठा कैसी, पूर्णबोधप्राप्तता । आपणा देवें देणें, गुह्य न ये सांगतां । यालागिं नाम जगीं, तुझें '[1]दत्त' तत्त्वतां ॥ १ ॥ जयजय दत्त निजा, पूर्णानंद सहजा । आरती करितों मी गा, नुरे वेगळा दुजा ॥ ध्रु० ॥ अष्टमहासिद्धिदासी, उभ्या तुज गा पाशीं । वैराग्य तरी कैसें, ज्ञानीयांसि दाविसी । भिक्षाहारी सदा, नित्यतृप्त तूं होसी । सद्गुरु चहूं युगें, तुज नेणतीं कैसीं ॥ २ ॥ भाविकांलागीं भोळा, कांहिं वंचन नेणसि। पुरतें मत तुझें, न कळे एखादियासी । शीणती सिद्धयोगी, परि न कळे त्यांसी । श्रीकृष्णभक्ति लाधे, रमावल्लभदासीं ॥ ३ ॥

( प्र० १३१—शुक्रवार ) मस्तकीं मुकुटशोभा, कोटिसूर्य-प्रकाश । त्यातळीं मोरपिच्छें, सर्व अंगीं डोळस । तिलक पीत-वर्ण, भाळीं दिसे राजस । भ्रूलता काय वानूं, जैसें इंद्रधनुष्य ॥ १ ॥ जयजय कृष्णमूर्ति, तुझी करूं आरति । सगुण ध्यान नीकें, बैसो माझेया चित्तीं ॥ ध्रु० ॥ वारिजपत्राकार, तैसे नेत्र विशाळ । नासिक काय सांगों, सुशोभित सरळ । कुंडलें मक-राकार, फांके रत्नांचें कीळ । अधर सुरंग पाहा, दंतप्रभा प्रबळ ॥ २ ॥ हनुवटि नीट कैसी, गंडस्थळ निर्मळ । चत्वारि मिरवि-ताति, भुजीं आयुध मेळ । कौस्तुभ मुक्ताहार, कंठीं लेयिली माळ । श्रीवत्स दक्षिणांगीं, प्रीतीं मिरवी गोपाळ ॥ ३ ॥ माळा

१ देवानें आपणालाच देऊन सोडलें ह्मणून 'दत्त' ह्मणतात.

ती वैजयंती, रूळे आपादवरी । नाभीअंबुजाची, ब्रह्मा नेणे पैं थोरी । उदर कोण जाणे, अनंतब्रह्मांडहारी । मेखळा गाढियली पीतांबर ओवरीं ॥ ४ ॥ किंकिणी क्षुद्रघंटा, अनुहत गाजती । जानू जघन नीट, पोटरिया शोभती । उपमा देऊं काय, मर्गज स्तंभ लाजती । घोटीं सुनीळ देखा, इंद्रनीळाची दीप्ती ॥ ५ ॥ वांकी अंदू पाय-मुक्तत्रय सर्वथा । तोडरु चतुर्थ जाण, भय अहं-गर्विता । कवळें टांचाची वो, बाळसूर्य रहाता । दशादिशा अंगो-ळीका, शरण पायीं तत्त्वतां ॥ ६ ॥ पदनाखिं चंद्रकळा, स्थिरा-वळी या सुखा । चकोर भक्तजन, सेवितातीं पीयूखा । तळव्या अरुणरंग, ऐशा ऊर्ध्वरेखा । पद्मध्वज अंकुश, चिन्ह साजिरें देखा ॥ ७ ॥ पाहतां रूप ऐसें, मन पडलें ठक्क । देखतां देखणें हो, मावळलें निःशेख । मीतूं हारपलें, ध्येय ध्यातां देख । बोलणें बोलवेना, विण सगुण एक ॥ ८ ॥ आरति कृष्णजीची, पंचप्राणदीपक । पाहतां एक ज्योति, अंतीं जाहालें एक । हें नित्य ह्मणतां हो, ज्ञान पाविजे चोख । श्रीरमावल्लभाचें दास-पणाचें ऐक्य ॥ ७ ॥ श्रीः ॥ ॥ ॥

( प्र० १३२–शनिवार ) अभिनव गोकुळ हें, अभिनव जें रूप । नटलें गोपवेषें, अभिनवचिद्रूप ॥ अभिनव यमुना हे, आंत अभिनव आप । कल्पद्रुमातळीं, उभा कंदर्पबाप ॥ १ ॥ आरति गोपराजा, गोपगोपीरमणा । सगुण गुणातीत, तुझें रूप चिद्धना ॥ ध्रु० ॥ सभोंवतिं प्रभावळी, गोपिगोपाळांची । धेनू वत्सें युक्त, लक्ष्यें वेधलीं त्यांचीं । मध्यें सुनीळ मूर्ति, कैसी गोजिरी साची । देहुडा चरण दोन्ही, उभी त्रिभंग हेचि ॥ २ ॥ तळव्या अरुणरंग, किंवा कुंकुमकाला । जन्म त्या माणिकांसि, किंवा येथेंचि झाला । पदांगुष्ठीं जन्म, गंगादिक तीर्थाला । पद्मध्वज अंकुश, चिन्हें साजिरीं ज्याला ॥ ३ ॥ सरळ अंगु-

लिका, नखिं नक्षत्रकीळा । वांकी तोडरादि, बीदावळी सकळा । घोंटे सुनीळ देखा, पोटरिया निर्मळा । जानू जघन शोभा, मर्गजस्तंभ केवळा ॥ ४ ॥ कटितटीं पीतांबर, पल्लव रूळती सम । किंकिणी क्षुद्रघंटा, वाजताती परम । उदर अनुपम्य, दिसे नाभी सुपद्म । शोभा हृदयींची, पदक तेज उत्तम ॥ ५ ॥ आपादवरी रूळे, वैजंयती हे माळा । पुष्पें नाना याती, आणि तुळसी गळां । श्रीवत्स दक्षिणांगीं, चंदन उटी गोपाळा । कंबवाकृति कंठ, दिसे साजिरी कळा ॥ ६ ॥ मुद्रिका रत्नखचित, करीं परवीं शोभती । चंद्रिका नखीं पाहा, समुद्रिका दिसती । कंकण जडित देखा, बहुलेणीं साजती । हनुवटी अनुपम्य, ओष्ठीं प्रवाळ दीप्ती ॥ ७ ॥ श्रीकरीं वेणु शोभे, धरी अधरावरी । अंगुळ्या स्वरावरी, रंध्रें सोडी धरी । रत्नप्रभा फांके, जेवीं वीज अंबरीं । राग रागांगना, नाना आलाप करी ॥ ८ ॥ पशू पक्षी जीव, नादें जाहलें स्थावर । यमुना स्थिर झाली, वाहूं खुंटलें नीर । कुंडलाचेनि तेजें, गंडस्थळ सुंदर । नासिक सरळ पहा, नेत्र पंकजाकार ॥ ९ ॥ भोंवया साजरिया, भाळीं केशर टीळा । अक्षता माणिकाच्या, माथां मुकुट रेखिला । वेष्टित मोरपिच्छें, तुरा घोस शोभला । तुळसी मंजरिया, मित्रीं असे पूजिला ॥ १० ॥ देखुनी रूप ऐसें, सुरवर तटस्थ । नाठवे देह गेह, गोपी लुब्ध समस्त । योगियां लक्ष्या नये, आभासेना जे वस्त । ती येथें प्रगटली, पूर्णानंद भरित ॥ ११ ॥ वैकुंठींची गोडी, जेणें मानिली थोडी । गोकुळीं क्रीडावया, आला भक्तआवडीं ॥ महिमा ब्रह्मादिकां, लक्षवेना पैं घडी । ज्याचिया पूर्णरूपीं, वेदां पडली बोबडी ॥ १२ ॥ अनुपम्य क्रीडा ज्याची, वानी मुक्त हा शुक । मुमुक्षु विषयी सर्व, पावताति हरीख । समाधिसुख लाजे, लीला वर्णितां देख । श्रीरमावल्लभाचें, दास्य अद्वैत एक ॥ १३ ॥ ॥ श्रीः ॥

( प्र० १३३—**मंत्रपुष्प** ) भाग्यसार पैं अपार, भक्ति फार शामळीं । भेदाचार ओरमार, नाहिं थार निर्मळीं ॥ हा असार भव सार, करीजेत प्रेमळीं । यादवेंद्र हे नरेंद्र, इंद्र इंद्र इंद्र तूं ॥ १ ॥ गोकुळांत कीर्ति थोर, श्रीशुकेंद्र सांगत । पूर्णनाथ रंगनाथ, बाळनाथ रांगत ॥ निगमासि तर्के ना तो, भक्तिपांगें[2] पांगेत । यादवेंद्र हे नरेंद्र, इंद्र इंद्र इंद्र तूं ॥ २ ॥ मृत्तिका हे भक्षिताहे, देखताहे माय पां । लपताहे मुख पाहे, तूंच खासि काय पां ॥ आपणेंसि विश्व दावि, स्वानुभवें ठाय पां । यादवेंद्र हे नरेंद्र० ॥ ३ ॥ ऊखळासि बांधिताहे, बद्धता हे हे होइना । दीर्घसान[3] कोन्हीनें हो, आवरिला जाइ ना ॥ बांधतांच बांधल्यास, सोडवित माय ना । यादवेंद्र हे नरेंद्र० ॥ ४ ॥ वत्समेळ वत्सपाळ, पद्मज हो नेतसे । सर्व रूपें सर्व मग, आपणचि होतसे ॥ शरण तोहि त्राहित्राहि, हाचि सोस घेतसे । यादवेंद्र हे० ॥ ५ ॥ काळियासि दमोनियां, वणव्यासि गीळिलें । रासरंग करूनियां, कामरूप वाळिलें ॥ सर्व देव अंगना, गर्व चित्त ढाळिलें ॥ यादवेंद्र० ॥ ६ ॥ बहु पवाडे व्रजिंचे हो, वानितांच जात ना । कंसवध करूनियां, दृष्टिसुख मात ना ॥ जीव शिव देव सिद्ध, अन्य कोणा गाति ना । यादवेंद्र० ॥ ७ ॥ कृष्ण यश शेष तोहि, न बोलेच पूरतें । केविं तें हो मानवीस होईल, तें ऊरतें । रमावल्लभदास गातां, मीतूंपण झूरतें । यादवेंद्र० ॥ ८ ॥ श्रीः ॥ इति श्रीमहिमा अष्टगीत । दुंदुभी छंद पूर्णानंदभरित । श्रीमद्रमावल्लभदासरचित । सुख अपरिमित कीर्तनीं ॥ ॥ ॥ ॥ ॥

---

१ अजगर, २ भक्तीच्या भिडेनें नम्र–आधीन होतो. ३ लहान थोर. ४ दाव्यानें.

## ( बुधवार–मंत्रपुष्प )

( प्र० १३४ ) * भाग्य कोण माझें जाण, भेटला हा सद्गुरु । दृष्टिमात्रें सर्वगात्रें, निववि्लीं सत्वरु ॥ भवमूळकल्पनाहि, नाशिलीसे दुस्तरु । लक्ष्मीधर गुरुवर मज सार पूज्य हो ॥ १ ॥ जन्म मृत्यु नाहीं सत्य, कृपा होतां जाहलें । स्वप्नप्राय भवभय, आत्मसुखें पांहलें[1] ॥ नेणें साच मज मीच, भेटविलें वहिलें । लक्ष्मीधर० ॥ २ ॥ मृगजळ विषय हो, सत्य जैसें भासत । मीच देह हेंचि गुह्य, दृढ मना दिसत ॥ भ्रांति ऐसी गेली सर्व, अनुभवें विस्मित । लक्ष्मीधर० ॥ ३ ॥ भागवतगुह्यअर्थ, दाविलासे प्रगट । श्रीगीता शास्त्रसार, अर्थ तोहि उद्भट[2] ॥ मज पाहे अर्थमय, केलें असे विनँट[3] । लक्ष्मीधर० ॥ ४ ॥ मतें नाना पाहतांचि, गुरुभक्ति आगळी[4] । ब्रह्म विष्णु शिव येति, गुरुभक्ति जवळी ॥ मिथ्या माया गुरुपाथ, भजतांचि मूकली । लक्ष्मीधर० ॥ ५ ॥ काळ तोहि गुरुवाक्यें, सत्य होय नेमला । ब्रह्मा ब्रह्म ठेवि नाम, गुरु पूर्ण आपुला ॥ नाहिं तरि ब्रह्म कोण, ह्मणतांचि तयाला । लक्ष्मीधर० ॥ ६ ॥ पूर्णब्रह्म कृष्णरूप, वानितांहि नेणती । तोच गुरुरूपें भेट, देईल तैं जाणती ॥ गुरु ब्रह्म एकरूप, तेच भक्त देखती । लक्ष्मीधर० ॥ ७ ॥ काळ कोपे तेव्हां राखे, हरि स्वयें भक्तांसि । हरि कोपे तेव्हां कोणि, राखावेंचि तयासि ॥ तेव्हां गुरुराव सत्य, राखेल हो सर्वांसि । लक्ष्मीधर० ॥ ८ ॥ गुरु रुसतांच कोणी, अंगीकार करेना । द्वैतभेद जाचील त्या, अहंभाव मरेना ॥ याणें अंगीकार केल्या, अन्य कांहिं चाले ना । लक्ष्मीधर० ॥ ९ ॥ बहुजन्मिं हरिभक्ति, तरि गुरु भेटेल । गुरुकृपेवरी सार, पाहतां हो नसेल ॥ गुरुआज्ञा मोडितांच, तीच कृपा जाईल । लक्ष्मी-

---

* ह्या प्रबंधाचा अर्थविस्तार गुरुवारच्या नित्यनियमांत पहावा. १ उझेडलें. २ प्रसिद्ध, उदात्त. ३ मग्न. ४ श्रेष्ठ.

धर० ॥ १० ॥ गुरुकृपा फळल्याची, वळखणें मर्यादा । स्वामिपाशिं आपणचि, नव्हे पूज्य पैं कदा ॥ सर्व नेम शिरावरि, गुरुआज्ञा सर्वदा । लक्ष्मीधर० ॥ ११ ॥ शरण मी गुरुलागिं, अपराधि ह्मणोन । त्राहि त्राहि दयावंता, नेणें लीला आपण ॥ लावि सेवे गुरुराया, पूर्णकृपें वळोन । लक्ष्मीधर गुरुवर, मज सार पूज्य हो ॥ १२ ॥ श्रीसद्गुरुनाथमहाराजकी जय ॥ ॥

## प्रकरण ७ वें—दोलोत्सव.

### डोलारा.

( सूचना—डोलाऱ्याचीं पदें श्रावण शु० ५ मीपासून वद्य ५ मीपर्यंत ह्मणण्याची वहिवाट आहे. व. ५ मी रोजीं रात्रौ ' ओंवाळूं आरति मदन गोपाळा० ' ही आरती ह्मणून दोलोत्सव संपल्यानंतर डोलारा विसर्जन करितात; तो पुन्हा जन्माष्टमीच्या रात्रीं उत्सवमूर्ति डोलाऱ्यांत ठेवून अवभृतस्नान समारंभ होईपर्यंत दोलोत्सव करितात. )

( प्रबंध १३५; राग—यमन बिलावल, ताल दीपचंदी. )

बाई डोले हा डोलारा, मंडित ॥ ध्रु० ॥ घन[1]राज यदुपति । दामिनि[2] कामिनी बाई । नारद तुंबुर गाती । गायक पंडित बाई ॥ डोले हा० ॥ १ ॥ हेमपट्ट[3] सूत दोरी । भीमकी ओढित गोरी । कंकण कळिरव[4] थोरी । श्रमासी[5] खंडित बाई ॥ डोले हा० ॥ २ ॥ रमावल्लभदास पाहे । देहबुद्धि मुकताहे । महाराज ठेविताहे । अपुल्या पदिं अखंडित बाई ॥ डोले हा० ॥ ३ ॥

( प्रबंध १३६; राग—ललित गौरी, ताल—धुमाळी. )

धर्म अर्थ काम मोक्ष, शोभति चारि खांब । शून्यरहित महाशून्य[6], मंडप हा स्वयंभ । धराधर[7]आधार पूर्ण, पीठ हे

१ मेघराज. २ सौदामिनी, विद्युल्लता. ३ सोन्याच्या कलाबतूची दोरी. ४ ध्वनी. ५ (पा. भे.) 'समाधि अखंडित बाई '। ६ चिदाकाश. ७ शेषालाही आधारभूत.

निस्तंभ । घनश्याम परिपूर्ण बैसला अदंभ ॥ १ ॥ डोलाऱ्या बाई डोलत गोकुळपाळ । डोलाऱ्यापुढें वाजति मृदंग टाळ । डोलारा जेथें गाती भक्त रसाळ । डोलाऱ्यापुढें नाचति गोपाळ बाळ ॥ ध्रु० ॥ भक्ति राधा प्रेम दोरी, हालवी सुंदर । चंद्र सूर्य दिवटी ऐसे, सेवेसी तत्पर । नवविध नारी परोपरी आरत्या नागर । श्रीरमावल्लभदास त्यास, गाताति निर्भर ।। डोलारा० ।। २ ॥

( प्रबंध १३७; राग—झिल्ला झिंझोट, ताल—त्रिवट )

हृदयमंदिरीं डोलारा लांबविला । त्यावरी बैसला, गोपीनाथ ॥ १ ॥ आनंदें डोलारा, डोलतो साजणी । बारासोळाजणी, हालवीती ॥ २ ॥ गाताती गायन, नवविध अंगना । कान्हा कमळनयना, प्रेमभरें ॥ ३ ॥ गोपिका भोळिया, वाजविती टाळिया । कृष्ण वनमाळीया, लक्षिताती ॥ ४ ॥ वाजतो मृदंग नाचती गोपाळ । करिताती कल्लोळ, नामघोषें ॥ ५ ॥ ब्रह्मा इंद्र हर, डोलती आनंदें । गाताति स्वच्छंदें, प्रेमें जया ॥ ६ ॥ धूप दीप नैवेद्य, सद्भाव तांबूल । सद्भक्त निर्मळ, अर्पिताति ॥ ७ ॥ श्रीरमावल्लभ, दासां शेष देत । तेणें तृप्ति होत सकळांसी ॥ ८ ॥

( प्रबंध १३८; राग—भूप, ताल—झंपा. )

पाहा राधा दामोदर । डोलारा सुंदर ॥ निजशांति रुक्मिणी बाळा, हालविती वेळोवेळां ॥ ध्रु० ॥ चरण कमळें, बहुत निर्मळें ॥ उपमा नये अरुणासि, नखकिरण रवि शशी ॥ राधा० ॥ १ ॥ तोडर वांकी अंदू । गर्जति अभिनव साधु ॥ काम क्रोध असुर भीति । घोट्यां इन्द्रनीळकांति ॥ राधा० ॥ २ ॥ जानु पोटऱ्या सरळ । कांसेला पाटोळा ॥ मेखळा किंकिणि वाजति किणिकिणि । आनंद होतो भक्तां मनीं ॥ ३ ॥ नाभिकमळ चांगलें । तेथें चतुर्मुख जन्मले ॥ अनंतब्रह्मांडें उद-

१ खांब नसलेले. २ चांगले. ३ पीतांबर.

रीं जाहालीं । पदकीं मुक्तें जडोनि ठेलीं ॥ ४ ॥ आपाद वन-
माळा । साजे वैजयंति गळां ॥ कौस्तुभ गरिमा नकळे महिमा ।
वर्णितां शेष पावे श्रमा ॥ ५ ॥ चुबुंक हणुवटी । प्रवाळ फळ
वोठीं ॥ दाळिंबबीज दशना तेज । अधिक दिसताहे गुज ॥ ६ ॥
कमळपत्र डोळे । वसंत नाकीं घोळे ॥ धनुष्याकार भ्रुकुटि सार ।
ऐसा हरि परात्पर ॥ ७ ॥ अभाळया माळा । साजे तिलक
पींवळा ॥ अक्षता सुरंग अति अभंग । कदा काळीं नाहीं भंग
॥ ८ ॥ श्रवणीं कुंडलें । तेज गर्ळी हें मांडलें ॥ आजानुबाहो
कमळा-नाहो । करीं भूषणें अपार पाहों ॥ ९ ॥ कुरूळ हेमकांति ।
मुकुटिं शोभा अति ॥ कोटिअर्कप्रभा चोख । त्याहूनि पाहतां
दिसे अधिक ॥ १० ॥ सर्वभूषणा भूषण । श्रीवत्सलांछन ॥
ब्रह्मण्यदेवो श्रीकृष्णरावो ॥ तया पायीं अखंड भावो ॥ ११ ॥
नारद तुंबूर । गाती मनोहर ॥ श्रीरमावल्लभदास । हरिविण नेणे
दुजा भास ॥ राधा दामोदर० ॥ १२ ॥ श्रीः ॥

( प्रबंध १३९; राग—सुरट, मल्हार. ताल—त्रिवट, धुमाळ. )

गोपि झूलत आई, दिनमणि राधा परम सुहाई ॥ ध्रु० ॥
परम सुहाई राधा सुंदरि । प्राणपति मनभावे हे । झूला झूलत
रंग भरीभरि । गोपिनके मन चावे हे ॥ १ ॥ कनकतेजमय
खंब विराजित । हीरन च्यारि खच्यो । वीस फिरोजा पांच
मोतियन । विश्वकर्मा नै रच्यो ॥ २ ॥ पवन मंद सुगंध शीतल ।
बहे जमुना कूलै है । कहेतो कृष्णदास गिरिधर इमि ।
राधामोहन झूलै हे ॥ ३ ॥ श्रीः ॥ ॥ ॥

( वरील डोलान्याचीं पदें संपल्यावर डोलान्यांतील मूर्तीस धूप दीप नैवेद्य दाख-
वून खालील आरती ह्मणून आरती दाखवावी. )

जिकडे पाहे तिकडे तूंच तूं एक । परब्रह्म पूर्ण तूं प्रकाशक ॥
विश्वजन चालक सर्व व्यापक । न कळे न कळे तुझा महिमा कौतुक ॥१॥
जयदेव जयदेव रमावल्लभा । आरति ओंवाळूं भक्तिवल्लभा ॥

---

१ चिंचोळी-सुंदर हनुवटी. २ दांताला. ३ कमलापति.

भक्तीच्या निजसुखें प्रगटली प्रभा । भावें करितां भजन होसी सुलभा ।ध्रु०
वेदां पडले टक धरीलें मौन । वाद करितां शास्त्रें ठेलीं लाजून ॥
अठराही पुराणें करिती स्तवन । अतर्क्य तूं तर्का भक्तां आधीन ॥ २ ॥
जनीं जनार्दन हें तुझें वचन । पाहतां पाहतेपण तुझा तूं पूर्ण ॥
देखुनि चरणदास झाला तल्लीन । अवघा रमावल्लभ आपला आपण ॥३॥

राधाकान्त स्मरण जय गोपाल-इत्यादि नामांचा गजर करावा.
( यानंतर डोलाऱ्यांतील मूर्ति गर्भगृहांत नेऊन ठेवावी. )

## प्रकरण ८ वें-महामंगळारति अथवा परडी आरति.



( प्र० १४० ) स्वानुभवाचा विडा समर्पीला । रंगासि तो आला श्रीरंगरावो ।। आनंदें आरति केली स्वामिलागीं । मिरवलीया जगीं । तिहीं लोकीं हो ।। १ ।। ऐसी ही पूजा देखोनि स्वामी । प्रसाद स्वप्रेम देती भक्तां हो ॥ रमावल्लभदास अगाध लाधला । ब्रह्मादिकां बोलें बोलवेना हो ॥ २ ॥ श्रीः ॥

( प्र० १४१ ) जग हें तारावया कलियुगाआंत । भक्तरूपें हरि अवतरले शांत ॥ श्रीमद्भागवत गीता निभ्रांत । बोध प्रकाशोनि दावी एकांत ॥ १ ॥ जय देव जय देव जय गुरुदेवा । विसरु न पडो मना ही तुझी सेवा ॥ दर्शन स्पर्शन वाक्य प्रीतीचा ठेवा । लाधलीया मुक्ति सर्वस्वमेवा ॥ ध्रु० ॥ दर्शनाची आरत करितांच पाहे । दर्शन मनामाजीं अखंड राहे ॥ उपरि स्पर्शनाची आर्त जों वाहे । हस्तक मस्तकीं लाहोनियां ठाये ॥२॥ हस्तक झाल्या मग वाक्य तो धरी । वाक्य धरितां गुरुची प्रीति त्यावरी ॥ प्रीतीनें झाला हरि सबराभरी । रमावल्लभदास नटला ओंकारीं ॥ ( पा. भे. नवलाव करी ) ॥ ३ ॥

( प्र० १४२ ) तुझे चरणीं उद्धारिलि अहल्याबाळा । तुझेनि प्रतापें तरल्या सागरीं शिळा ॥ जय राम श्यामा भवभंजन

पाहे ॥ तुझें नाम चिंतितां उमाशंकर नीवे ॥ध्रु०॥ रामनामें कांपती कळिकाळ सदा । रामनामें गेली गणिका निजपदा ॥ रामनामें तरले सुर नर वानर । एका जनार्दनीं समाधी स्थिर ॥ १ ॥

( प्र० १४३ ) चिन्मयआनंदरूप जनार्दना । स्वप्रकाश शुद्ध चिदानंदघना । मायातीत मायागुणप्रकाशना । व्यक्ताव्यक्तस्वरूप सद्गुरुनिधाना ॥ १ ॥ जय देव जय देव जय सद्गुरुराया । उजळीन आरति तुझिया पायां ॥ ध्रु० ॥ पाहतां रूप तुझें दृश्य न दिसे । द्रष्टा आणि दर्शन निःशेष तैसें । पाहातां पाहातां पाहणें नसे । मीतूंपण गेलें नीरीं नीर जैसें ॥ २ ॥ मीतूंपण गेलें मग काय आरत । द्वैत तेथें कैंचें देव आणि भक्त ॥ ओघ आणि सागर एकचि अमृत । परि मीळणीचें सुख आहे बहुत ॥ ३ ॥ देवभक्तपणें अवघा तूं होसी । तुझाचि आनंदु तूंचि भोगिसी । भक्तालागीं देवा सगुण झालासि । शेखीं सगुण निर्गुण दोन्ही नव्हासि ॥ ४ ॥ बद्धाचि नाहीं मग कां मागूं मुक्ति । मुक्त ह्मणवणें परम भ्रांति ॥ यालागीं देईं तुझी अभेदभक्ति । श्रीरमावल्लभदासां गुरुभक्तिप्राप्ति ॥ ५ ॥

( प्र० १४४ ) नराचा अवतार सत्शिष्य जाण । नारायण सद्गुरु कळला निधान ॥ जय जय प्रेमळा श्रीकृष्णभक्ता । गुरुपादपद्मीं अतिअनुरक्ता ॥ १ ॥ बाळमित्र तूं गुरुचा अससी । उपरि शिष्यपणें विनट झालासी ॥ तुझेंनि प्रगटला गुरुमहिमा फार । तुझेनि कथिला संवाद सार ॥ २ ॥ सागरिंची गंगा निवडे ना जैसी । गुरुमार्जी वृत्ती साचार तैसी ॥ रमावल्लभदास तुज वेगळिक । नाहीं ऐसें जाणती संत वरटिक ॥ ३ ॥

( प्र० १४५ ) वेद आणि शास्त्र अठरा पुराणा । सद्गुरूची आरति न कळे जाणा ॥ १ ॥ नवल गुरुरायाची धन्य आरति । ब्रह्मा विष्णु शिव जय जय ह्मणती ॥ २ ॥ सिद्ध मुनि ऋषि

तटस्थ पाहती । नकळे नकळे महिमा आह्मां ते ह्मणती ॥ ३ ॥ रमावल्लभदासा अलभ्य प्राप्ति । सकळही मिळुनि जयजयकारें गर्जती ॥ ४ ॥ श्रीः ॥ ॥ ॥

---

## दिवटी.

( प्र० १४६ ) तुझें लेईन मी दरुशन, शंखचक्रांकित भूषण हो । निःशब्दाचें कुलूप तोडीं । दिविदेहाचें उजळणें हो ॥१॥ उदो ह्मणा तुह्मि उदो ह्मणा, कान्हाईमाउलीचा हो । तुझेनि प्रसादें, गोंधळ घालिन मी सुखाचा हो ॥ उदो० ॥ ध्रु० ॥ स्वाधिष्ठानाचे रंगणीं, देहाविणें लोटांगणीं हो ॥ तुझें दर्शन झालिया, अवघी दिससी जनीं वनीं हो ॥ उदो० ॥ २ ॥ प्रकृतिपुरुषाकृति चोखडी, आव्हानिली ती रोकडी वो । अनुहाताचें चौंडकें, गोंधळ नाचसी उघडी हो ॥ उदो० ॥ ३ ॥ नवल दिवीचा प्रकाश, केला रजतमाचा नाश हो ॥ हर्षानंदतेल जाळुनि, सत्वें सांडिला विन्यास हो ॥ उदो० ॥ ४ ॥ एका जनार्दनिं भेटी, हेचि वारी करणें मोठी हो ॥ पुनरपि यात्रा खुंटली, पडली संसारासी तुटी हो ॥ उदो० ॥ ५ ॥

( प्र० १४७ ) * जोगुवा देवदत्ता जोगुवा देव ॥ ध्रु० ॥ बारासोळाजणी मिळोनि रंगणीं । जोगुवा घातला नवविध कामिनीं ॥ १ ॥ षड्दर्शन गळां घालुनि माळा । सुज्ञान दिवटी आली गोंधळा ॥ २ ॥ शुद्ध सत्वाचें उजळणें अंगीं । लाविलें स्वप्रेम कुंकुम भांगीं ॥ ३ ॥ पूर्णबोधाचा उगवला चंद्रमा । पूर्णत्वें परिपूर्ण आहे पूर्णिमा ॥ ४ ॥ आणिकांचें द्वार वळगूं मी काय । जोगुवा घातला दिगंबर माय ॥ ५ ॥ श्रीः ॥ श्रीः॥

(प्र० १४८) अष्टांग योगाचें फळ। सांख्ययोगाचें सफळ॥

---

* ही आरति आवडीच्या मठांत ह्मणत नसून इतर कांहीं ठिकाणीं ह्मणतात.

आणिक कर्मअनुष्ठान । वेद पढावा निर्मळ ॥ दुर्धर तप आणि संन्यास । नाना साधनें तुंबळ ॥ शिणोनि आलों भक्तीपाशीं । तंव ते गुरुकृपा अकळ ॥ १ ॥ जोगुवा अनुभवाचा । मातें घालिन हो साचा ॥ जीवशिवभाव वारुनियां । कवळ देईं अमृताचा ॥ दारोदार हिंडवेना । तुजला गाईन वाचा ॥ संतजन मानवती । उपरी उदो भाग्याचा ॥ ध्रु० ॥ प्रचीति परडी करीं । शांति दर्शनें बरीं ॥ सकळ आंगीं लेउनियां । दिवटी ज्ञानाची धरी ॥ तेथ स्नेह जळतसे । उदो झालासे अंबरीं ॥ नरनारी मिळोनियां । एकी झाली चराचरीं ॥ जोगुवा० ॥ २ ॥ देखोनियां गोंधळास । गुरुकृपेचा उल्हास ॥ जोगुवा दिधला तिणें । वेंचु नाहीं जयास ॥ मग मागणें खुंटलेंसे । सुख झालें असमास ॥ सकळाधार मूळस्थान । रमावल्लभदास ॥ जोगुवा० ॥ ३ ॥

---

## मंगलाचे दिवशीं ह्मणणेच्या आरत्या.

### महागोंधळ.

(प्र० १४९) राजगोपाल ते मंगलम् । बोधानंदघन बाल ते मंगलम् ॥ ध्रु० ॥ अनुपम निष्कल नित्य निरञ्जन अपारमहिम ते मंगलम् ॥ अविरल अगणित अज अव्यय निजतेजोमय ते मंगलम् ॥ १ ॥ अजसुरकिन्नरमुनिवरवन्दित परमपावन ते मंगलम् ॥ गिरिधर सुखकर अघखगबकहर नवनीतचोर ते मंगलम् ॥ २ ॥ सृष्टिस्थितिलयकारण सच्चिद्धन सुखरूप ते मंगलम् ॥ मुष्टिकासुर चाणूरमल्लमर्दन अक्रूरवरद ते मंगलम् ॥ ३ ॥ व्यासपराशरशुकनारदस्तुत पार्थसारथे ते मंगलम् ॥ गोपवधूजनवस्त्रापहारक भीष्मतारक ते मंगलम् ॥ ४ ॥ बीजत्रयमनुपंचपदान्वितमन्त्रस्वरूप ते मंगलम् ॥ सन्ततदासमनोरथपूरित श्रीरमावल्लभ ते मंगलम् ॥ राजगोपाल ते० ॥ ५ ॥

( प्र० १५० ) जोगुवा आला, मूळस्थान झाला । उद्गार देऊनि ह्मणती, दृश्य गोंधळ झाला ॥ १ ॥ द्दष्ट गोंधळिया, भागलीसे बाई । दरुशनाचें सुख याचें, बोलवें कायी ॥ ध्रु० ॥ प्रबोध पुत्र होणें, भक्तीं नवस केला । तो गुरुकृपा जगदंबे, सिद्धी हो नेला ॥ २ ॥ चवदा विद्या चौसष्ट कळा माया योगिनी । सकळही नाचोनि राहिल्या कामिनी ॥ ३ ॥ जागृति स्वप्न निद्रा, आणि तूर्या उन्मनी । अवस्था वेडावूनि राहिल्या चिद्घनीं ॥ ४ ॥ ब्रह्मा विष्णु रुद्र आणि सर्वेश्वर । चवघे गुणातीत सर्वोत्तम हा सुंदर ॥ ५ ॥ चांचरी भूचरी खेचरी अगोचरी । चारी मुद्रा आल्या शांभवीभीतरीं ॥ ६ ॥ सालोक्य सामीप्य सारूप्य सायुज्य मुक्ति । निरंजनीं राहिल्या सकळही युक्ति ॥ ७ ॥ विवेक भैरव आणि वैराग्य वेताळ । सकळ भूतावळीसहित महाकाळ ॥ ८ ॥ महागोंधळ झाला सद्गुरु घरासी आला । रमावल्लभदास ह्मणे मंगलकाला ॥ ९ ॥

---

## अष्टावधानसेवा.

श्रीमद्वेदपदैरुदीरितगुणः श्रीदेवदेवोत्तमः । श्रीमद्भक्तजनप्रियः प्रभुवरैराराधितः श्रीपते ॥ ऋग्वेदप्रियमंत्रवर्णकथितं ऋग्भिर्युतं संस्तुतं । नानारूपसमन्वितैस्सुरगणैस्तं वेदमाराधय॥ १॥ देवदेवोत्तम देवतासार्वभौम अखिलांडकोटिब्रह्मांडनायक ऋग्वेदप्रिय ऋग्वेदसेवामवधारय ॥ १॥ यज्ञोत्पादितसर्वकामितफल श्रीदेव देवोत्तम । यज्ञाराधित यज्ञवृंदविभव श्रीयज्ञ यज्ञेश्वर ॥ ब्रह्मेंद्रादिविशेषसंस्तुत यजुर्वेदाप्रियप्रस्तुतं । छंदोभिर्मुनिभिः प्रदर्शितपदं तं वेदमाराधय ॥२॥ देवदेवोत्तम० यजुर्वेदसेवामवधारय ॥ २॥ सामोद्गीतसमस्तनामविभव श्रीदेवदेवोत्तम । सामाराधित सामसन्नुतपद

श्रीकाम कामप्रद ॥ देवाराधित मंत्रतंत्रसहितं श्रीसामवेदप्रिय । सम्यग्राहितगाथयानुकथितं तं वेदमाराधय ॥ ३ ॥ सामवेदसेवा० ॥ ३ ॥ गीर्वाणस्तुतपादपंकज सुहृत्प्राणप्रदाथर्वणं । कर्माराधित शर्मसंततिकर श्रीदेव देवोत्तम ॥ सर्वार्थप्रिय सर्ववंदितपदाथर्वप्रिय श्रीकरं । सर्वाभीष्टसुखप्रदं हितकरं तं वेदमाराधय ॥ ४ ॥ अथर्ववेद० ॥ ४ ॥ वेदांतैरपि वेदितव्यवचनैः वेदांतविद्याधर । ब्रह्माण्डैरमितैर्गुणैरवहित श्रीदेवदेवोत्तम ॥ ज्ञानानंदसुखप्रदैकनिलय वेदांतशास्त्रप्रिय । भक्ताभीष्टद भुक्तिमुक्तिफलदं वेदांतमाश्रावय ॥ ५ ॥ वेदांत शास्त्र० ॥ ५ ॥ पूर्वेषां कथया पुराणमिति ये जानंति जातं सदा । भक्ता भागवतादि भाग्यदमिदं श्रीदेव देवोत्तम ॥ लक्ष्मीनाथ तवांघ्रिदर्शनकरं गोपालचूडामणे । दिव्यज्ञानपुराणपूर्णपुरुषैराख्यातमाकर्णय ॥ ६ ॥ पुराण० ॥ ६ ॥ वेद्यावेद्यनिगद्यवृंदविदित श्रीगद्यपद्यप्रिय । संपाद्यप्रतिपादितार्थनिचय श्रीदेवदेवोत्तम ॥ विद्यार्थैरमिताक्षरैर्निगदितं वेद्यं सुविद्यानिधे । गद्यं सद्य इहावधारय लसत् गद्यप्रिय श्रीपते ॥ ७ ॥ गद्यपद्य० ॥ ७ ॥ इंद्राद्यष्टकलोकपालविजय श्रीदेव देवोत्तम ॥ भक्ताभीप्सितकष्टनाशनसुहृत् पुष्टिप्रदे श्रीपते ॥ इष्टानंदकमष्टक प्रियकरं संकष्टनिर्मूलनं । संतुष्टार्थमुदावहाष्टकमिदं तत्सेव्यमाराधय ॥ ८ ॥ अष्टकसेवा० ॥ ८ ॥ सम्यग्गीतमिती सविस्मितजनैः संगीतमंगीकृतं । श्रीरंगप्रियरंगसंगमुनिभिः कैश्चित्प्रसंगोदितं ॥ संगीतप्रिय सप्तसप्तगदितैस्तद्दीर्घ-ह्रस्वस्वरैराख्यातं जगतामभीष्टसुखदं संगीतमाकर्णय ॥ ९ ॥ संगीत० ॥ ९ ॥ सर्वे पुण्यविरोधिनो यदिजनानश्यंति यद्गीतितः । पूर्णं भद्रमभिप्रसन्नमुनिभिर्वृद्धिं ततो गच्छति ॥ सन्मांगल्यकरं परं गुणानिधे गोपालकृष्ण प्रभो । शंखावादमिमं परिश्रुणु हरे श्रीदेव देवोत्तम ॥ १० ॥ शंखावाद्यं० ॥ १० ॥ लक्ष्मीवल्लभ वेणुनादनपरं सप्तस्वरालंकृतं । तालाष्टप्रियवाद्यघोष-

सहित श्रीदेव देवोत्तम ॥ गंधर्वाप्सरसेवितं तव पदं ब्रह्मादिवंद्याच्युतं । श्रीमन्विश्वपुराधिवास भगवन् त्वं वेणुनादं श्रुणु ॥ ११ ॥ वेणुवाद्यं ॥ ११ ॥ गोविंदाच्युत माधवाखिलपते गोवर्धनोद्धारक। मायामोहित भूर्जित प्रियमिदं श्रीराजराजेश्वर ॥ शत्रुध्वंसन पाहि पाहि शरणं प्राप्तं वसंतं सदा । कामं कामय कामितार्थफलदं श्रीकांत तंसोषय ।। १२ ॥ मौरिसेवा० ॥ १२ ॥ पंचानां निनदैरुदीर्णमानिशं तत्पंचवाद्यप्रभो । भेरीभेदसमन्वितैर्विजयकृत् संतोषकृत्संततं ॥ शंखादिप्रियवेणुनादविधिना वीणादिवाद्यप्रिय । वाद्यं सद्य इहावधारय हरे श्रीदेव देवोत्तम ॥ देवदेवोत्तम देवतासार्वभौम अखिलांडकोटिब्रह्मांडनायक सर्ववाद्यप्रिय सर्ववाद्यसेवामवधारय ।। १३ ॥

( ताटांत वाती व कापूर ठेवून खालील आरती ह्मणून ' नित्यमंगलाराति प्रकरण ' संपवावें· )

( प्र० १५१ ) जयजय सत्य सनातन मंगल । जय जय नित्य निरामय मंगल । जय जय प्रत्यग्वस्तु सदोदित । राज गोपाल जय जय मंगल ॥ १ ॥ जय वाङ्मनसागोचर मंगल । जय जय सन्मय चिन्मय मंगल । जय जय अद्वय पर तेजोमय । बालमुकुंद जय जय मंगल ॥ २ ॥ जय जय भक्तानुग्रह मंगल । जय जय भक्तिरसप्रिय मंगल । जय जय अच्युत केशव माधव । गोपकुमार जय जय मंगल ॥ ३ ॥ जय जय गुरुवरदाकर मंगल। जय जय सुप्रेमामृत मंगल । जय जय सुरवरवंदित राधारमण गोपाल जय जय मंगल ॥ ४ ॥ जय जय सदय हृदय हरि मंगल । जय जय कुब्जानुग्रह मंगल । जय लक्ष्मीधरदाससुपूजित राजगोपाल जय जय मंगल ॥ ५ ॥

# प्रकरण ९ वें—उपसंहार.

( भजन सोंपवितांना ह्मणण्याचीं पदें वगैरे. )

( प्रबंध १५२ ) घालीन लोटांगण, वंदीन चरण। डोळ्यांनीं पाहीन रूप तुझें ॥ प्रेमें आलिंगिन, आनंदें पूजिन। भावें ओंवाळीन ह्मणे नामा ॥ १ ॥

( भजन ) कृष्ण कृष्ण जय, कृष्ण कृष्ण जय ॥

( प्र० १५३ ) हरिनाम मुखीं जया। कैंचें बंधन हो तया ॥ ध्रु० ॥ साङ्ग न घडे पूजा। तरी नामचि घ्यावें वोजा[1] ॥ १ ॥ महापापाचे वडवाळीं[2]। हरिनाम तया पाळी ॥ २ ॥ विकळ होय जरी कर्म। हरिनामचि त्याचें वर्म ॥ ३ ॥ न कळे ब्रह्मज्ञान। हरिनामचि समाधान ॥४॥ भ्रांति पावे नाश। ह्मणे रमावल्लभदास ॥ ५ ॥ श्रीः ॥ ॥ ॥

( प्रबंध १५४; अभंग– ब्रह्मार्पण. )

जें जें कांहीं करणें। तें तें देवा समर्पणें ॥ १ ॥ हीच माझी सेवा। तुज मानवली कीं देवा ॥२॥ जें जें होय खाणें। तें तें नैवेद्य वाहणें ॥ ३ ॥ अग्नीमाजीं पडे। तें तें हवनचि घडे ॥ ४ ॥ नासे विटे हारपे। तें तें तुजला समर्पे ॥ ५ ॥ जें जें वांटी करें। तें तें दान एकसरें ॥ ६ ॥ जें जें होती कष्ट। तें तें तप मानीं निष्ठ ॥ ७ ॥ घडे जें शरीरीं। तें नेघे आपुल्या शिरीं ॥ ८ ॥ बरें हो वाईट। परि हा आठव तो नीट ॥ ९ ॥ जाणें कोठें पडे। ते तुझीच यात्रा घडे ॥ १० ॥ हिंडतसें जनीं वनीं। ते प्रदक्षिणा मानी ॥ ११ ॥ जें जें वांचा बोलिली। ती ती तुझीच स्तुति केली ॥ १२ ॥ जें जें चित्तीं

---

१ शुद्धभावानें, प्रीतीनें. २ त्रासांत, वणव्यांत.

बैसे । तें तें ध्यान होई तैसें ॥ १३ ॥ जें जें ऐके कानीं । ती ती कथा तुझी मानी ॥ १४ ॥ जें जें भेटे अंगा । ते भेटी दिली त्वां गा ॥१५॥ जें जें नयनीं पाहे । तें तें तुझेंचि रूप आहे ॥ १६ ॥ जें जें हुंगे घ्राणें । तें तें निर्माल्य अवघ्राणें ॥ १७ ॥ अडखळोनी पडे । तें तें दंडवत घडे ॥ १८ ॥ निद्राकाळीं लोळे । तें तें लोटांगण घोळे ॥ १९ ॥ सर्वज्ञ ह्मणे मग । तूं माझा जीवलग ॥ २० ॥ या सेवेनें मी तूं गा । भिन्न न वसे कीं गा ॥ २१ ॥ ही सेवा नेणे मूढा तो देह भावारूढ ॥ २२ ॥ ही सेवा लोकाचारी । न मानेल अविचारी ॥ २३ ॥ ही सेवा मानी जो रे । सदा नित्यमुक्त तो रे ॥ २४॥ ही सेवा जया येत । तो विकत मज घेत ॥ २५ ॥ ही सेवा न मनी नर । सत्य जाणिजे तो खर ॥ २६ ॥ ही सेवा नेणे नारी । जाणावी ती व्यभिचारी ॥ २७ ॥ ही सेवा मानी जया । मी वश आहे तया ॥ २८ ॥ ही सेवा निरंतरीं । ती परमहंसा घरीं ॥ २९ ॥ ही सेवा जया आली । गुरुकृपा तया झाली ॥ ३० ॥ ही सेवा मनीं भरे । तोचि भक्त जनीं तरे ॥३१॥ ही सेवा सकळीं संतीं । हेंचि बोलियलें अंतीं ॥ ३२ ॥ ह्मणे रमावल्लभदास । श्रीराजगुह्य भास ॥ ३३ ॥ ऐसीं हीं बत्तिस पदें । कीर्तनाच्या अंतीं वदे ॥ ३४ ॥ बत्तिस विडिया घेउनि क्रीडे । घ्या घ्या मुखासि रंग चढे ॥ ३५ ॥ ॐ तत्सत् श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

( प्र० १५५ ) काय करिसी व्रत तप । कृष्ण कृष्ण इतुकें जप ॥ १ ॥ तेणें सार्थक देहाचें । जन्म मरण खंडे साचें ॥ २ ॥ काय करिसि तुझि व्युत्पत्ति । संतचरणीं धरीं प्रीती ॥ ३ ॥ काय करिसि तुझि जाणीव । जतन करीं हा सद्भाव ॥ ४ ॥ एक कृष्ण जीवीं धरी । नाना दैवतें न धरीं ॥ ५ ॥ रमावल्लभदास ह्मणे । सत्य माना हें बोलणें ॥ ६ ॥

(प्र० १५६) विश्व पाळीतसे हरि। दासां केवीं तो अव्हेरी ॥ १ ॥ विश्वंभर नाम ज्याचें । केवीं उपेक्षील साचें ॥ ध्रु० ॥ जननीजठरीं नवमास। नाहीं उबागिलें आम्हांस ॥ २ ॥ स्तनीं दुग्ध तें निर्मिलें। बाळपणीं वांचविलें ॥ ३ ॥ कीटक पाषाणांत वसे। तिचे मुखीं चारा असे ॥ ४ ॥ धरा धरा हा विश्वास । म्हणे रमावल्लभदास ॥ ५ ॥ श्रीः ॥ ॥

†(प्र० १५७) कायेचें कर्म वाचेचें वर्म। मनाचा हा धर्म हरि होय ॥ १ ॥ अनन्यपण हेंचि हें जाण। याही वरती खूण बोलों नये ॥ २ ॥ इंद्रियांची चेष्टा बुद्धीची निष्ठा। अहंकार प्रतिष्ठा हरि होय ॥ ३ ॥ रमावल्लभदास दुजें न साहे। विश्वीं कृष्ण पाहे आपणचि * ॥ ४ ॥ राधाकांतस्मरण जय गोपाळ ॥

## रुक्मिणी सत्यभामेची पायघडी इ०

(सोम–बुध–गुरु–शनिवारीं म्हणावयाची.)

(प्र १५८) आजि वाड[1] वेळु झाला। कृष्णा मंदिरासि चाला ॥ १ ॥ चालावें चालावें रखुमाईच्या मंदिरा ॥ ध्रु० ॥ बैसेकेसी[2] उशीर झाला। भागलेति दयाळा ॥ चालावें०॥ २ ॥ नामयाचा स्वामी आला। रखुमाईसी हरिख झाला ॥ ३ ॥

(प्र० १५९) कांबीकार[3] म्हणती मांदी[4] सारा। राऊळ[5] पातले शेजारीं[6] हो ॥ १ ॥ देवा बळिये पाय, बळिये पाय। स्थिर स्थिर चालावें यादवराया हो ॥ ध्रु० ॥ शेजारासी देव येती कवणेपरी। राईरखुमाई विचार करी बरी ॥२॥ उद्धवाच्या खांद्यावरी हात (अक्रुराच्या खांद्यावरी हात)। विष्णुदास नामा पांवा[7] वहात ॥ ३ ॥ श्रीः ॥

† हा प्रबंध 'कायेन वाचा०' ह्या श्लोकाचें रहस्य दाखवितो.

* पा० भे०– 'विश्वीं विश्व पाहे आत्मरूप.'

१ फार वेळ. २ सभेला. ३ वेत्रधारी. ४ दाटी. ५ राजेसाहेब. ६ जवळ. ७ पादुका.

(प्र० १६० ) चाल वेगीं देवा आई वाट पहात । तुझे भेटीलागीं फार व्याकूळ होत ॥ १ ॥ विलंब न लावावा झड-करी बोलाविलें । माझी आण घाल ह्मणुनि सांगितलें ॥ २ ॥ इतुकें उत्तरीं देव हासिन्नला । थोकत थोकत कैसा चालियेला ॥ ३ ॥ अक्रूरउद्धव दोंही बाहीं साजती । अति उतावीळ त्वरें चाले श्रीपती ॥ ४ ॥ निजदासें पादुका सत्वर घेतल्या शिरीं । देवापुढें आला शीघ्र आईच्या मंदिरीं ॥ ५ ॥ श्रीः ॥

(प्र० १६१ ) जहालें कीर्तन कृष्णें विसर्जिली सभा । वाजत गाजत आंगणीं येऊनी उभा ॥ १ ॥ उठा उठा हो रखुमाई आले श्रीहरी । कनकाच्यां[1] कळशीं चूळ द्या हो करीं ॥ २ ॥ लावण्याची राशी येत भीमकनंदिनी । मन्मथाची माता हरि गोविला गुणीं ॥ ३ ॥ पाप ( ? ) पातळ पल्लव रूळे मेदिनीं । पाउला पाउला रुक्मिणि चाले हास्यवदनी ॥ ४ ॥ इच्छित मानस दोघा दृष्टीची खेवें[2] । प्रीतीचा पडिभर[3] हा तंव जाणि-तला जीवें ॥ ५ ॥ आमचा बाप कृष्णजी माता रुक्मिणी । आह्मां भक्तांसी निधान सांपडली दोन्ही ॥ ६ ॥ ॥

(प्र० १६२—पायघडी ) महासभा विसर्जूनि अंतरसभे आले । रुक्मिणी सत्यभामा या सर्वा श्रुत झालें ॥ आरत्या घेउनि येती तंव मन आनंदलें । तें महासुख न बोलवे बोलें ॥ १ ॥ जय देव जय देव जय कृष्णसमर्था । आरत्या करिती नारी तंव न बोलवे अर्था ॥ ध्रु० ॥ रुक्मिणी सत्यभामा उभिया दों बाहीं । सोळा सहस्र अंगना आणिक त्याही ॥ हास्य वदनीं कैशा ओंवाळिति पाहीं । नारद तुंबर गाती आनंदें तेही ॥ २ ॥ उद्धव पितांबर कैसा ढाळीत असे । अक्रूराच्या करीं तैसा विंझणा वसे ॥ एक मुखकमळीं लक्षे एक पदकमळीं बैसे । एक

१ सोन्याच्या झारींतून. २ आलिंगन. ३ अधिकता.

ब्रीदें कृष्णजीचीं वानिती कैसे ॥ ३ ॥ ऐसी अंतर पूजा घेऊनी निगुतीं । निजनिद्रेलागीं महाराज उठती ॥ सर्वांहि शेजारीं एकचि व्यापक चिन्मूर्ती । श्रीरमावल्लभदासा उर्वरित प्राप्ती ॥ ४ ॥ जयदेव जयदेव कृष्णा उर्वरिता । निजभक्तां हृदयीं निज निज तूं अनंता ॥ ध्रु० ॥ श्रीः ॥

( प्र० १६३—भाटीव चामरें. ) कृष्णजीचा महिमा रे । नकळेचि अरे बारे ॥ कठिण तो बहुत रे । निर्वाणीत गातां ॥ १ ॥ करवती युद्धगोठी । थांबावें कीं रणवटीं । लाज बहु देतां पाठीं । लोकांमाजीं वागतां ॥ २ ॥ ऐशी कृष्णभक्ती पाहे । जीवाचिया साठीं आहे । निर्धार सांडितां नये । शब्दब्रह्म बोलतां ॥ ३ ॥ विसरोनि आपणास । सर्वीं देखे कृष्णजीस । रमावल्लभाचे दास । ऐसे भक्तीं जागत ॥ ४ ॥ ॥ श्रीः ॥

( प्र० १६४—शेजारति ) कमळीं आरति कमळीं कमळा । कमळीं करीती शामळा निर्मळा ॥ ध्रु० ॥ कमळीं कमळ एकसें वरिलें । कमळीं दोंही पाय कैसे धरिले ॥ १ ॥ कमळ आरक्त आरक्त कमळीं । हळुवार हळुवार घोळती अमळीं ॥ २ ॥ कमळीं दूर एक कमळ शोभलें । कमळीं नीळ हेम लावण्य लोभलें ॥ ३ ॥ कमळ चपळ निश्चळ कमळीं । कमळासी कमळ उसी हे शामळीं ॥ ४ ॥ कमळ सकळ प्रेमळ ध्याती हो । श्रीरमावल्लभ—दास गाती हो ॥ ५ ॥ श्रीः ॥ ॥ ॥

( प्र० १६५—विडिया व शयन ) महाराज पहुडले । गोपिराज पहुडले ॥ ध्रु० ॥ पहुडले श्याम हरि, जवळी भीमकी गोरी । सलज्ज हांसत करीं, विडिया देत असे ॥ १ ॥ गौर चुडियांचे हात, विडिया देतां शीणतात । श्यामबाहू पुढें होत, मुखा मुखें पहातसे ॥ २ ॥ पाय चुरी उद्धव तो, नारद मधुर गातो । प्रीतिरस पूर्ण होतो, हास्य बहू येतसे ॥ ३ ॥ रमा-

वल्लभाचे दास, सलगीचे बहुवस। भय नाहीं कांहीं त्यास, मोकळीक होतसे ॥ ४ ॥ ऐसी पूर्ण विडिया झालिया, श्रीमुख झांके हरि। श्रीरमावल्लभदास, न वंदे याही वरी ॥ १ ॥ शेष-पान तबक आलें, निजभक्त सुखें धाले। विश्रांति विश्रांत हो, रमावल्लभदास झाले ॥ १ ॥ श्रीः ॥ ॥ ॥

## राधेची पायघडी.

( रवि-मंगळ-शुक्रवारीं ह्मणावयाची. )

( प्र० १६६-पायघडी. ) संवगडीयाचे सुखें निशि कर्मू आली। आठव दूतिका शीघ्र देती झाली ॥ १ ॥ चालावें हो नंदकुमारा। वाट पाहाते राधा सुंदरा ॥ ध्रु० ॥ झणीं विलंब लावाल आतां। प्रीतिसुख मोठें मिळणीसी जातां ॥ २ ॥ निज-गडा रमावल्लभदास। तोहि त्वरा करी व्रजनाथास ॥ ३ ॥

( प्र० १६७ ) सखा प्रेमळाचा उठियला पाहीं। अति त्वरा कैसा चालत पायीं ॥ १ ॥ कान्होबा स्थिर स्थिर गा स्थिरू। दयाळुवा बा धरीं गा धीरू ॥ ध्रु० ॥ राधिका ह्मणे हो दूतिका माय। मैत्रें खोळंबिलें वाटेसी काय ॥ २ ॥ जाते युगसम एकएक घडी। अजून कां नये श्याम तांतडी ॥ ३ ॥ रमावल्लभदास आणीत हरि। सखयाचा हात खांद्यावरी ॥ ४ ॥ हांसत झेलत हरि आले घरा ॥ ह्मणे रमावल्लभदास आरति करा ॥ १ ॥

( प्र० १६८-चामरें. ) व्रजपतिबाळ रे, रसिक रसाळ रे। सुरवरां पाळ रे, तो आवडीचा नाथ हा ॥ १ ॥ तनुमना चाळ रे, मानी फट् काळ रे। भावाचा भुकाळ रे, तो आवडीचा नाथ हा ॥ २ ॥ गोपाळीं गोपाळ रे, भूपाळीं भूपाळ रे। कळी-काळा काळ रे, तो आवडीचा नाथ हा ॥ ३ ॥ रमावल्लभदास रे, त्याचीच करी आस रे। देत असे भास रे। तो आवडीचा नाथ हा ॥ ४ ॥ श्रीः ॥ ॥ ॥ ॥

( प्र० १६९–शेजारति. ) मंदिरा श्याम आले, केलें शीघ्र आसन । प्रक्षाळोनि पाय, पूसी प्रीतीं गहन । चंदन चर्चियलें, घाली हार सुमन । उधळी गंध पिष्ट, झालें सर्वही अर्पण ॥ १ ॥ आरति शयनसमयीं, करी अंगना राधा । पहातां तेजमूर्ती, नुरे द्वैतही बाधा ॥ ध्रु० ॥ रचिली शेज नीकी, सुकुमार मोगरी । शेवंती रंग नाना, शोभताति कुसरी । दशांग दहन होती, रत्न-दीप अंतरीं । चामरें ढाळ देती, सख्या सलज्जपरी ॥ २ ॥ श्रीमुख न्याहाळितां, राधे कंप सुटला । प्रेम हे सांवरेना, देह-भाव आटला । शामळा बैसवीतां, येरी कंठ दाटला । दास रमावल्लभीं हो, पहा भेद तुटला ॥ ४ ॥ आरति शयनसमयीं, ऐसी होऊनि ठेली । राधिकेसहित मूर्ती, पूर्ण मंचका आली ॥ध्रु०॥

( प्र० १७०—विडिया व शयन राग—मालकंस, ताल दादरा. )

शयनीं गोपाळ हरि, जवळीं राधा गोरी । विडिया परस्पर मुखीं, देत प्रीति थोरी ॥ ध्रु० ॥ इंद्रनीळकीळगर्भ, तैसी गोप शोभा । प्रिया हेम रसरंगी, लावण्य आलें लोभा ॥ १ ॥ एक सखि ते पाय चुरी, विडिया दुजी देत । कर्म वर्म बोलतां, हास्य बहुत येत ॥ २ ॥ ऐसी पूर्ण विडी झाली, श्रीमुख झांकी हरि । श्रीरमावल्लभदास हा, न वदे याहीवरी ॥ ३ ॥ ॥

( प्र० १७१ ) राधा आड पडदा घाली । हीचि आज्ञा सर्वां झाली ॥ १ ॥ जावें आपुलाल्या भुवना । मनीं धरा जगज्जीवना ॥ ध्रु० ॥ सर्व कर्मीं निरंतर । सावध असो द्या अंतर ॥ २ ॥ रमावल्लभदास सांगे । आज्ञा देवासी हे मागें ॥ ३ ॥ श्रीः ॥ शेषपान तबक आलें । निजभक्तां सौख्य झालें ॥ विश्रांतीं विश्रांत हो ॥ रमावल्लभदास झाले ॥ १ ॥

## प्रसादाचें पद.

(प्र० १७२) अमृताचा स्वाद। गुरु तुझा हा प्रसाद ॥ फिका होय वाद। शब्दब्रह्म ॥ १ ॥ अरे अरे गुरुदेवा। मी करीन तुझि सेवा ॥ प्रसाद स्वमेवा। द्यावा मज ॥ ध्रु० ॥ गुरुप्रसादाकारणें। मज येथें झालें येणें ॥ वेगवक्र देणें। बाहोनियां ॥ २ ॥ गुरुमुखींचा प्रसाद। ब्रह्मा लाधोनियां ॥ सृष्टि करूनियां। लिंपेना तो ॥ ३ ॥ गुरुप्रसादें या विष्णु। अवतार धरीत ॥ होय सदोदित। पूर्णब्रह्म ॥ ४ ॥ गुरुप्रसादें महेश। प्रळयीं नाशेना ॥ दुसरें भासेना। तया कांहीं ॥ ५ ॥ गुरुप्रसादें श्रीराम–। नाम तारक झालें ॥ मुखामाजीं आलें। सदाशिवा ॥ ६ ॥ शुक वामदेवो। गुरुप्रसादाकरितां ॥ मुक्त, विचारितां। वेदामाजीं ॥ ७ ॥ गुरु प्रसादें करूनी। सिद्धऋषिमुनी ॥ पावन त्रिभुवनीं। फार झाले ॥ ८ ॥ श्रीरमावल्लभदासा। गुरुप्रसाद लाधला ॥ ढेंकरू दीधला। पूर्णत्वाचा ॥ ९ ॥ ॥ ॥

(प्र० १७३–अभंग) आला प्रसाद देवाचा। भक्तां आनंदु साचा ॥ १ ॥ आला आला हरिप्रसादु। संतुष्टला परमानंदु ॥ २ ॥ जी जी अपेक्षा असेल। ती मज दातार पुरवील ॥ ३ ॥ रमावल्लभदास ह्मणे। याहुनि काय तें मागणें ॥ ४ ॥ श्रीहरिगुरुप्रसादोऽस्तु ॥ शुभंभवतु ॥ श्रीरस्तु ॥

(भजन) गोपाल कृष्ण गोपाल ॥

(गजर) राधाकान्तस्मरण जय गोपाळ। सीताकान्तस्मरण जय जय राम। पुंडलीक वरदा हरि विठ्ठल। पार्वतीपते हरहर महादेव। श्रीगुरुदेव दत्त ॥

श्रीएकनाथ महाराजकी जय! श्रीलक्ष्मीधरदास महाराजकी जय! श्रीरमावल्लभदास महाराजकी जय! सब संतनकी जय!!!

---

१ लवकर, २ बोलावून.

# प्रकरण १० वें—श्रीकृष्णजन्मकथा.





आनन्दरूपे निजबोधरूपे ब्रह्मस्वरूपे श्रुतिसाररूपे ॥
स्वतन्त्ररूपे रमणीयरूपे श्रीरङ्गरूपे रमतां मनो मे ॥ १ ॥

बालाय नीलवपुषे नवकिङ्किणीनां
जालाभिरामजघनाय दिगम्बराय ।
शार्दूलदिव्यनखभूषणभूषिताय
नन्दात्मजाय नवनीतमुषे नमस्ते ॥ २ ॥

डफगाणें.

( प्र० १७४ ) ॐकाराची आदि तो मी गणेश नमीन । चहूं वाचा सिद्धीतें शारदे वंदीन । कुळेंवीण[1] कुळदैवत संतसज्जन ध्याईन । श्रीगुरुपाय जोहारिले कृष्णपवाड[2] गायीन ॥ १ ॥ ऐसे अनंत पवाडे कवणालागीं गणवती हो । सप्तसागर सप्तद्वीपें लिहाया न पुरती हो । परि मुंगी साखर सांडू न ह्मणे तैसी माझी मती हो । या गोपाळाच्या गुणीं ऐसी पडकली[3] अती हो ॥ ध्रु० ॥ तरि मनुष्यरूपी दैत्य बहु द्वापाराचे अंतीं हो । न घेती देवनाम कोण्हा घेवोंही न देती हो । तों धरणीं[4] भारु झाला गेली ब्रम्ह्येयाचेप्रती हो । धेनूचें ती रूप घेउनी दावी काकुळती हो ॥ ऐसे अनंत० ॥ २ ॥ मग धरा विरिंचि इंद्र अग्नि यम पैं कुबेर हो । वरुण वायु चंद्र सूर्य विमानें चहुं फेरे हो । आले शिवापाशीं

---

१ वंदिले. २ कृष्णकीर्ति. ३ जडली. ४ भूमातेला.

तंव तो विचाराचा मेरु हो । आले क्षीरसागरा विनविति संताचें माहेर हो ॥ ऐसे अनंत० ॥ ३ ॥ विनवुनि नेत्र लावुनी तटस्थ बैसती हो । तंव गगनीं ध्वनि झाली तया विधात्याप्रती हो । सकळहि देव ऐसें करा यादव होणें अती हो । वसुदेव-कुळीं अवतरोनि निवर्वीन वसुमती[1] हो ॥ ऐसे० ॥ ४ ॥ मग शिवादिक आपुलाल्या भुवनासी जाती हो । मथुरेमाजीं सर्व देव यादव होउनि ठाती हो । तंव देवांचा दुसमान तो कंस दैत्य-जाती हो । त्याची भगिनी देवकी जगीं सुंदरी आणि सुजाती हो ॥ ऐसे० ॥ ५ ॥ ती वसुदेवाला देउनि चारी दिवस बरवे झाले हो । पांचवे दिवशीं वराड थोर मिरवूं निघाले हो । गजरें वाजंतरें पाहा गगन दुमदुमिलें हो । गायकीं येऊनी राया कंसा जोहारिलें हो ॥ ऐसे० ॥ ६ ॥ तें गाणें परिसाया वाजंतरीं राहविलीं हो । रुचलें गाणें राया तया उंचितें[2] देवविलीं हो । ऐशा सोहळ्यामध्यें तईं विवंसी[3] ऊठिली हो । मोठ्यानें तैं गग-नामाजीं अशरीरिणी[4] बोलिली हो ॥ ७ ॥ ह्मणे रे रे कंसा मूढा सांभाळीं सांभाळीं रे । या देवकीचा आठवा तुज मारील तत्काळीं रे । दचकोनि तरवार तेणें काढिली त्या काळीं रे । धरोनि वेणी बहिणीलागीं माराया न्याहाळी रे ॥ ८ ॥ मारावी तंव इतुक्यामध्यें नवरा बोले आंगें रे । ह्मणे धीर धर राया भोजा पाप हें निजांगें रे । वांचणें पापें त्याहुनि काय मरण वाईट सांगें रे । होणार तें पाहों न पडे देहलोभाचे पांगें रे ॥ ९ ॥ परमार्थें न भिजे कंस उदकीं जेवीं धोंडा रे । मग प्रापंचिक लोभाचा आणी वसुदेव लोंढा[5] रे । ह्मणे लाडकी तुझी भीरु[6] भिडें पाहतसे तोंडा रे । नकळे हीसि कांहीं तूं तरि पाडूं पाहसि रोंडां[7] रे ॥ १० ॥ परमार्थ प्रपंच खळा दोन्ही नावडती रे ।

---

१ पृथ्वी. २ अहेर, बक्षीस. ३ विघ्न, पिशाच. ४ आकाशवाणी. ५ पूर. ६ भित्री. ७ डोकें मारायला पाहतोस.

मग देईन अपत्यें ऐसें वसुदेव बोलती रे । तें मानलें पापरूप रायें सोडिली ती सती रे । कितेकांहीं दिवसीं देवकि पुत्र प्रसवती रे ॥ ११ ॥ तैं कंसापाशीं न्याया त्यासी वसुदेव घेत रे । तंव भला भला कंस ह्मणे त्याचें त्यासी देत रे । तंव तो यादव घेउनि वेगीं देवकीपाशीं जात रे । मागें कंससभेमाजीं नारदमुनि येत रे ॥ १२ ॥ नारदाची पूजा करुनि कंस तो सांगत रे । जाणुनि हा एक देवऋषि काय तो बोलत रे । ह्मणे आठवा तो कोण मज नाहींच कळत रे । हे यादव मानव परि देवाचि वागत रे ॥ १३ ॥ कंसा यापरि गोंवर[१] फिरंवुनि नारद चालिला रे । तैसा देवकि पैं वेगीं कंस धाविन्नला रे । पुत्र घेऊनियां शिळेवरी आपटिला रे । यादवांसि तेणें नष्टें आट आरंभिला रे ॥ १४ ॥ वसुदेव देवकीस तो घाली बंदीखानीं रे । पितया उग्रसेना बेडी घाली अभिमानी रे । यादवांसि देशवटा[२] कितेक सेवक निदानीं[३] रे । रात्रंदिवस धुक धुक कोणी नाहीं समाधानी रे ॥ १५ ॥ सहा बाळें मारिलीं देवकीचीं कंसानें रे । मग योगमायेलागीं बोलाविलें देवदेवानें रे । ह्मणे देवकिच्या पोटीं अवतार घेतला शेषानें रे । लाघव करुनि रोहिणिउदरीं घालीं शेषासन रे ॥ १६ ॥ ते वसुदेवाची कांता रोहिणि गोकुळांत आहे हो । तूं यशोदेची कन्या तेथें होऊनीयां राहे हो । मग मी पूर्ण अंशें देवकीकुशीं राहेन पाहे हो । कंस मारिल ह्मणसी तरि सामर्थ्य तुज पैं आहे हो ॥ १७ ॥ प्रदक्षिणा करूनि माया भूमंडळीं उतरली हो । बलिभद्राची तनु रोहिणिउदरीं घातली हो । तैंपासुनि वृषली[४] कर्मवदंती निघाली हो । पोटिंचें कैसें नेलें जगीं मात हे वाढली हो ॥ १८ ॥ मग

---

१ डोकीवर राख फांसून. २ देशोभ्रष्टता. ३ शेवटीं. ४ व्यभिचाराची बोलवा.
४ (याचा पाठभेद ' कुसळी कर्मपद्धती ' असाही कांहीं प्रतींत आढळतो.)

सकळां कळे कृष्णनाथ देवकिपोटीं आला हो । कंस वेगीं पाहे तंव देखोनियां भ्याला हो । खातां पितां पाहतां सर्व हरिच देखता झाला हो । भयेंच तरि कृष्णरूप होऊनियां ठेला हो ॥ १९ ॥ कारागृहा पाशीं देवसमूह मिळाला हो । गर्भस्तुति करूनि पुष्पघन वर्षविला हो । वद्य अष्टमीं श्रावणमासीं रात्रीं उपजला हो । चतुर्भुज अलंकारीं दृष्टीस पडला हो ॥ २० ॥ करकमळ जोडोनि मग बापें तो स्तविला रे । दृष्टि भरुनि माता पाहे तिनेंही विनविला रे । जन्मांतरींचा झाडा तियेपाशीं निवेदिला रे । आयुधेंसिं होता तो दों भुजीं देखिला रे ॥ २१ ॥ कंसाचिया भेणें न्याया गोकुळासी हरी रे । पितांबरें गुंडाळोनि पिता घ्याया लागे करीं रे । हातकडीं पायकडीं तंव तीं तुटलीं लवकरी रे । आपेंआप सर्व द्वारें उघडलीं तयावरी रे ॥ २२ ॥ सळसळ सळसळ सळकत मेघ गंभीर वाजत रे । पोटिं धरोनि कृष्णपिता तांतडीं चालत रे । सहस्रफणि सहस्रमणि छत्रें या मिरवत रे । यमुना दोनी भाग नंदराउळा पावत रे ॥ २३ ॥ तंव योगमाया नंदजाया प्रसवली आहे रे । तीस घेउनी कृष्ण ठेवुनी शीघ्र आला पाहें रे । भाग दोनी यमुना तैसिच तिष्ठत जगीं राहे रे । नेणों कोण सागरा खेवू मी देऊं स्मरताहे रे ॥ २४ ॥ कन्या आणिलि तिणें पाहा टाहो केला अती रे । रक्षपाळ उठोनियां आठवा झाला ह्मणती रे । लाहेंलाहें कंसापाशीं जाउनी सांगती रे । तंव तो येउनि कैसी पायीं धरिली ते शक्ति रे ॥ २५ ॥ पायीं धरूनीयां जंव बळें उपटावी रे । निसटोनि करिंची जाऊनि नभीं रूप दावी रे । आयुधें सहित अष्टभुजा केवीं ती वर्णावी रे । वचन बोलोनियां तैसें कंसातें भांबावी रे ॥ २६ ॥ ह्मणे मारतोसी तुझेनि मरेन मी काय रे । तुझा वैरी आणिके ठायीं मी घ्यातें त्याचे पाय रे । उपरि गुप्त आदिमाया कौंस विस्मित

ठाय रे । वसुदेव देवकी त्यातें मोकळीक जाय रे ॥ २७ ॥ उगवल्या दिवस कंसें मंत्री बोलाविले हो । तंव ते शोधित मूढ बाळां मारूं विचारिलें हो । पुतनादिकांलागीं विडे देउनि पाठविलें हो । आतां नंदाघरीं सोहळा त्यासी पाहों आले हो ॥ २८ ॥ सकळीं देवीं हरुषें करुनि भेरी वाजविल्या हो । सर्वही नंद गौळ्यांलागीं बहुत सोहळा हो । घरोघरींचे बाळंतविडे आले पाहों सांवळा हो । सकळां शोभा आली होतो संभ्रम आगळा हो ॥ २९ ॥ पांचवे दिवशीं पूतना कृष्णें शोषिली साचार हो । दों मासांचा मोडी गाडा पायें कोंवळ साचार हो । पवाडे मल्ल गाती किती करूनि विस्तार हो । रमावल्लभदास ह्मणे देव करीं हें सार हो ॥ ऐसे अनंत० ॥ ३० ॥

( प्रबंध १७५; राग–झिंजोट, ताल–त्रिवट. )

मास श्रावण वद्य अष्टमी नक्षत्र रोहिणि मंगल । बुधवासर अर्धनिशीं हृषीकेशी जन्मला ॥ १ ॥ नवल उद्भव नवल उद्भव नवल उद्भव देखिला । अजन्मा तो जन्म घेतो विस्मित होतो विस्मयो ॥ ध्रु० ॥ उपजत नेत्र कमळपत्र हास्यवक्त्र साजिरें । चारि भुजा आयुधें वोजा दिसत सहज गोजिरा ॥ २ ॥ हस्त कडगें रत्नखचितें बाहुवटिकें शोभती । कंब्वाकृत कंठ शोभत दीप्ति कौस्तुभ दावित ॥ ३ ॥ वैजयंती आपाद रूळें शोभित पिवळें वसन । क्षुद्रघंटिका रत्न अनेका मेखळा व्यापका कटितटीं ॥ ४ ॥ अनेक रत्नीं खचित मुगुट दिसत प्रगट सुप्रभा । मकरकुंडलें श्रवणीं बाणलिं गंडस्थळीं सुशोभा ॥ ५ ॥ चांचर कुरुळे शोभत निढळीं देखतां मावळे देखणें । रूप सांवळें दृश्या वेगळें देखोनियां डोळे वेधले ॥ ६ ॥ चरणीं वांकि तोडर अंदु देखोनि आनंदु यादवा । पाहे सर्वांगीं दक्षिणांगीं श्रीवत्स जगीं माधवा ॥ ७ ॥ अद्भुत बाळक देखोनि ऐसें ज्ञान कैसें जनका । रमावल्लभ दासां सुलभ देवां दुर्लभ पहाया ॥ ८ ॥

(श्लोक) तमद्भुतं बालकमम्बुजेक्षणं चतुर्भुजं शंखगदाद्युदायुधम् । श्रीवत्सलक्ष्मं गलशोभिकौस्तुभं पीताम्बरं सान्द्रपयोदसौभगम् ॥ १ ॥ महार्हवैदूर्यकिरीटकुण्डलत्विषा परिष्वक्तसहस्रकुन्तलम् । उद्दामकाञ्च्यङ्गदकङ्कणादिभिर्विरोचमानं वसुदेव ऐक्षत ॥ २ ॥

(प्रबंध १७६– वसुदेवप्रार्थना; राग–झिंजोट, ताल–त्रिवट.)

श्रीकृष्णउद्भव देखे वसुदेव अष्टभावें दाटत । अंजुलीपुट जोडुनी निकट[1] उभा प्रगट स्तवित ॥ १ ॥ त्राहि पूर्ण त्राहि पूर्ण त्राहि पूर्ण चिन्मया । अनुभव तुझा सांगण्या दूजा नुरेचि सहज तन्मया ॥ ध्रु० ॥ तूं सकळ हासि सकळ नव्हासि सकळ दाविसि आपण । तूं सकळिं सकळ सकळिं अकळ पाहतां विकळ पाहणें ॥ २ ॥ तूं जगत्सृजन[2] जगत्पाळण जगत्हाळण प्रळयो । जगत्सुंदर जगत्नागर जगतआगर आपण ॥ ३ ॥ तूंचि आकार तूंचि विकार निराकार तोहि तूं । तूंचि सगुण तूंचि निर्गुण परिपूर्ण तोहि तूं ॥ ४ ॥ तूं आदिकारण कारणातीत मौन दावित वेद वो । चाउडलासी[3] देखिलासी गर्भवासी ह्मणूं नये ॥ ५ ॥ तुजविण दुसरें नाहीं साचारें हेंहिं नुरे गा बोलाया । असिसि जैसा अस तूं तैसा करूं परेशा दास्यत्व ॥ ६ ॥ सिंधुलहरी सिंधुमाझारीं तैसें परि हें भजन । द्वैतभाव सर्वथैव नसोनि भाव दाविसी ॥ ७ ॥ तूंचि लाघवी भक्त वैभवीं दाविसि बरवी भक्ति ही । रमावल्लभदास सहसें आणिक दूजें ध्याति ना ॥ ८ ॥

(प्रबंध १७७–देवकीप्रार्थना: राग–काफी, ताल–त्रिवट.)

श्रीकृष्णउद्भव देखोनि तटस्थ पाहे देवकी । ऐसा पुत्र कोणा गे आहे या त्रैलोकीं । दुष्ट कंस तो येवोनि झणीं या अवलोकीं । सांवरूनि वसनें[4] लाहेलांहें[5] पैं झांकी ॥ १ ॥ नवल माये लेंकरूं कैसें दिसे साजिरें । प्रकाश याचा पाहतां कांहीं केल्या नावरे ।

---

१ जवळ. २ जगाची उत्पत्ति–स्थिति–लय. ३ आवडलास. ४ वस्त्रानें. ५ लवकर लवकर.

जें जें झांकूं जाईजे तें तें तदाकार । काय करूं गे साजणि लपवाया नाहीं थार ॥ ध्रु० ॥ मज गे ऐसें वाटतें हें हृदयिं असों द्यावें । होईल मग तें होऊं दे परि जीवें न विसंबावें । असें देव करो गे कंसें नायिकावें । ऐसें बोलत देवकी तंव अद्भुत देखे वैभव ॥ नवल० ॥ २ ॥ पूर्ण ब्रह्म तूं एकचि तुज काय भय शंका । तुझ्या पायांवेगळें काळभय या लोकां । पुत्रपणाचे सोहळे दावीं जगत्रयव्यापका । दिव्य रूप हें आवरीं मनुष्यबाळ हो कां ॥ नवल० ॥ ३ ॥ झाडा तिहीं जन्मींचा मातेसी दावुनी पहा पां । सर्वेचि माया वाळुनी धरी प्राकृत रूपा । पूर्विंच श्रुत यादवजनका भग्न तरी व्रजा न्या पां । देवकी ह्मणे ऐक पां वेगीं काडिये द्या पां ॥ नवल० ॥ ४ ॥ विलंब नको आतां हो गोकुळिं नेउनि घाला । अमूप पीतांबरें गुंडोनि वोसंगें घेता झाला । माता नवस करिते देव रक्षो गे या बाळा । रमावल्लभदास ह्मणे पाहा पाहा कैसी लीला ॥ नवल० ॥ ५ ॥

( सूचना—उपासकानें डोक्यास पीतांबर वगैरे बांधून कपाळावर कुंकुमाचें नाम करून मोठ्या ताटांत उत्सवमूर्ति ठेवून बाहेर आणून पुढील पदाच्या अर्थाप्रमाणें वसुदेवाची गोकुळास जाण्याची बतावणी दाखवावी. )

( प्रबंध १७८ ; राग—चैनाट, ताल—दीपचंदी. )

वसुदेवें श्रीकृष्णमूर्ति हातिं घेतली ॥ पायींची सांकळ तूटली। अर्गळां कुलूप निघोनि गेलीं । वाट मोकळी झाली ॥ १ ॥ गोकुळा नेतो, वसुदेव गोकुळा नेत । कृष्णप्रभा फांके तेणें अंधकारासि घात ॥ ध्रु० ॥ तंव सळसळां मेघ वाजे ॥ शेषें धांवत येईजे । छत्र ऐसें सहस्रफणा, कृष्णावरी पैं धरिजे ॥ २ ॥ शोभतो देखा वसुदेव शोभतो देखा ॥ पुष्पवृष्टि देव करिती देखोनि बाळकवेखा ॥ ध्रु० ॥ भयानक यमुनाजल ॥ उदक रानोमाळ । गोकुळवाट न कळे, वसुदेव तेथें व्याकुळ

१ मांडीवर. २ अडसर, अडणा. ३ वेषाला. ४ चोहींकडे.

॥ ३ ॥ करावें काय आतां देवा करावें काय ॥ जिकडे तिकडे उदक झालें, कोण सांगाया आहे ॥ ध्रु० ॥ ऐसी चिंता करी हृदयीं ॥ यमुनाजल दोंही ठायीं । जैसा रामें सेतु बांधला । तैसी वरी आली भूई ॥ ४ ॥ चालत जात दड दड चालत जात ॥ गोकुळ योगनिद्रें मोहिलें । यशोदे पैं ठेवी सुत ॥ ध्रु० ॥ कन्या घेऊनि आला घरा ॥ नेणों कोण ऐसा पूरा । योगमाया टाहो फोडी , कंस करितो पैं त्वरा ॥ ५ ॥ धांवत आला कंस तो धांवत आला ॥ उफराटी धरूनि बाला, आपटाया घेउनि गेला ॥ ध्रु० ॥ कन्या आपटी ते वेळीं ॥ ती हो गेली अंतराळीं। तुझा वैरी अन्य स्थळीं, वायां त्वां मारिलीं बाळीं ॥ ६ ॥ बाळकरूपें वैरि तो बाळकरूपें ॥ ब्रह्मादिकां न कळे थोरी जाणासि कैसें तूं सोपें ॥ ध्रु० ॥ ऐकोनि कंसें दैत्य बोलाविले ॥ बाळां मारूं आरंभिलें । रमावल्लभदास ह्मणे । गोकुळीं कैसें वर्तलें ॥ ७ ॥ यशोदा पाहे, जागी झाली यशोदा पाहे ॥ कुमारी टाळ वाजविती, आनंद न समाये ॥ ध्रु० ॥ ॥

( येथें श्रीकृष्णमूर्ति डोलाऱ्यांत ठेवल्यानंतर नैवेद्य करून खालील आरति करावी. )

( प्र० १७९–आरति. ) चरणकमल ज्याचें अति सकुमार । ध्वजवज्रांकुश ब्रीदाचा तोडर ॥ १ ॥ ओंवाळूं आरति मदनगोपाळा । श्यामसुंदर गळां वैजयंती माळा ॥ ध्रु० ॥ नाभीकमळ ज्याचें ब्रह्मयाचें स्थान । हृदयीं पदक शोभे श्रीवत्सलांछन ॥ ओंवाळूं० ॥ २ ॥ श्रीमुखकमळ पहातां सुखाचिया कोटी । वेधलें मानस हारपली दृष्टी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देखियलें रूप । रूप पहातां अवघें जहालें तद्रूप ॥ ओं० ॥ ४ ॥

( प्र० १८०–बाळंतविडा. ) श्रावणमास वद्य अष्टमी रजनीमधें आराम । रसिक बाळ गोकुळपाळ जगत्रजीवन ॥ घनश्याम प्रगट ॥ १ ॥ आजि आनंद हो । महा मंगळ आनंद ॥

नंदानंद प्रगट, प्रीतिकंद प्रगट ॥ ध्रु० ॥ जन्म समस्त ऐकोनि गोपी, उंदित[1] पाहायालागीं । सती जसवन्ती पुत्रवन्ती, न गणे सोहळा भारी ॥ नारीलागीं[2] प्रगट ॥ आजि० ॥ २ ॥ त्वरित जडित तडितें अंगना, वस्त्रें विचित्रें[3] घेती । बहूमोलें रुचि अमोलें, सार[4] विचारलाटे ॥ चाटेचे येती प्रगट ॥ आजि० ॥ ३ ॥ सुगंध चीकसा[5] सतेज आरसा मुखकमळें उटितात ; अंजन रंजन खंजनडोळा चपळा लावण्यखाणी ॥ आणितात प्रगट ॥ ४ ॥ कुंकुम पिंजरीं[7] सुंदर टिकरी[6] मिश्रितकेशर भाळीं । तटतटित कंचुकि सघन कुच शोभत लोभित लेणें ॥ तेणें ढाळ[8] प्रगट ॥ ५ ॥ जडित तबकीं घडी त्यामाजीं आहेर इतर संभार । युवति घेती सगुण बुंथी[9] काप पातळ पुढें ॥ चुडे सार प्रगट ॥ ६ ॥ कर्णीं कुंडलें हृदयीं पदकें गजगति चालति धीट । चळत सुमनें गळत गमनें, पल्लव करितां बरें ॥ करें नीट प्रगट ॥ ७ ॥ पाहतां बाहतां एकमेकींतें दिसत लखलखाट । वाजत गाजत राजत ऐसा बाळक पाहाया येती । गोपि थाट प्रगट ॥ ८ ॥ खचित रचित नभीं विमानें मंडप तोचि अपार । गद्यें पद्यें सुरस वाद्यें किन्नर किन्नरी गाती । अति सार प्रगट ॥ ९ ॥ वैकुंठ कैलास अमरपुरीं परम हरिख न समाये । विद्याधर विद्याधरी नृत्य सकळ करिती जनीं । वनमाळी प्रगट ॥ १० ॥ सर्व गोप आणि गोपराणी मंडित सभास्थानीं । दिव्य सुमनें सिद्धमुनिजनीं वर्षोनी धरुनी हातीं ॥ पाहे कान्हा प्रगट ॥ ११ ॥ सुंदर गाये सुंदर ध्याये आणिक प्रेम न समावे । ईडा पीडा घेवोनि बैसाति चित्त चोरित मुख ॥ दुःख जाय प्रगट ॥ १२ ॥ शोभत सुंदरिसहित बाळ हरि मुक्तशेस भरिति द्विजबाळी । सहस्रशीर्षा परमपुरुषा अक्षता

---

१ उत्कंठित. २ लागलीच ३ नाना प्रकारच्या आवडीचे. ४ मुख्य विचाराच्या लहरीप्रमाणें. ५ चोळखण विकणारें. ६ तीट ( बाभळीच्या शेंगापासून करितात. ) ७ कुंकवाची पूड. ८ ( कुचाचा ) अवनत भाग, शोभा. ९ आच्छादन ( ओढणी. )

लाविति भाळीं ॥ गोपराणी प्रगट ॥ १३ ॥ पूर्णासि आंगुलें लेववीलें अहेर वाहिले पाहीं । याचक मागध अमर सर्व धाले मागणें खुंटलें । लुलू नाहीं प्रगट ॥ १४ ॥ धन्य तें गोकुळ धन्य यशोदा पवित्र जननी हरिलागीं ॥ श्रीरमावल्लभदास धन्य त्याच्या कीर्तनें होत शमन ॥ अनुरागें प्रगट ॥ १५ ॥

( प्र० १८१—पूतनाशोषण. ) पूर्णब्रह्म हें अनुपम्य, गोकूळीं अवतरलें । कंसा भय त्याचें थोर हृदयीं भरलें । पूतनेला विडा दिधला विषें स्तन भरिले । रूप सुंदर धरुनि अपार नंदगृह ते ठाकिले ॥ १ ॥ यशोदे तुझें गे तान्हुलें । अभिनव म्यां देखिलें । यशोदे तुझें० । ऐसें कोठें नाहीं झालें । य० । पाहिजे हृदयीं धरिलें । य० । देई मज पैं वहिलें । य० । देखुनि वांझ मी पान्हेलें । य० । पाहिजे निंबलोण केलें । य० । कैसें पाहा तें गुलगुलें ॥ यशोदे० ॥ ध्रु० ॥ १ ॥ देखोनियां पूतना बाळें मांडिलें रुदन । यशोदा समजावी परि तो न राहे जगज्जीवन । मग त्या पापिणिपाशीं तिणें दिधलेंसे आणून । स्तनिं लावितांचि आकर्षिले पंचही प्राण ॥ २ ॥ बाळा सोडिं रे क्षणभरी । मीच जातें बाहेरि । बाळा० । कैसा झोंबलासि जिव्हारीं । बा० । तान्हें नव्हेस तूं निर्धारीं । बा० । आतां कैंची माझी उरी । बा० । तिडका उठल्या माझे शिरीं । बा० । यशोदे धांव गे बाहेरीं । कैशा वांचल्या त्या नारी ॥ बाळा सोडि० ॥ ध्रु० ॥ २ ॥ आक्रंदे आरोळ्या कैसें डोकें पैं आपटी । झाड झाडुनि सांडी परि ते न सुटे कृष्णमीठी । वाढली दीड गांव मग पसरली ती मोठी । गर्जना ऐकोनि यशोदा आली उठाऊठी ॥ ३ ॥ अगाई काय बाळा झालें । कैसें अरिष्ट उदेलें । अगई० । माझ्या तान्हूल्या विसंबलें । अ० । इसीं सुकुमार देखिलें । अ० । केव्हढें धूड गे पसरलें । अ० । लेंकरूं नाहीं कीं दुखवलें । अ० ।

मज काय मोहन पडलें । अ० । अंग तोंड रक्तें भरलें । अ० । पिलें नसेल कीं भ्यालें । अ० । ह्मातारपणीं देवें दिल्हें । अगई० । ॥ ध्रु० ॥ ३ ॥ तत्क्षणीं उचलूनी घेत असे माता । ब्रह्मग्रहो इशीं पहा नेणों लागला होता । वडिलाचें पुण्य साचें वांचलें बाळ आतां । थान न घे काय करूं गे बरवें न वाटे चित्ता ॥ ४ ॥ गौळणि ह्मणती धीरु धीरु । यशोदे सांडूं नको धीरु । गवळणी० । गजबज नको थोरु । ग० । यासि रक्षा आह्मी करूं । ग० । व्यर्थ शोक नको करूं । ग० । तुझें उमजवूं लेंकरूं । बरें करील शंकरू । ग० । थान घेईल चुरुचुरू । गवळणी ॥ ध्रु० ॥ ४ ॥ वृद्ध गौळणी पाय धुवोनी सर्व भरिती चूळ । न्यास आपणा केले जाणा स्मरति बीज मूळ । अजन्मा या रक्षा करिति बाया वेळोवेळ । त्याची त्यासी रक्षा कैसी होतसे अकळ ॥ ५ ॥ रक्षा करा गे मनोभावें । मज पुत्रदान द्यावें । र० । बाळक उमजेसें करावें । र० । एकदांचें हो बरवें । रक्षा० ॥ ध्रु० ॥ ५ ॥ निशाचरी महाखेचरी बाळक होतें तिच्या हातीं । तयालागीं अतिवेगीं रक्षा करूं गे निगूतीं । डाकिन्यादि भूतें टाळूं विष्णु-नाम घेती । हें ओंनाम सार परम यशोदे न करी खंती ॥ ६ ॥ एक विष्णुनाम टाळू कुष्मांडादि भूतमेळु । एक० । बाळग्रह हे सकळु । एक० । प्रेत पिशाच बरळु । एक० । कोठारा रेवति गोंदळु । एक० । ज्येष्ठ पूतना मातृकादळु । एक० । सर्वां अरिष्टां हो पळु । एक० ॥ ध्रु० ॥ ६ ॥ कृष्णमाया नकळे तयां परि धन्य त्या गौळणी । अगोचर वेदां थोर तो दृश्य त्यांलागुनी । आपेंआप मानुनियां स्तन पाहे घांगसूनी । हारिख झाला समस्तांला श्रीमुख पाहे जननी ॥ ७ ॥ आतां मोकळा गे नंदन । शीत टाकी ओवाळुन । आतां० । दोंही करीं धरी स्तन । आ० । व्यग्र होऊं नेदी मन ॥ आतां० ॥ ध्रु० ॥ ७ ॥ अनंत ब्रह्मांड ज्यामाजीं तो वोसंगा शोभत । स्तनपान करूनि

तृप्ती ढेंकरु तो देत । बा तुज अमृत हो मग माता यशोदा ह्मणत । निद्रेंत सावध तो कृष्ण डोळे पैं लावीत ॥ ८ ॥ बाळा नीज रे तान्हया । ह्मणे जिवलगा माझेया । बा० । सुखें हालविते माया । बा० । तुजाविण जातें वायां ॥ बाळा० ॥ ध्रु० ॥ ८ ॥ सकळ हें कौतुक पाहताती देव । गौळियांचें पुण्य साचें न कळे न कळे सर्व । आनंदरूप या समीप खेळे नवलाव । रमावल्लभ दास्येंविण कळों नेदी माव ॥ ९ ॥ कृष्ण भावाचें आंदणें आन न पाहे जाणणें । कृ० । आपला होय भक्तीगुणें । कृ० । रमावल्लभदास ह्मणे ॥ कृष्ण० ॥ ध्रु० ॥ ९ ॥ श्रीः ॥

( सूचना—उपासकानें लहान ताटांत भस्म घेऊन डोलाऱ्यांतील मूर्तीसमोर उभें राहून पुढील पदाच्या क्रमानें न्यासयुक्त रक्षा करावी. हें रक्षाभस्म जमलेल्या लोकांस त्या वेळीं लावून उत्सव संपूर्ण झाल्यानंतर महामंगलप्रसादासमेत बाहेर गांवच्या भगवद्भक्त आप्तइष्टमित्रांस पत्रांतून रवाना करावें. )

( प्र० १८२—बालरक्षा. ) सर्वां रक्षी हा श्रीपति । त्यासी रक्षा गोपी करिती ॥ ध्रु० ॥ कृष्णा रक्षावे निरुतें । ' अजु ' अव्यय पायातें । ' मणिमान ' पैं जानूतें । ' यज्ञ ' नाम पैं मांड्यांतें । कटितटि पैं ' अच्युतें ' । ' हयग्रीव ' जठरातें । ' केशव ' नाम हृदयातें । ' ईश ' समर्थ पोटातें । ' सूर्य ' नाम पैं कंठातें । ' विष्णु ' व्यापक भुजातें । ' उरुक्रम ' पैं मुखातें । मुख्य ' ईश्वर ' शिरातें ॥ १ ॥ ऐसा अंगन्यास झाला । दिशान्यास आरंभिला ॥ ध्रु० ॥ १ ॥ कृष्णा रक्षूं[1] पैं निवाडें । ' चक्रधरु ' असो पुढें । ' गदाधरु ' पाठीकडे । ' धनुर्धरु ' कुशीकडे । ' मधुहंता ' दक्षिणेकडे । ' खड्गी ' वामकुक्षीकडे ॥ २ ॥ चतुःकोनी पैं स्थापना । गौळणी करि पैं रक्षणा ॥ ध्रु० ॥ २ ॥ कृष्णा रक्षूं निरंतर । ' उरगाय ' दृष्टिसमोर । ' उपेंद्र ' ऊर्ध्व साचार । ' तार्क्ष्य ' अध गंभीर । सभोंवतां

१ रक्षण करो.

' हलधर ' ॥ ३ ॥ बाह्य रक्षा हे व्यापकासी । अन्तररक्षा ह नित्यासी ॥ ध्रु० ॥ ३ ॥ कृष्णा रक्षूं पैं निरुतें । ' हृषीकेश ' इंद्रियांतें । ' नारायण ' पैं प्राणातें । ' श्वेतद्वीपवासी ' चित्तातें । ' योगेश्वर ' तो मनातें । ' पृश्निगर्भ ' हा बुद्धीतें । ' भगवान पर ' अहंकारातें । ' गोविंद ' हर्षे खेळे तेथें । ' माधव ' निद्रित तेथें । ' वैकुंठ ' चालतो तेथें । ' श्रीपति ' बैसला तेथें । ' यज्ञभोक्ता ' जेवी तेथें ॥ ४ ॥ अंतरबाह्य रक्षा[1] जाहली । विष्णुनामें भूतावळी ॥ ध्रु ॥ ' विष्णु विष्णु ' जप ज्यासी । भूतबाधा नाहीं त्यासी । सर्व ग्रहा सुटे कंप । भूतां पळतां लागे धाप । नाहीं झालीं आपेंआप ॥ रमावल्लभदास ह्मणे । रक्षा येणें बाळां करणें ॥ ५ ॥ धरा धरा हा विश्वास । विकल्प धरी त्यास दोष । कृष्ण साह्य आहे यास । रक्षा फळेल भाविकांस । ह्मणे रमावल्लभदास ॥ धरा० ॥ ६ ॥ श्रीः ॥ ॥ ॥

(प्र० १८३–विश्वकर्मा. ) नंदा नंदन झाला हो ऐकिला । विश्वकर्मा[2] आनंदें धांवला ॥ दर्शनलाभ हृदयीं भाविला । पाळख[3] तेणें उचित आणिला ॥ १ ॥ बरवा बरवा पाळणा आणिला । यशोदे आह्मां न वचे वानिला ॥ सुवर्णपटें सूत्रें वो विणीला । कृष्ण-बाळाजोगा हा पाहिला ॥ ध्रु० ॥ कमळें पट्टियांसी सोड-विलीं । ठायींठायीं रत्नें हो जडलीं ॥ मांचव्यासी कडी हो लाविली । हिरेयांची नीळ हो रोंविलीं ॥ २ ॥ जडित रूपें-याचिया सांखळा । आंकडद्या कडद्या गांठीं हो पडल्या ॥ कवण कूसरीनें हो घडिल्या । देखतां दृष्टी आमुच्या जडल्या ॥ ॥ ३ ॥ चहूं कोनी पाळण्याच्या माये । पुतळ्या[4] नेणों बोल-तील काये ॥ हालवितां सूत्रीं लक्ष्य जाये । देखतां मन आमुचें वो धाये[5] ॥ ४ ॥ सुतार ह्मणे उचित[6] नेघे वो । एक

---

१ राखणें. २ देवाचा सुतार. ३ पाळणा. ४ बाहुल्या. ५ तृप्त होतें. ६ बाक्षिस.

कृष्ण दाखवा वेगें हो ॥ रमावल्लभदास हा सांगे वो । ह्मणे यासि काांहीं तूं मागें हो ॥ येरु ह्मणे मागणें खुंटलें । डोळां कृष्णरूप हें देखिलें ॥ ५ ॥ श्रीः ॥ ॥ ॥ ॥

( प्र० १८४-**पाळणा.** ) बहु सोहळा पाळणा लाविला । वरी खेळण्या कळशू दाविला । सहकुमरें नंदवधु पातल्या । नामग्रहण-विनोद भाविला ॥ १ ॥ ठायीं हालत पाळणा साजिरा । माजिं नंदजीचा नंदनु गोजिरा । गौळणि जसवंति गाताती बऱ्या । करी अभिनव आनंदु माजिरा ॥ ध्रु० ॥ कड्या किंकिणि किणिकिणि वाजती । गोपी कंकणें सुंदर गाजती ॥ धन्य बाळकपद लेणें बोलती । तेणें अनुहात ध्वनी लाजती ॥ २ ॥ बाळ पाळण्यांत हूंहूं करितें । वरी खेळण्या कळसु धरितें ॥ सर्व कौतुक अबला पहाती । दाटे सप्रेम आनंद भरितें ॥ ३ ॥ अन्य बाळका सोहळा करिजे । परी विचार तेणें तो नेणिजे ॥ हा तो सर्वज्ञ लाघवी नटला । सर्व उत्सव येणें हो जाणिला ॥ ४ ॥ श्याम तान्हुलें याचकीं पाहिलें । सर्व मागणें त्यांचें कीं राहिलें ॥ रमावल्लभदासासि येथूनी । जाणे नवचे पाळणा सोडूनी ॥ ५ ॥

(प्र० १८५-**हल्लरगीत.**) श्रवण गायी[2] येवो, शब्दचारा[3] घेवो । याचें दूध देवो, कृष्णबाळा ॥ १ ॥ जो बाळा जो कृष्णबाळा ॥ जो बाळा जो कृष्णबाळा ॥ ध्रु० ॥ नयन गायी येवो, रूपचारा घेवो । याचें दूध देवो, कृष्णबाळा ॥ २ ॥ नासिक गायी येवो, गंधचारा घेवो । याचें दूध देवो, कृष्णबाळा ॥ ३ ॥ रसना गायी येवो, रसचारा घेवो । याचें दूध देवो, कृष्णबाळा ॥४॥ त्वचा गायी येवो, स्पर्शचारा घेवो । याचें दूध देवो, कृष्ण-बाळा ॥ ५ ॥ मानस गायी येवो, मौनचारा घेवो । याचें

---

१ (पा. भे.) 'अमर' 'आबाळ.' २ इंद्रिय रूपी गाय.

* दूध देवो, कृष्णबाळा ॥ ६ ॥ पंचज्ञानमया, पंचकर्म[2] तया अकरावी कान्हया, आवडते ॥ ७ ॥ ऐसा हो गायिला, यशोदेनें सांवळा । रमावल्लभदास, झाला तेणें सुखी ॥ ८ ॥ श्रीः॥

सूचना-(१) येथें प्रथम प्रकरणांतील भाटाचीं ६ कवित्वें " धन्य गौळिराजनंद " पासून " सरी टांक नख कंठी " पर्यंत भाटाचा वेष आणून ह्मणवावीं.

---

सूचना-( २ ) जन्मकथेच्या दिवशीं धूपारति दाखवायाचे पूर्वी " गुरुकृपा अंबे " ह्मणून भजन ह्मणावें. मग पुनः " गुरुकृपा अंबे " येथून " माझी कान्हाई जगदंबे " येथपर्यंत विलोमरीत्या ह्मणून मग धूपारती इत्यादि पुढील क्रम चालवावा.

## प्रकरण ११ वें:—बाळसंतोष.

( प्र० १८६ ) आह्मी परात्पर परदेशी । कोणी नोळखती आह्मांसी । टाकुनि आलों संतांपाशीं । वेगीं देई निज सेवेसी ॥१॥ बाबा बाळसंतोष । बाळसंतोष, बाबा बाळसंतोष ॥ध्रु०॥ दों हातांचें द्वैत दान । बा० । नेघे कोरडें कोरान्न । बा० । नुमगें नुमगें हें साधन । बा० । अवीट न विटे तें देई परमान्न ॥ बाबा० ॥ २ ॥ क्षीरसागरींची क्षीरधारी । बा० । विवेक गुळाची गुळवरी । बा० । पूर्ण परिपूर्ण देई पुरी । बा० । प्रबोध लाडू तयावरी ॥ बाबा० ॥ ३ ॥ जीर्ण स्वरूपाचा शेला । बा० । कृपेनें दे कां मजला । बा० । शुद्धसत्वें निर्वाळला । बा० । ज्ञानबोधें उपार्जिला ॥ बाबा० ॥ ४ ॥ नवखंडें खंडिलीं । बा० । जीवशिवेंविण शिविलीं । बा० । द्यावी भक्तीची कांचोळी । बा० । अंगीं जीर्णत्वें बाणली ॥ बाबा० ॥ ५ ॥ मोह ममता बिरडें फोडीं । बा० । शुद्ध सत्वाची गांठ सोडीं । बा० । त्रिगुणाची कसणी तोडीं । बा० । जुनी कांचोळी देई रोकडी ॥ बाबा० ॥ ६ ॥ पंचतत्त्वाचें आंगुलें । बा० ।

---

१ विषयरूपी चारा ( भक्ष्य ) २ पंच ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें. * ( पा. भे. ) मननचारा .

विषय भोगितां विटलें । बा० । वासनाकसा जें तुटलें । बा० । तें मज देईं कां वहिलें ॥ बाबा० ॥ ७ ॥ प्रपंच भोग गेले भंगीं । बा० । ते दे कां अंगिचीं अंगीं । बा० । यालागीं नाचतसे रंगीं । बा० । रंगीं रंगलों श्रीरंगीं ॥ बाबा० ॥ ८ ॥ दान देतां धन न सरे । बा० । जो घे त्याचें दरिद्र विरे । बा० । मग तें मागणें वोसरे । बा० । ऐसें धन दे कां निर्धारें ॥ बाबा० ॥ ॥ ९ ॥ नाहीं नाहीं ह्मणसी कां येथें । बा० । आहे परिपूर्ण भरितें । बा० । मी तो ज्ञानाचा क्षुधित । बा० । अर्थें करी कां समर्थ ॥ बाबा० ॥ १० ॥ एका जनार्दनीं मागे दान । बा० । थितें नेलें जीवपण । बा० । शेखीं वेंची शिवपण । बा० । केलें निजसुखसंपन्न ॥ बाबा० ॥ ११ ॥ श्रीः ॥

( प्र० १८७ ) आह्मी परात्पर भिकारी । बाबा० । वेगें आलों संताद्वारीं । बा० । द्या मज भक्तीची भाकरी । बा० । ह्मणोनि नाचतों नामगजरीं ॥ बाबा बाळसंतोष ॥ ध्रु० ॥ युगें अठ्ठाविसांचा जोगी । बा० । विभूति चर्चित सर्वांगीं । बा० । गळां अनुपम सैली शिंगी । बा० । वाजवी सोहं शब्द जगीं ॥ बाबा० ॥ २ ॥ त्राहि त्राहि त्राहि । बा० । हें तों नुमगे मी कांहीं । बा० । एका जनार्दनाचे पायीं । बा० । काया वाचा मन राही ॥ बाबा० ॥ ३ ॥ श्रीः ॥ ॥ ॥

( प्र० १८८ ) नमो ॐकार गणेश । परा वाचे शारदेस । कुळदेवी सांवळेस । संतचरणीं नमन साधुचरणीं नमन ॥ १ ॥ गुरु सकळांचा राणा । काय वानूं त्या सुजाणा । केलें उच्छिष्टसेवना । ठाव मुक्तीचा गाईन । ठाव भुक्तीचा गाईन ॥ २ ॥ देह पंचक्रोश काशी । नाम घेतां पाप नाशी । पहा तारक जगासी । महाविवेक-चतुर । पंचकोशामाजीं ॥ ३ ॥ पहिला कोश हा अन्नाचा । दुसरा कोश हा प्राणाचा । तिसरा कोश हा मनाचा । चवथा अनु-

भवाचा । होय बुद्धीचा निश्चयें ॥ ४ ॥ पांचवा आनंदाचा असे । आपण विश्वनाथ वसे । शांति पार्वती पैं दिसे । महा विवेक चतुर । भैरव क्षेत्रपाळ ॥ ५ ॥ अनुहाताचा डमर । बोध त्रिशूल घेत थोर । प्रेम नाचत चाचर । विवेक जागता जगजोगी । भैरव तीहीं लोकीं ॥ ६ ॥ बरवा रमावल्लभदास । करवा काशी-माजीं वास । धरवा भक्तांचा विश्वास । गुरुचरणींचें तीर्थ । साच भागीरथी ॥ गुरुचरणींचें तीर्थ० ॥ ७ ॥ श्रीः ॥

( प्र० १८९ ) देह पंचकोश पहा । मूर्ति रोकडीच लाहा । तारकनाम गुरु सांगे । हिंडो नको दिशा दहा ॥ ध्रु० ॥ अन्न-मय कोश हा पहिला । लघु आहार वहिला । केला आसनजय सांडून । दुसरा कोश मग राहिला ॥ १ ॥ तिसरा कोश मान-सिक । मनोभावें जो सात्विक । चवथा कोश अनुभवाचा । सर्व ब्रह्मबोध त्याचा ॥ २ ॥ पांचवा कोश आनंदमय । राहिलें येणें जाणें भय । श्रीरमावल्लभदास । नित्य स्मरतो अन्वय ॥ ३ ॥

---

## प्रकरण १२ वें--अवभृतस्नान व गोपाळकाला.

भजनः—दीनोद्धरणा यदुवीरा । गोपीसंचितघृतचोरा ॥

( प्रबंध १९०; राग—धनाश्री, ताल—आदि. )

विश्वीं विश्वातीत विश्वंभर । तो श्रीधर । भक्तकाजा धरी अवतार ॥ १ ॥ ब्रह्मानंद कंद वैकुंठनाथ । तो नंदसूत । चालिला घेऊनी दहींभात ॥ २ ॥ सृष्टि स्थिति लय कारण । तो नारायण । सवत्स गोपाळ रिघे वन ॥ ३ ॥ षड्गुणऐश्वर्य संपन्न । तो भगवान । गोपाळाचे खेळीं रममाण ॥ ४ ॥ प्रेम लावण्याचा पूतळा । तो सांवळा । गोवळ्यांचे संगें करी काला ॥ ५ ॥ पूर्ण ब्रह्माद्वय सनातन

करी विधीमोहा निरसन ॥ ६ ॥ विश्वात्मा सच्चिदानंद कृष्ण । तो जगजीवन । दास करी प्रेमें निंबलोण ॥ ७ ॥

( प्र० १९१ ) उठोनि एके दिनीं ह्मणे यशोदा कान्हया । गोधनें घेउनियां जाई वनासि लवलाह्या ॥ १ ॥ सवें मिळाले तये वेळीं चिमणे संवगडी । सिदोरि काठी कांबळि जाळीं घेती आवडीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं गाई सोडिल्या साऱ्या । राम कृष्ण संवगाडिया देव येती पहाया ॥ ३ ॥ श्रीः ॥ ॥

( प्र० १९२ ) घेऊनी गोधनें जाती यमुनेतटीं । नानापरी खेळ खेळताती जगजेठी ॥ १ ॥ मिळवूनी गोपाळ मध्यें खेळे कान्हा । नकळेचि महिमान ऐसा यादवांचा राणा ॥ २ ॥ नाना-परीचे खेळ खेळती गोपाळ । नाचती गदारोळ मिळोनि सकळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं खेळे मदनपुतळा । नंदरायाचा कुमरु ह्मणती सांवळा ॥ ४ ॥

† ( प्र० १९३ ) देखिला नंदाचा कान्हा । मांडिलें त्रिभंगी ठाणा । वेणू वाजवी रुणझुणा । वृंदावनीं साजणी ॥ १ ॥ गायी पक्षी वनचरें । लुब्ध झालीं तेणें स्वरें । मन माझें एकसरें । वेधलें हो साजणी ॥ २ ॥ आणिक नवल हें पाहे । वाजवितां वारा राहे । रविशशि अंबर हे । स्थिर झाले साजणी ॥ ३ ॥ चर तीं अचर जाहलीं । अचर तीं चर ठालीं । सांगतां नये बोलीं । ब्रह्मादिकां साजणी ॥ ४ ॥ पहात स्वरूप ययाचें । दास रमावल्लभाचें । निरंतर गात वाचें । नाम याचें साजणी ॥ ५ ॥

( श्लोक. ) श्यामं हिरण्यपरिधिं वनमाल्यबर्ह—धातु-
प्रवालनटवेष मनुव्रतांसे । विन्यस्तहस्तमितरेण धुना-
नमब्जं कर्णोत्पलालककपोलमुखाब्जहासम् ॥ १ ॥

१ तिरसा-श्रीकृष्ण जरासे तिरसे होते. २ आरोळ्या. † यांत अभ्यासाची खूण आहे.

(प्र० १९४) यमुनेच्या तटोतटीं । नटतो नटोनटीं । तोचि पाहे सर्व घटीं । सबाह्य अंतरीं ॥ १ ॥ श्याम हिरण्य-परिध । वनमाळा बरव्या सिद्ध । धातुप्रवाळ प्रसिद्ध । काय वानूं उत्तरीं ॥ २ ॥ मुख कमळ हांसत पाहे । गंडमंडित दिसताहे । सुख समाधीचें राहे । लाजूनियां तेथ रे ॥ ३ ॥ नट-वेष मिरावित । वेंठि[1] तरूची खोंवित । खांदीं सखयाचे ठेवित । डावा हात कूसरीं ॥ ४ ॥ सव्य करें अब्ज फिरवी । कानावरी कळिया मिरवी । तुळसी आंळकी[2] बरवी । शोभा शोभे केशरी[3]॥ ॥ ५ ॥ गायीगोपाळसहित । खेळताती गुणरहित । रमावल्लभ दासा हित । त्यासि गातां आवडीं ॥ ६ ॥

(प्र० १९५–पद चेंडूचें) सहज तो चेंडू समान फळी । झेलूं जाणे तो खेळिया बळी ॥ १ ॥ झेला रे भाईनो झेला रे । सद्गुरुवचनें झेला रे ॥ ध्रु० ॥ अवघे गडी समान रहा । येतां यांवा सावध पहा ॥ २ ॥ सुटे सुटे तंव सरिसाचि[5] पाहे । लक्ष्य जाणे तो माघारा नव्हे ॥ ३ ॥ गडियानें गडियाची न धरावी आस[6] । आपुलिया बळें घालावी कांस ॥ ४ ॥ अभि-माना चढे तो बाहेरीं पडे । हातिंचें जाय मग उगलाचि रडे ॥ ॥ ५ ॥ एका जनार्दनीं एकेंचि बोलीं । भावार्थी तो सद्गुरु वचनें झेली ॥ ६ ॥ ॥ श्रीः ॥ ॥ ॥ ॥

(प्र० १९६–भोंवऱ्याचें पद) कान्हो ह्मणे वडजा पोरा । भोंवरा खेळे रे बरा ॥ १ ॥ खेळा रे भाईनो खेळा रे। भोंवडी आहे तंव खेळा रे ॥ ध्रु० ॥ चौऱ्याशीं लक्ष योनींचा भोंवरा । त्यासि गुंडोनि संचिताचा दोरा रे ॥ २ ॥ जोंवरी आहे भोंवडी । तोंवरी खेळाची उडी रे ॥ ३ ॥ वडजा ह्मणे हा खेळ नलगे आह्मां । निरंतर देईं गा तुझा प्रेमा रे ॥४॥ गुरुकृपें भोंवडी निवांत राहे । तंव राघव तटस्थ होय रे ॥ ५ ॥ श्रीः ॥

---

१ डहाळी. २ कोमल. ३ तुळसी मंजरीची. ४ आगमन. ५ जवळ. ६ आशा.

( प्र० १९७–पद बिजलीचें ) बिजली खेळे हरि[1]। स्वानंद परोपरी ॥ ध्रु० ॥ आवरण सप्त देहीं । तींचि घरें पाहीं ॥ १ ॥ प्रबोधशिळा टाकीं । सातही द्वारें जिंकीं ॥ २ ॥ अनंत खेळ खेळे । तो राघवदासीं मिळे ॥ ३ ॥

( प्र० १९८–पद हुतुतूचें ) हुतूतू हुतूतू खेळे । तेणें द्वैताद्वैत पळे ॥ ध्रु० ॥ जीवशिव भाव मुरे जेव्हां । जिंकिला डाव तेव्हां ॥ १ ॥ ऐसा हुतूतू खेळ पाहीं । खेळतो शेषशायी ॥ २ ॥ स्वानंद डाव मिळे । राघव तेथें गळे ॥ ३ ॥

( प्र० १९९–पद वावडीचें ) लक्ष्यालक्ष्य ते वावडी । सूत्राविणें खेळे गाढी ॥ १ ॥ खेळों या गडी रे । ब्रह्म वावडी रे ॥ ध्रु० ॥ नित्य शुद्ध निराभास । चिदंबरीं क्रीडे सावकाश ॥ २ ॥ सद्गुरुकृपा निजबळें । राघव ऐसी वावडी खेळे ॥ ३ ॥

( प्र० २००–पद लपंडाईचें ) कृष्णा खेळूं लपंडाई । अनंत लोचन तुझिया देहीं । डोळे झांकणें ते कवणे ठायीं । तुझें सर्वांग देखणें पाहीं रे ॥ १ ॥ कान्होबा पाववि आपुली खुणा ॥ ध्रु० ॥ गिरिगव्हारीं लपूं कडेकपाटीं[2] । जेथें तेथें तुझी दृष्टी । तुझें देखणें लागलें पाठीं । तेथें सरली खेळाची गोठी रे ॥ २ ॥ लपूं ममतेच्या कडवसा[3] । तेथें तुझाचि प्रकाश ठसा । एका जनार्दनीं सरिसा । खेळ खेळुनि खुंटली आशा रे ॥ कान्होबा० ॥ ३ ॥

( प्र० २०१–संवगड्याचा प्रश्न ) एक आपुलें ह्मणिजेत रे । शेखिं तें अंतर देत रे । लोकांसंगतिं गोड वाटत । तेणें बहुत दुःख होत रे ॥ १ ॥ कान्होबा काय आहे ऐसें । आह्मां लागलें त्याचें पिसें ॥ध्रु० ॥ ( कृष्णाचें उत्तर )–तीहीं पांचीचें[4] झालें । त्याचें सौजन्य तुह्मीं केलें । गोड वाटे परि नव्हे भलें । यासि ह्मणतां[5] भय ‘ आपुलें ’ रे ॥ २ ॥ पोरांनो मजचिकडे पहा ।

१ पतंग. २ गुहेंत. ३ अंधार, पडछाया. ४ त्रिगुणपंचभूतात्मक शरीर. ५ त्या शरीरास आपुलें ह्मणताच.

मग सुख होईल महा ॥ ध्रु० ॥ ( प्रश्न )—कृष्णा तुजकडे आह्मि पाहतों । अकरा गांयींचा[1] धोका[2] येतो । त्या अनावरा वळुं जातों । तेणें बहुत दुःखी होतो रे ॥ ३ ॥ कान्होबा काय यासि करावें । तुझें तुज पैं सांगावें ॥ ध्रु० ॥ ( उत्तर )—यासि माझी कांथसवे[3] लावा । मग धांवेनात अव्हांसवा[4] । तुझी भजनगोडी लावा । पाचाराल येती तेव्हां रे ॥ ४ ॥ पोरांनो चहूंकडे कां जातां । मातें सोडूनि दुःखी होता रे ॥ ध्रु० ॥ ऐसें संवगडी समजाविले । समजोनि कान्होचे झाले । रमावल्लभें दास केले । ते सुखदुःखा मुकवले रे ॥ ५ ॥ कान्होबा तुझा संग बरा । आतां न भियों संसारा ॥ ध्रु० ॥

( प्र० २०२ ) ऐकतां वचन कान्हया ह्मणती गडी । काय खेळायाची आतां न धरूं गोडी ॥ १ ॥ लावियला चाळा त्वां जगजेठी । आतां आह्मां सागसी तूं ऐशा गोष्टी ॥ २ ॥ एका जनार्दनीं कान्होबा खेळ पुरे आतां । मांडूं रे काला आवडीं अनंता ॥ ३ ॥

( ओंव्या ) पाहुनी कल्पतरूची छाया । घडिया घालिती बैसावया । बैस ह्मणती यदुराया । करूं काला आवडीं ॥ १ ॥ पेंदा घाली पत्रावळी । वडजा सोडी मोटा जाळीं । वांकुडा बैसवी गोपाळ मंडळी । वाढिताति पत्रशाखा ॥ २ ॥

* [ नवलक्ष मित्र प्रभावळी— । मध्यें श्रीमूर्ति सांवळी । जठरीं पीतांबर कवळी । वक्रीं झळझळी तो पांवा ॥ १ ॥ शृंग वेत्र कांखेसी धरी । दहीं भात वाम करावरी । तद्युक्त लोणचीं बहु बरीं । अंगुल्यांतरीं शोभती ॥ २ ॥ तिष्ठतसे निर्गुण सगुण ।

---

१ इंद्रियांचा. २ भीति, अडथळा. ३ माझ्या सगुणरूपाची संवय—गोडी लावा. ४ इकडे तिकडे. * [ ] अशा कंसांतील ओंव्या रमावल्लभदासांच्या असून बाकीच्या एकनाथ महाराजांच्या आहेत. दोघांचे आंकडे निरनिराळे घातले आहेत.

वेष्टित सखे बोलती खूण । हांसती वर्मती संपूर्ण । एकें गुण-गुण मांडली ॥ ३ ॥ ]

( श्लोक ) अत्र भोक्तव्यमस्माभिर्दिवारूढं क्षुधार्दिताः ।
वत्साः समीपेऽपः पीत्वा चरन्तु शनकैस्तृणम् ॥ १ ॥

( प्र० २०३ ) तुझी भक्तीची चौंळ[1] बरी । आंत गोड प्रेमाशिदोरी । ती उघडुनि आह्मां चारी । जेणें तृप्ति होय झडकरी रे ॥ १ ॥ कान्होबा! नको विलंब लावूं । मग गोड गोड तुज गाऊं रे ॥ ध्रु० ॥ आह्मां साधन नलगे आन । तुझ्या शिदोरींत आहे मन । ते जेऊं घाली त्वरेन । त्यावांचुनि नव्हे समाधान रे ॥ कान्होबा० ॥ २ ॥ आमुची शिदोरी काई । आहे ती तूंच घेई । रमावल्लभदास्य देई । तुझी गोडी लागो हृदयीं रे ॥ कान्होबा० ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ॥

( प्र० २०४ ) ऐसें संवगडियाचें आर्त देखुनी । ठायीं बैसवी त्यांलागुनी । तुह्मी दुश्चित्त व्हाल झणीं ॥ मी निववीन भोजनीं रे ॥ १ ॥ पोरांनो सावध मनीं रहा । माझ्या गोडीनें गोडी पहा ॥ध्रु०॥ शुद्ध सत्वाचा दहीं भात । त्यासि आलेंहि गोडी देत । अनुतापें कांचेरी[2] होत । वैराग्य तळणीं चवी येत रे ॥ पोरांनो० ॥ २ ॥ विवेक वाइंगियाचें भरीत । त्याची अहंरोगवणी जात । मग सेविति त्यांचें हित । त्यांतें मानविती समस्त रे ॥ पोरांनो० ॥ ३ ॥ पूर्ण परिपूर्ण पुऱ्या । त्या प्रेमदुधेंसीं बऱ्या । भाव साखरेवरी घाऱ्या । याही तुह्मी सेवा कोऱ्या रे ॥ पोरांनो० ॥ ४ ॥ शांतिपरिपाकें झालें । तें तूप सैंद्य[3] सेवा भलें । तूप नसे तरी स्नेह माझें दिलहें । येणें सर्वही तुह्मी गिळा रे ॥ पोरांनो० ॥ ५ ॥ सर्व चवीकारणें । असो द्या लवणें । तेवांचुनि गोडपणें । न्यून तें होय पूर्णपणें रे ॥

१ वळण. २ उसरी, चिरून वाळवून ठेवलेलीं वांगीं वगैरेची भाजी. ३ साजूक

॥ पोरांनो० ॥ ६ ॥ ऐसे बहुत परिकार । माझे चवीनें चवी सार । रमावल्लभदासा धीर । किती घास घ्याल थोर थोर रे ॥ ७ ॥

( ओंव्या ) नानापरींचीं पक्वान्नें । षड्रस बहुत अन्नें । गोडी सांगतां अनन्यें । पसरिती पदर इंद्रादिक ॥ ३ ॥ सकळां वाढिलें परिपूर्ण । सकळ ह्मणती ब्रह्मार्पण । संतांसि कळली खूण[1] । घालिती ग्रास कृष्णमुखीं ॥ ४ ॥ [ बोलोनि विनोद ऐसा मग । कवळ देती लगबग । सकळिकांचे हो श्रीरंग । ग्रास अभंग घेतसे ॥ ४ ॥ सर्वांसीही दिसे सन्मुख । कोणासिही नव्हे विन्मुख । काय सांगों अनुभवसुख । विश्वतोमुख सत्य नाम ॥ ५ ॥ ] तंव जेवितां केली टवाळी । कृष्णापुढें होती गुळपोळी । ती उचलोनि पत्रावळी । ( पेंदा ) न राहे जवळी दुरी गेला ॥ ५ ॥ वांकुल्या[3] दावी कृष्णापुढां । नेत्रीं खुणावी-तसे गाढा । वांकुडयातें हाणोनि थोबाडा । धरूनि रोकडा आणिला ॥ ६ ॥ धरिली वांकुडयाची शेंडी । उचिष्ट घाली तया तोंडीं । पेंदा नाचे दुपांडी[4] । थोंगला गडी सांपडला ॥ ७ ॥ सरलें पुढलें पक्वान्न । कृष्णें आणिलें दध्योदन । मग पेंदा ह्मणे आपण । कृष्णासी पैं ॥ ८ ॥ आंबट वडजाची शिदोरी । पेंदा ह्मणे टाका दुरी । कां टाकितां ह्मणोनि रुदन करी । बुझावी श्रीहरि स्वानंदें ॥ ९ ॥ एकासी दावूनि शेखीं । घालि-ती दुसऱ्याचे मुखीं । कां रे लेकांच्या ह्मणोनि तवकीं । डोळे रोखी वांकुडा ॥ १० ॥ ऐसे खेळती सकळ मिळोनि । तंव देव पहाती विमानीं । बंचलों ह्मणती अभिमानीं । कृष्णशेष न मिळेचि ॥ ११ ॥ नोहे श्रीकृष्णाची शेषप्राप्ति । मग एकमेकांसी बोलती । गोपाळ यमुनेतीरा येती । चला शीघ्रगतीं जाऊं तेथें ॥ १२ ॥ विमानें ठेवोनि अंतराळीं ।

---

१ कृष्ण हेंच ब्रह्म ही खूण. २ घांस. ३ वेडावून दाखविणें. ४ दुपायीं. ५ रागानें.

कृष्णशेषालागीं ते वेळीं । देवीं मत्स्यरूपें धरिलीं । यमुनेमाजीं रिघती ॥१३॥ ब्रह्मादिक मत्स्य झाले । हें श्रीकृष्णासी कळलें । जाणोनि गोपाळां बोले । ह्मणे हात धुवूं नका ॥ १४ ॥ सहज उदकाची वांटाळी । अकर्मकार गवळी । हात पुसिले कांबळीं । एक टिरीसी पुसती ॥ १५ ॥ [ शेष न लभे अमरगणा । करिती गोपाळ आरोगणा । यज्ञभोक्ता बाळपणा । धरोनि, आपणा कळों नेदी ॥ ६ ॥ कळों नेदी मग ब्रह्मयानें । वत्सें गोवळीं नेलीं त्यानें । तितुकीं आपण होऊनिशानें । लाघवानें मोहिला ॥ ७ ॥ मोहिला मग उमजविला । आपुले भक्तीसी लाविला । तेणें भक्तिमहिमा स्तविला । काय बोलिला ते काळीं ॥ ८ ॥ ते काळीं ह्मणे भक्तीविण । केवळ बोधें जे प्रवीण । नव्हेति निर्मळ ते निर्वाण । कांडितां शीण तो कोंडा ॥ ९ ॥ कोंडा कांडितां कण अलभ्य । ब्रह्म बोलतां नव्हे लभ्य । यालागीं भजनसौरभ्य । घेती सभ्य भावार्थी ॥ १० ॥ भावार्थी पद-प्रसादलेश । अनुग्रहें पावती विशेष । ते पावती महिमेस । इतरीं वेष मिरवावे ॥ ११ ॥ मिरवावें भक्तिअंतरीं । भलतें होऊनि श्रीहरी । हें सत्य सत्य पैं वैखरीं । प्रमाण वरी काय बोलों ॥ १२ ॥ बोलोनि ब्रह्मा नवल करी । मोठें हो भाग्य ह्मणे उपरी । नंदगोपाळव्रजैक सरी । न पवे बरी कोणीही ॥ १३ ॥ मित्र झाला परमानंद । पूर्ण जगदादिकंद । संचला खेळे स्वच्छंद । नंदा-नंद ह्मणवोनि ॥ १५ ॥ त्याची गोडी चाखिली मनें । श्रीरमावल्लभ-दासजनें । तंव जन नाहीं श्यामघनें ॥ सुख वदनें वदवेना ॥ १५ ॥ ]

(श्लोक) व्रजसम्मृष्टसंसिक्तद्वाराजिरगृहान्तरे ।
चित्रध्वजपताकास्रक्चैलपल्लवतोरणैः ॥ १ ॥
गोपाः परस्परं हृष्टा दधिक्षीरघृतांबुभिः ।
आसिञ्चन्तो विलिंपन्तो नवनीतैश्च चिक्षिपुः ॥ २ ॥

---

१ कंटाळा. (?) २ कर्महीन. ३ कुल्यांस. ४ केवळ ज्ञानानें.

( प्र० २०५ ) दहीं दूध घृत उदक मिश्रित एकत्र करोनी। केशर रंग माजिं सुरंग डेरे भरोनी ॥ १ ॥ आजि तो मंगल काला हो । नंदानंदन झाला हो । आनंद पाहू चला हो । व्रज हा शोभे आला हो ॥ ध्रु० ॥ रजत-हेम चिरक्या[2] हातीं, उदंड घेऊनी । शिंपिति रस, टाकिति लोणी, आरोळ्या देऊनी ॥ आजि तो० ॥ २ ॥ टाळ मृदंग, मोहरि डफ, पांवा वाजविती । आपुलेंनि सुखें, गौळीजन, सुरां लाजविती ॥ आजि० ॥ ॥ ३ ॥ हमामा हुंबारि, घालिति कोणी, वाजविती कांखेंत । भावभरित वांकुल्यांनिं देवां, पावविती खंत ॥ आजि० ॥ ४ ॥ देव ह्मणती, हें ब्रह्मसूख, कैसें तें पावत । गौळियांचें, पुण्य साचें, आह्मांसि भासत ॥ आजि० ॥ ५ ॥ गोरस शिंपणें, खेळति एक नदीसी पावती । कालिंदीसंगमशोभा लोक, जाउनी पाहती ॥ आजि० ॥ ६ ॥ पूर्ण काला, करूनि नदी, यमुना पावती । मंगळस्नान, करूनि मंगल, जीवें भावती ॥ आजि० ॥ ७ ॥ वस्त्रें अलंकार, घेऊनि गौळी-राजे चालती । भाट बंदीजन, वर्णिती नभीं, विमानें हालती ॥ आजि० ॥ ८ ॥ धन्य तो श्रोता धन्य तो वक्ता कृष्णीं लोधला[3] । श्रीरमावल्लभ-दास येणें स्वरूपीं बोधला ॥ आजि तो मंगलकाला हो । नंदा नंदन झाला हो ॥ ११ ॥ श्रीः ॥

( भजन ) गोविंद गोविंद गोपाळ राधा कृष्ण ॥ गोविंद गोविंद०॥

( ओंव्या ) ऐसें खेळत खेळत । वृंदावना गेले समस्त । प्रदक्षिणा करूनि निघत । खोंवी कानी मंजरिया ॥ १६ ॥ तंव इतुक्यांत लोटला माध्यान्ह । अस्तमाना गेला दिन । श्रीकृष्ण ह्मणे वचन । चला जाऊं घराप्रति ॥ १७ ॥ देहुडां[4] उभा

---

१ रुप्या सोन्याच्या; २ पिचकाऱ्या; ३ चिकटला. ४ दीड पायांवर ह्मणजे डावा पाय सरळ ठेवून त्यांपुढें उजव्या पायाचें पाऊल टेंकून उभें राहणें.

राहोनी । गाई खुणाविल्या वेणुध्वनीं । टवकारिल्या चारा विसरुनी । आल्या मुरडोनी त्वरित ॥ १८ ॥ गायी मेळविल्या हरीं । गोपाळ घालिती हुंबरी । डांगा[1] झेलिती अंबरीं । पांवे मोहरी वाजविती ॥ १९ ॥ सुदामा झाला वेत्रधारी । ऐसे गोपाळ गजरीं । चालिले मग झडकरी । पेंदा धरी छत्र तरूचें॥ ॥ २० ॥ वडजा घेऊनी अशोक डाहळी । वारीतसे मुखावरील धुळी । वांकुडा फोडी कौतुकें आरोळी । ग्रामाजवळी पातले॥ २१॥

( प्र० २०६–पद वासुदेवाचें ) पायिं सिद्ध पादुका वासुदेवा । हातीं काठीं साधका वासुदेवा ॥ गात गात नाचत, वेणूनाद वाजत । वासुदेवा हरि वासुदेवा ॥ १ ॥ माथां मोरपिच्छ टोपी गा वासुदेवा । सभोंवतीं गोपि त्या वासुदेवा ॥ कानिं कुंडलाचें तेज, रविशशि[2] लोपे गा । वासुदेवा हरि वासुदेवा ॥ २ ॥ भाळीं केशर निर्मळ वासुदेवा । लाजे डोळियांसि कमळ वासुदेवा ॥ शोभे नासिक सरळ, हिरे दांत ओंठ अमळ । वासुदेवा० ॥ ३ ॥ गळां वैजयंती माळ गा वासुदेवा । बाहिं बाहुवट ढाळ गा वासु० ॥ हृदयिं पदक महा, मुक्तांचा झळाळ गा । वासु० ॥ ४ ॥ कांसे पीतांबर झळकत वासुदेवा । जेविं मेघ विजू तळपत वासु० ॥ नाद मेखळेचा फार गा, चित्तसार आकळत । वासु० ॥ ५ ॥ गाजे ब्रीदावळि पायिं गा वासुदेवा । उभा राहे ठायिं ठायिं गा वासु० ॥ राजा त्रिभंगि[3] सांवळा, लक्ष्य लावितातिं गायी गा । वासुदेवा० ॥ ६ ॥ दृश्य न देखे मी अंध गा वासु० । मुखिं वासुदेव छंद गा वासु० ॥ करिं धरुनि वागवि मज, नंदाचा नंद गा । वासुदेवा० ॥ ७ ॥ संत सनकादिक नाचती वासुदेवा । पहा ब्रह्मानंदें राजती वासु० ॥ श्रीरमावल्लभदास गा, प्रेमें फार माजती । वासुदेवा० ॥ ८ ॥

---

१ काठ्या. २ द्वादशकलात्मक सूर्य बुद्धि षोडशकलात्मक शशि मन. ३ दोंड पायावर.

( ओंव्या ) रामकृष्ण आले ऐकोनि । उतावीळ झाल्या गौळणी । रांगोळ्या नानापरी आंगणीं । घालिताति सप्रेमें ॥ २२ ॥ नवलक्ष आरत्या करीं । घेऊनि उभ्या गोपिका नारी । भावें ओंवाळितां श्रीहरि । लोण उतरी यशोदा ॥ २३ ॥ गाथी निघाल्या गोठणीं । गोपाळ गेले आज्ञा घेऊनि । आपण प्रवेशले निजभुवनीं । स्वस्तिकासनीं बैसले ॥ २४ ॥ *

( प्र० २०७ ) हरि आला हरिख झाला आसन घाली । चरणप्रक्षाळणा गोपी सिद्ध ते झाली ॥ १ ॥ करा करा गे उपचार चंदनादिक । आनंदभरित पहा वृत्ति सकळिक ॥ध्रु०॥ लाहे लाहें सुमनमाळा कोणी करिती । कोणी पुडे कर्पूरीं घोळुनि ठेविती ॥ २ ॥ कोणी निवडिति पानें विडिया तिखट । कोणी केळें नारळे आणिती चोखट ॥ ३ ॥ अक्रोड बदामबीज चारोळ्या पाहीं । दीप द्राक्ष आणि खसखस करंज्या कांहीं ॥ ॥ ४ ॥ गोघृत मिळवूनि करा कर्पूर वाती । मंगळ आरति एकीं भरूनी ठाती ॥ ५ ॥ श्रीमुखकमळ पाहताती सकळ । हांसतां हांसत पाहीजे अकळ ॥ ६ ॥ श्रीरमावल्लभदास स्वामी श्रीहरि । अंतरवोवरा सुखी मंचकावरी ॥ ७ ॥ इति श्रीगोपाळकाला प्रकरण संपूर्णम् ॥ ॥ ॥ ॥ ॥

॥ इति श्रीरमावल्लभदासकृत श्रीकृष्णजयन्तीव्रतकथाभजन संपूर्णम् ॥

## ॥ श्रीरमावल्लभार्पणमस्तु ॥

---

* वरील ओंवीपुढें श्रीएकनाथमहाराजांची पुढील ओंवी आहे–' ऐसा बालक्रीडेचा सोहळा । आनंद जाहला सकळां । एका जनार्दनीं देखिला । श्रीबालक्रीडा संपली ॥ २५ ॥ '

# प्रकरण १३ वें—रासक्रीडा-महोत्सव.

## श्रीकृष्णाची रासक्रीडा.

श्रीकृष्णपरमात्म्याच्या अनंत व अगाध लीलांपैकीं **रासक्रीडा** ही अतिशय महत्वाची व रहस्याची गोष्ट होय. रासक्रीडेविषयीं पुष्कळ शब्दज्ञानकुशळ आधुनिक पंडितांचीं व आर्यधर्मेतरांचीं विरुद्ध मतें, सुदैवानें बंगाल वगैरे प्रांतांतील आंग्लविद्याविभूषित प्रसिद्ध पदवीधरांनीं व इतर सुजाण विद्वद्वर्यांनीं खंडन केलीं आहेत. त्यासंबंधानें येथें विशेष लिहिण्याचें कारण नाहीं. भूतलावर जेव्हां अधर्माची वृद्धि होऊं लागते, तेव्हां ( Action & Reaction ह्म० आघातप्रत्याघाताच्या ) सृष्टि नियमाप्रमाणें त्या ठिकाणीं धर्माचीही प्रवृत्ति होणें इष्ट व साहजिक असतें; आणि ईश्वरी नियमानुसार ती तशी घडून येते, हा अत्यंत प्राचीन कालापासून इतिहासाचा अनुभव आहे. त्या त्या काळचें अधर्माचें प्राबल्य जितक्या जितक्या कमजास्त जोराचें असेल, तितक्या तितक्या कमी जास्त जोराच्या जगन्नियामक शक्ति घेऊन त्या जगन्नायकाला प्रगट व्हावें लागतें. त्याप्रमाणें कंसासुरासारखे व कौरवांसारखे दुष्ट लोक यांच्यामुळें अधर्माचें प्राबल्य जेव्हां जगांत वाढलें, तेव्हां त्या दुष्टांच्या छळानें त्रस्त झालेल्या लोकांची करुणापर प्रार्थना परमेश्वरास पोंचली व तशा भयंकर दुष्टांचा नाश करून धर्माची ( सुखस्वास्थ्याच्या योग्य नियमांची ) स्थापना करण्याकरितां अत्यद्भुत व अचिंत्य शक्तींचा श्रीकृष्णासारखा अद्भुत अवतार प्रगट झाला.

राजाचें आगमन होण्यापूर्वी जसे त्याचे कार्यकारी सेवकजन येऊन त्याच्या कार्याची उपसामग्री तयार करितात व कार्यांत त्याला साह्य करितात, त्याप्रमाणें भगवदवताराच्या वेळीं भगवत्कार्यसाधक लोकही भगवदाज्ञेनें जन्म घेऊन त्याच्या कार्याचें क्षेत्र त्याच्या इच्छेप्रमाणें तयार करून ठेवतात व पुढेंही त्याच्या आज्ञेप्रमाणें कार्यतत्पर असतात. अनंत कार्यांकरितां अनंत शक्ती घेऊनच भगवान अवतार-देह प्रगट करितात व त्या शक्तींचा उपयोग त्या त्या कार्याकडे करितात. भूभार हरण करण्याकरितां ह्म० शिष्टपरिपालनार्थ दुष्टनिग्रह करण्याकरितां भगवंताला शौर्यादि गुणांचा प्रादुर्भाव करावा लागतो, त्याचप्रमाणें प्रेमळ भक्तांचे मनोरथ पूर्ण करण्याकरितां त्याला प्रेमवात्सल्यादि गुण प्रगट करावे लागतात. श्रीकृष्ण हा जसा शौर्याचा व चातुर्याचा निधि तसाच तो विशुद्ध प्रेमाचाही सागर होय, असेंच नव्हे, तर केवळ प्रेमाचा तो पुतळाच होय. आणि श्रीकृष्णाच्या ह्या गुणाच्या अथवा स्वरूपाच्या भोक्त्या त्या भाग्यवान गोपीच होत.

श्रीरामाचें परम सुंदर रूप पाहून ऋषिमंडळीलाही एकदां आपण स्त्रिया होऊन त्या परात्पर सुंदर पुरुषाला भोगावें, अशी इच्छा झाल्यामुळें त्यांच्या प्रार्थनेवरून कृष्णावतारीं ही इच्छा पूर्ण होईल असें भगवंतांनीं सांगितलें होतें, त्याप्रमाणें ते ऋषीच गोपी झाले, असें वामन पुराणांत सांगितलें आहे. दुसरा एक आधार असा सांपडतो कीं, गोपी ह्या वेदांतील श्रुती होत. कल्पभेदानें कथाभेद होतात. भगवच्चरित्रांतील कथा एक ठिकाणीं एक व दुसऱ्या ठिकाणीं निराळ्याच प्रकारच्या आढळल्या, तरी त्यांत शंका घेण्याचें कारण नाहीं. प्रत्येक कल्पांत ते तेच अवतार होतात व त्या त्या वेळीं चरित्रांत थोडा बहुत फरक घडून येतो. कल्प निघून गेले तरी कथा तशाच राहतात. गोपी ह्या वेदांतील श्रुतींच अवतरल्या, ह्यावर एकनाथमहाराजही असें ह्मणतात—

**त्या जाण वेदगर्भींच्या श्रुती । श्रुतिरूपें नव्हे मत्प्राप्ति । तैं परतल्या ह्मणोनी ' नेति नेति ' । माझी सुखसंगति न पवेचि॥६४॥जाणीव नेणीव गेलिया निःशेष । आह्मीं पाविजे निजात्मसुख । श्रुती जाणोनि हें निष्टंक । गोकुळीं त्या देख सुखार्थ आल्या ॥ ६५ ॥ त्याचि जाण समस्त श्रुती । गोपिकारूपें गोकुळा येती । रासक्रीडामिसें एकान्तीं । माझी सुखप्राप्ति पावल्या ॥ ६६ ॥**

—( ए. भा. अ. १२ )

( यांत श्रुती ह्मणजे अक्षरसमुच्चय असा अर्थ घ्यावयाचा नाहीं. तर प्रत्येक मंत्राला निरनिराळी देवता असते, त्याप्रमाणें ह्या श्रुती ह्मणजे श्रुतिमंत्रांच्या देवता होत असें समजावें. ) असो.

आतां समष्टी स्वरूपांत अथवा ब्रह्मांडांत जशी भगवंतानें ही लीला केली, तशी व्यष्टींत अथवा पिंडांतहीं त्याची ती लीला होते हा अनुभव संतसद्गुरुमुखानें साधकाला येतो. रजोगुणात्मक अहंकार व त्याचें सैन्य कामक्रोधादि यांनीं त्रस्त झाल्यामुळें अनुतापयुक्त ( सात्विक ) मनोवृत्ती ह्या इतर **गोपी** होत व शुद्धसात्विक ह्म० श्रवण मनननिदिध्यासानें परिपक्क झालेली जी **' अहं ब्रह्माऽस्मि '** वृत्ति ही **राधा** होय. हीच परमात्म्याच्या अत्यंत प्रीतीला पात्र झाली. खऱ्या साधकास अभ्यासकालीं हा भगवत्स्वरूपाचा ह्म० आत्मानंदाचा किंचित् किंचित् व अभ्यासपरिपक्ककालीं पूर्णपणें अनुभव येतो.

**"...रासक्रीडेचे ठायीं** ( वृत्ति आत्मस्वरूपांत रममाण होते वेळीं )। **बहुसाल भेद उठती पाहीं । संपादितां दुःख नाहीं । द्रष्टेपण घोटोनि ॥ ६ ॥**

—( रमावल्लभदासकृत प्रबोधचंद्रिका—लिखित ११ वें. )

याप्रमाणें अनुभव जे घेतात, त्यांनींच जन्मास येऊन खरें सार्थक करून घेतलें. त्यांनींच आपलें कुल व देश धन्य केला. ‘ **याचि देहीं याचि डोळां। भोगीन मुक्तीचा सोहळा ॥** ’ असा दृढतर निश्चय करून जे साधक साधनाभ्यासाला लागतात तेंच पूर्णब्रह्म श्रीकृष्णपरमात्मकृपेला पात्र होऊन स्वानंदानुभवारूढ होतात. भगवंताच्या रासलीलेवर एकनाथादि संतश्रेष्ठांनीं व गौरंगप्रभु चैतन्यस्वामी वगैरेनीं जो प्रकाश पाडला आहे तो त्यांच्या ग्रंथांतरीं पाहून विषयी, मुमुक्षु व साधक यांनीं कृतार्थ व्हावें अशी त्यांना हात जोडून व लोटांगण घालून प्रार्थना करितों.

# रासक्रीडामहोत्सवविधि.

श्रीकृष्णजन्माष्टमी झाल्यानंतर अवभृतस्नान होण्यापूर्वी कोणत्याही एक दिवशीं रात्रौ अजमासें बारा व चौदा वर्षांच्या दोन मुलांस कृष्णबळरामाचा वेष घालून शृंगार करावा. भ्रूमध्यप्रदेशीं कस्तूरीतिलक लावून आपाद तुळसीमाला घालाव्या. त्याचप्रमाणें इतर मुलांसही गोपाळगड्यांचा वेष देऊन त्यांना कृष्णबलरामासभोंवतीं उभें करावें; व पुढील पदें टिपऱ्यांवर ह्मणून नर्तन करावें. याप्रमाणें सर्व पदें ह्मणून विश्वस्वरूप श्रीकृष्णाची आरति संपल्यावर कृष्णबळरामासहित इतर गोपाळांना खिरापत वांटून रासक्रीडामहोत्सव संपूर्ण करावा. त्या काळीं सर्व मंडळींनीं आपण गोपी व श्रीकृष्ण हा बुद्धिसाक्षी परमात्मा आहे अशी भावना करून **निर्लज्ज होऊनी नाचेन रंगणीं । येऊं नेदीं मना शंका कांहीं ॥** या श्रीतुकाराम महाराजांच्या अमृततुल्य वचनाप्रमाणें निर्लज्जपणें भजन नर्तन करावें. असें केलें असतां **जें सुख भोगितां पाहीं । देही तोचि होय विदेही । तें सुख माझ्या भक्तांच्या ठायीं । प्रकटलें कांहीं लोपेना**—( ए. भा. ). अशा प्रकारचें आपलें चिन्मय आनंदस्वरूप श्रीकृष्णपरमात्मा अंतरांत प्रकट करील, यांत संशय नाहीं. मुख्यतः परमात्मा दूर नसून आपल्या हृदयांतच आहे, त्यास आपल्या एकंदर वृत्ती अर्पण केल्या ह्मणजे वृत्तीच्या तळाशीं असलेलें आपलें सच्चिदानंदस्वरूप तो प्रकट करितो. याकरितां सर्व कल्याणाचें कल्याण व आनंदाचा आनंद असा जो सर्वांतर्यामि व बुद्धिसाक्षि परमात्मा श्रीकृष्ण त्याच्या ठायीं सर्वत्रांनीं गोपिकांप्रमाणें अकृत्रिम प्रेम ठेवून आपलीं सर्व धर्मकर्में व इतर व्यवहार त्याच्या प्रीतीकारणें ह्मणून करावा व त्याच्या परम कृपेस पात्र व्हावें. अशी आबालवृद्ध सन्मित्रसज्जनांना नम्रभावें प्रार्थना करून हें प्रकरण श्रीकृष्णाच्या चरणीं अर्पण करितों.

संतपदाचा दासानुदास,

**सुब्राव गोपाळ उभयकर.**

## रासक्रीडा, ध्यान-भजन-नर्तन-पदें इ०

भजन—राधा कृष्ण जय । राधा कृष्ण जय ॥

हृन्मंदिरिं आह्मि जागूं या, सुरमुनिमनरमणा निरखूं या । बाहिर्मुख–धी–चित्त–उपरमें, कृष्णीं तन्मय होऊं या ॥ १ ॥ मनमोहन हरिगुण गाऊं या, सच्चिदानंद हरि पाहूं या । हातीं टाळ पायीं घुंगुर, थै थै थै थै नाचूं या ॥ ध्रु० ॥ सद्गुरु–सेवा करूं या, अह्मि अंतर्मार्गें जाऊं या । अहं-कंस-बाधामुक्त, याच जन्मीं होऊं या ॥ मनमोहन० ॥ २ ॥ गुरुकडे किल्ली घेऊं या, अह्मि लिंग–किल्ला फोडूं या । चिद्रत्न-हरि-भूषणें अंगीं, लेउनि स्वसुखें विचरूं या ॥ मन० ॥ ३ ॥ त्रिकूट–शिखरीं जाऊं या, अह्मि चिन्मय–कृष्णीं शिरूं या । स्वानंदसागरीं बुचकळी, संतत घेत राहूं या ॥ मन० ॥ ४ ॥ सोऽहं दुर्बिण धरूं या, अह्मि कृष्णतारा लक्षूं या । अंतर्बहिरीं कोंदलेले, कृष्ण–प्रभेमाधिं जडूं या ॥ मन० ॥ ५ ॥ विश्वंभर हरि चिंतूं या, आह्मि विश्वातीत होऊं या । मृगजळ अनादि सान्त अविद्या-मायासरिता तरूं या ॥ मन० ॥ ६ ॥ शांतिवृक्ष वाढवुं या, अह्मि त्यावरि चढून बसूं या । श्रीकृष्ण-दासत्वें जीवन्-मुक्ति फळें-अह्मि खाऊं या ॥ मन० ॥ ७ ॥

( पद २ रें; चाल–‘ पायीं सिद्ध पादुका वासुदेवा० ’ )

विश्वसृष्टिस्थितिलयाधिष्ठान पूर्णब्रह्म, श्रीकृष्णजयन्ती सोहाळा । प्रेमें करुनि कृष्ण–गुणगानरसपानें, आनंद–सागरिं बुडुं वेळोवेळां ॥ १ ॥ या रे सानथोरवृद्धमायबापांनों, श्रीकृष्ण-दर्शना जाऊं या । परिपंथि षड्रिपुसंगें जंगि कुस्ती, धरूनि त्यांचि मस्ति मोडूं या ॥ ध्रु० ॥ शुद्धभावें सद्गुरुसि शरण जाउनी, युद्धा शस्त्रास्त्रें मिळवूं या । विरति-विवेक-ज्ञानास्त्रें षड्वैरि आणि त्यांचें सैन्यही नासूं या ॥ २ ॥ जोडूनि कर विनवितों सर्वांला, हरि राम कृष्ण वासुदेव ह्मणा । कृष्ण-प्रेमरस चित्तिं भरपुर भरुनी,

सर्वांग डोळ्यांनीं पाहुं या कृष्णा ॥ ३ ॥ कृष्ण नामघोषें द्वंद्व सुख-दुःख-मूळ, देहाभिमान-कंद छेदूं या । सर्वांग कान भरुनि कृष्ण-कीर्ति ऐकुनी, गात गात ब्रह्मानंदें नाचूं या ॥४॥ कृष्णा अरे कृष्णा तुझि सुस्वर मुरली, एक वेळ वाजवीं प्रार्थूं या । कृष्ण अधरामृत मुरलिउच्छिष्ट, पिऊनि प्रेमें फार माजूं या ॥५ ॥ कामातुर गोपिका तल्लीन जेविं तेविं, कृष्णीं ठेवूं या चंचल मना । हृदयवृंदावन-क्रीडस्थ श्रीकृष्ण, आलिंगुनि पुरविल मनकामना ॥६॥ दोन दोन वृत्ति-गोपि मध्यस्थ कृष्णसंगें, एकांतिं रासरंग भोगूं या । तनुभान विसरुनि श्रीरंगिं रंगुनी, सर्व वासुदेवमय होऊं या ॥ ७ ॥ विश्वविलास दृश्य अदृश्य लोपतां, ऊर्वरित सच्चित्सुख ब्रह्म आगळें । गोकुळीं कृष्णरूपें अवतार धरुनि, भक्तिसुख दासांसि द्याया नटलें ॥ या रे सान थोर० ॥ ८ ॥ ॥

(पद ३ रें—वेणू.)

हृदयवृंदावनवासी रे, तो मुरली वाजवि खासी रे । वृत्ति-गोपिका भुलूनि गेल्या, त्या मोहक नादासी रे ॥ १ ॥ धन्य धन्य ती मुरली रे, हरिप्रेमरसें ओतली रे । जड परि कृष्णें ओंठीं धरितां, चित्सुखदाती झाली रे ॥ ध्रु० ॥ वेणु हरिनें वाजविला रे, पदिं ब्रह्मरस पाझरला रे । इंद्रियगायी रस चाटुनि श्री-हरिपादिं भिनूनि गेल्या रे ॥ धन्य०॥ २॥ षड्ज आदि स्वर-सप्तक रे । ते गोपी-चित्त-वेधक रे । देह गेहं विसरवुनी केलें, त्यां कृष्णा सन्मूख रे ॥ धन्य० ॥ ३ ॥ स्वर ते सप्तभूमिका रे, त्या लंघिति वृत्ति-गोपिका रे । नादब्रह्म-मुरलीरव-लक्ष्यें, त्या हृषिकेशात्मका रे ॥ ४ ॥ समस्त गोपिसभोंवत रे, मधिं मुरलीधर कृष्ण नाचत रे । देहुंडाचरणीं

---

१ घर. २ इंद्रियनियामक हरिमय. ३ ' देहुडा चरण ' ह्मणजे श्रीकृष्ण दीड पायावर उभा आहे. ही कृष्णाची आकृति ॐ काराची दर्शक आहे. ' त्रिपादूर्ध्व० ' ह्या श्रुतीचा अर्थ या दीडपायाच्या आकृतींत ( अकार, उकार, मकार ) आहे. चतुर्थपाद ह्मणजे वर असलेली टांच ही तूर्यावस्था आहे.

लक्ष्य जडतां, सर्वहि समाधिस्थ रे ॥ धन्य० ॥ ५ ॥ वेणुस्रुत अधरामृत रे, तत्पानें प्रेमोन्मत्त रे । वेणुगताष्टम रंध्रद्वारें, दास कृष्ण हृदयांत रे ॥ धन्य०॥ ६ ॥

( पद ४–कृष्णप्राप्ति; चाल–रंगीं नाचे क्षेत्रपाळ । रंगीं० )

कृष्ण आला आतां पाहुं चला । कृष्ण० । वृत्ती-गोपि बहुत हर्षल्या । वृत्ती० । त्यांच्या संगें तो नाचुं लागला । त्यांच्या०। रासक्रीडा ब्रह्मरस, पूर्वपुण्यपक्व नवस ॥ रास० ॥ ध्रु० ॥ हृदयीं प्रेमपूर दाटला । हृदयीं० । गोपी अहंभाव विसरल्या । गोपी० । श्रीरंगरंगीं गुंगल्या । श्रीरंग० । चित्तहरण हरी निरखुनी, स्वात्मानंद कृष्ण भोगुनी ॥ चित्त० ॥ १ ॥ कृष्णें संमोह-भुलि घातली । कृष्णें० । इंद्रियें बहिर्गती विसरलीं । इंद्रियें० । चित्तवृत्युपरम पावली । चित्त०। आनंदाचाचि कल्लोळ, विश्वंभर कृष्ण खेळ ॥ आनंदा० ॥ २ ॥ स्वानंदरस मज पाजविला । स्वानंद० । तापत्रयांचा उपशम झाला । ताप० । झालों उपाधि मी वेगळा । झालों० । दर्शनें कृष्ण हृषीकेश, अनंत कोटि ब्रह्मांडेश ॥ दर्शनें० ॥ ३ ॥ आनंदें कोंदाटलें त्रिभुवन । आनंदें० । खंडलें अनादि जनिमृति-भ्रमण । खंडलें०।आटलें संचित-क्रीयमाण । आटलें०। चिंतनें अनादि अनंत, वासूदेव जगन्नाथ ॥ चिंतनें० ॥ ४ ॥ म्यां दृढ धरिलें अभय हरिपद । म्यां० । निमला निःशब्दिं विषय नाद । निमला० । मज नसे प्रारब्धत्रय-बाध । मज० । वेणूनाद कृष्ण ध्यातां, गानलोल कृष्ण गातां ॥ वेणु० ॥ ५ ॥ वांयां इथें तिथें धुंडुं नका । वांयां०। बरि ही संधी दवडूं नका । बरि ही०। नाहिं तरि जन्म जाइल फुका । नाहिं० । अलक्ष्यलक्ष्यें स्थिर राहा, अंतरिं साक्षि हरीला पहा ॥ अलक्ष्य० ॥ ६ ॥ कृष्ण अखिल विश्वसोयरा । कृष्ण० । एका भावें भजुनि वश करा । एका० । अंतरिं राहिल तो सुस्थिरा । अंतरिं० । सर्व हृदयाशय ईश, व्यापक चराचरा महेश ॥ सर्व० ॥ ७ ॥ गोड

सगुणागुणरुप कृष्ण । गोड० । गोड नामसंकीर्तन-श्रवण । गोड० । श्रोता वक्ता स्वयें श्रीकृष्ण । श्रोता० । कृष्ण साखरेचा ऊंस, दास कृष्ण गोडरस । कृष्ण० ॥ कृष्ण आला० ॥ ८ ॥

( पद ५-श्रीकृष्णाची आरति. )

जय देव जय देव जय कृष्णनाथा । आरति प्रेमें करितों तुजला अनंता ॥ ध्रु० ॥ सोळा सहस्र गोपी आरति कौतूक । पाहावया उभ्या राहिल्या देख ॥ जेथल्या तेथें त्या जाहल्या थक्क । नवलावो वर्णाया पामर अशक्य ॥ जय देव० ॥ १ ॥ आरति-प्रभा सर्व विश्वीं पसरली । जीवाशिव भावना समूळ हरपली ॥ पवन-नयन-मन-गति ती खुंटली । चित्सुख कृष्णमूर्ति दृष्टीसी जडली ॥ जय देव० ॥ २ ॥ ध्येय ध्याता आणि कैंचें तें ध्यान । साध्य साधक आणि कैंचें साधन ॥ दास्यादि त्रिपुटीचें नाहींच भान । असतां हृदयीं चिन्मय आनन्द कृष्ण ॥ ३ ॥

प्रार्थना ।

( श्लोक ) सकळहि वृत्ति-गोपी श्रीहरि-स्तोत्र गाती ॥
हृदयभुवनिं आतां राहिं आनंदमूर्ति ॥ परिसुनि वच त्यांचें
हांसिला गोपिनाथ । निजसुख-उदधीं त्या मीनल्या हर्षयुक्त ॥ १ ॥
नमोऽस्तु ते महायोगिन् प्रपन्नमनुशाधि माम् ॥
यथा त्वच्चरणांभोजे रतिः स्यादनपायिनी ॥ २ ॥

## सार्वजनिक कल्याण प्रार्थना.

( सर्वत्रांनीं उभें राहून भक्तिभावोंन नित्य करणेची. )

काले वर्षतु पर्जन्यः पृथिवी सस्यशालिनी । देशोऽयं क्षोभरहितो ब्राह्मणाः सन्तु निर्भयाः ॥ १ ॥ अपुत्राः पुत्रिणः सन्तु पुत्रिणः सन्तु पौत्रिणः । अधनाः सधनाः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः ॥ २ ॥ सर्वेऽपि सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः । सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद्दुःखमाप्नुयात् ॥ ३ ॥ माकश्चिद्दुःखमाप्नुयात् । माकश्चिद्दुःखमाप्नुयात् ॥ ३ ॥

( गद्य ) सर्व जीवांच्या अपराधांची पातकांची क्षमा करा, रोगराईचा

नाश करा; अधर्मबुद्धीचा नाश करा; सर्वांच्या अंतःकरणांत धर्मबुद्धीची प्रेरणा करून सर्वांचें कल्याण करा; सर्वत्रांचे शुभ मनोरथ पूर्ण करा; सर्वांना सद्भक्ति देऊन योग्यप्रकारें सेवा करून घेऊन कल्याण करा; वंशोवंशीं योग्यप्रकारें सेवा करून घेऊन कल्याण करा; कल्याण करा; कल्याण करा; आनंद करा.

(भजन) गोपाल कृष्ण गोपाल । गोपाल कृष्ण गोपाल ॥

(गजर) राधाकान्तस्मरण जय गोपाळ ॥ इत्यादि ॥ पुंडलीक वरदा० । पार्वतीपते० । सीताकान्तस्मरण० । श्रीगुरुदेव दत्त ॥ हरये नमः ॥ ३ ॥

॥ इति रासक्रीडा प्रकरणं संपूर्ण ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

## विनवणी.

पतितपावना दीनदयाळा श्रीरामकृष्णा । त्यजूं नको तूं मजला आतां शरणागतभरणा ॥ ध्रु० ॥ तूं निराळा गुरू निराळा जरि मी मनिं भावेन । कुंभिपाकतामिस्रादी ते नरक लोक पावेन ॥ १ ॥ सर्वापराध क्षमा करीं बा भक्तकैवारी । भक्ती-अंजन डोळां घालुनी भवतम नीवारीं ॥ २ ॥ भवाज्ञानहर ऐसी कीर्ती सदा श्रुति गर्जे । शरणागत दीनाला तूं तारीं पादरजें ॥ ३ ॥ नको दावूं आतां मजकडे बाह्य वैरभाव । मायासोंग लपवुनि दाखविं अंतरिंचा ठाव ॥ ४ ॥ जिवशिवजगभेदत्रय निरसे दे ऐसी दृष्टी । यास्तव सर्वावस्थेमध्यें राहिन संतुष्टी ॥ ५ ॥ या रसनेला तव नामाची गोडि सदा घडो । गोडि चाखितां विषय-रतीला तिळांजुली पडो ॥ ६ ॥ पुत्र मित्र कळत्र अवघे स्वार्थाचे लोक । तूं सर्वांचा खरा सोयरा अंतींचा एक ॥ ७ ॥ दो दिवसांची जडतनु नश्वर स्मरण सदा राहो । अखंड अनुसंधान मिठाई मेवा मज लाहो ॥ ८ ॥ मेवा-भक्षण अधीकार बळ या दासा नसे । गुरुकृपेनें तेंही येईल आपेंआपैसें ॥ ९ ॥ देहाहंकृति जगत्सत्यमति स्वप्नींही नसो । अचिंत्य अनिर्वाच्य स्वप्नवत् जगदेह दीसो ॥ १० ॥ वत्सा गाय बाळा माय मजला

तूं आई । विनवणि करितों मस्तक ठेवुनि तव सुहृदा पायीं ॥ ११ ॥ मजमाजीं तूंची गा आणी तुजमाजीं मीची । अखंड चिंतन राहो सदा, विनती दासाची ॥१२॥ सर्वांभूतीं परमात्मा तूं आनंदघन । सिद्धारूढकृपेची कृष्ण-दासाला खूण ॥ १३ ॥

## प्रेमाचा पाळणा.

( चाल-जो जो जो जो रे श्रीरामा । निजसुखगुण विश्रामा. )

हृदयवृंदावन पाळण्या- । माजीं निज तूं कृष्णा ॥ १ ॥ कृष्णा जो जो रे ॥ ध्रु० ॥ चित्तचतुष्टय अंथरुणा- । वरी लोळ कृष्णा ॥ कृष्णा० ॥२॥ भक्ती-तंतूचा मृदु शेला । पांघरवीतों तुजला ॥ कृष्णा० ३ ॥ प्रेमदोरें मी पाळणा । हालवीतों कृष्णा ॥ कृष्णा० ४ ॥ जो जो जो जो रे श्रीहरी । उन्मनि निद्रा करी ॥ कृष्णा० ५ ॥ झोंपि गेले विदेहादि रूप । पहातां तूझें रूप ॥ कृष्णा० ॥ ६ ॥ तुझ्या नामाचें महिमान । भक्त चित्सुखघन ॥ कृष्णा० ७ ॥ कृष्णा निज परि तूं हांकेसी । सावध हो हृषिकेशी ॥ ८ ॥ गातां आवडिनें पाळणा । हंसूं आलें कृष्णा ॥ कृष्णा० ॥ ९ ॥ दासें घेतलें चुंबन । तोषें निजला कृष्ण ॥ कृष्णा० ॥ १० ॥ ॥ ॥

॥ ॐ तत्सत् श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

## देवाचें व भक्ताचें करारपत्र.

( राग जोगी, आदिताल. )

मजला तुझि आण, कृष्णा, तुज माझी आण । मज तुज दोघांलाही कृष्णा, संतांची आण ॥ ध्रु० ॥ दुर्जन संगति म्यां धरिली तरी, मजला तुझि आण । सज्जन-संगति न धरविसी तरी, तुज माझी आण ॥ मजला तुझि आण० ॥ १ ॥ देहें कुकर्म मी केलें तरी, मजला तुझि आण । अक्रियत्व न बाणविसीं तरी, तुज माझी आण ॥ मजला० ॥ २ ॥ अशास्त्र वचन मी वदलों तरी, मजला तुझि आण । मुखें कथामृत न स्रवविसि तरी, तुज माझी आण ॥ मजला० ॥ ३ ॥ बाह्य दुःखद भोगिं रमे तरी, मजला तुझि आण ॥ अंतर्मुख मज न करिसी तरी, तुज माझी आण ॥ मजला० ॥ ४ ॥ विषयांधतम मी झालों तरी, मजला तुझि आण । निर्विषयी मज न करिसी तरी, तुज माझी आण ॥ मजला० ॥ ५ ॥ अहंममतादात्म्य धरी जरी, मजला तुझि आण । सोऽहं वृत्ति न स्फुर-

विसि तरी, तुज माझी आण ॥ मजला० ॥ ६ ॥ सर्वीं कृष्ण मी न पाहे तरी, मजला तुझि आण । सत्ता स्फूर्ति न खलविसी तरी, तुज माझी आण ॥ मजला० ॥ ७ ॥ सर्व अटी हृत्पात्रिं कोरितां, कतबा संपूर्ण । संतमुद्रा पडतां कृष्ण,-दासा स्वसुखसण ॥ मजला तुझि आण० ॥ ८ ॥

# मुद्गल-उपदेश.

## ( अथवा ब्रह्माभ्यास| निरूपण. )

( ओंव्या ) ॐनमो सद्गुरु श्रीमुकुंदा । सहजसिद्ध सच्चिदानंदा । कैवल्यमूर्ति विश्वकंदा । शुद्धबुद्धा परमेश्वरा ॥ १ ॥ तुझा अनुग्रहो झालिया । भेट दे आपें आपुलिया । कीं स्वयंप्राप्ति घडे तया । होये सुखस्वानंद ॥ २ ॥ फिटे दृष्टीचें पटल । आत्मप्रकाशें निर्मळ । स्वयंज्योतिपूर्ण निश्चळ । निजनिश्चळ परब्रह्म ॥ ३ ॥ भ्रम फिटे स्वरूप भेटे । संकल्प तुटे विकल्प खुंटे । मोह आटे विषय विटे । निजवृत्ति सांठे चैतन्यें ॥ ४ ॥ ऐका ऐका एक चित्तीं । येणें पाविजेल गति । पुनः न येणें जन्मान्तीं । ईश्वरातें पावोनि ॥ ५ ॥ जेणें होय जीवाचें हित । तेंचि सांगें सुनिश्चित । जे ऐकती दत्तचित्त । ते जीवीं प्राप्त जाणावे ॥ ६ ॥ ज्यासी होय मोक्षपद । जो सायुज्यतेचा आनंद । तें सुख बोलतां शब्द निःशब्द । हा अनुभव सिद्ध ज्ञानियां ॥ ७ ॥ गति पाहिजे जयासी । तेणें भजावें संतांसी । भक्तिपुरःसर प्रीतींसीं । साष्टांगेंसीं नमिजेल ॥ ८ ॥ सेवा कीजे नानापरि । साच मनोभाव अंतरीं । माया कपट सांडोनि दुरी । मनीं धरीं विश्वास ॥ ९ ॥ साधुसंगेंवीण । कवण उद्धरला जाण । तरावया हेंचि कारण । जेथें आन संशय नाहीं ॥ १० ॥ वेदशास्त्र विचारोनी पाहतां । सत्संग आगळा हीचि वार्ता । ऐकती जे तयामुखीं अध्यात्मकथा । सर्व चिंता सांडोनि ॥ ११ ॥ नित्यानित्य विचार । सांगतां फिटे अंधकार । होय स्वरूपनिर्धार । साक्षात्कार रोकडा ॥ १२ ॥ चाखविती ब्रह्मसुख । हरे तापत्रय दुःख । तेथें कैंचा उरे शोक । माया निःशंक मावळली ॥ १३ ॥ आतां साधु ते कवण । तयां सकळ समान । नाहीं देहाभिमान । ब्रह्म समाधान निरंतर ॥ १४ ॥ जो मनुष्यवेषीं ईश्वर । नोळखती अज्ञान पामर । जे विषयलंपट नर । तयां आदर देहा-

वरी ॥ १५ ॥ ते देहीं भजती साधुसंता । आवर नाहीं निंदा करितां । नरकीं पडती ते सर्वथा । यम-जांचणी होईल ॥ १६ ॥ निंदे एवढें पातक । नाहीं विचारितां अनेक । याहीवरी साधुनिंदा देख । नाहीं सुटका कल्पांतीं ॥ १७ ॥ जयासी चाड आली मोक्षाची । तेणें सेवा कीजे संतांचीं । आवडी सत्कर्माची । जो मोक्षाची परिनाळिका ॥ १८ ॥ स्नानसंध्यादिक कर्म । जो नित्य नैमित्तिक धर्म । आचरिजे निःसीम । सर्व काम्य त्यजूनि ॥ १९ ॥ वर्णाश्रम धर्म जितुलें । जें जें शास्त्र आहे बोलिलें । मनस्तप सांगे तितुलें । साधन मिळे चित्तशुद्धी ॥ २० ॥ चित्तशुद्धीद्वारा ज्ञान । याही बोला नाहीं आन । ज्ञानाज्ञान भेद जाण । ज्ञेय आत्मा आपणाचि ॥ २१ ॥ अनेक जन्मीं ईश्वर भजतां । हळूहळू पुण्य वाढतां । मग भेटे सद्गुरुदाता । जो तारिता भवसागरू ॥ ॥ २२ ॥ अमूर्त मूर्तिमंत सिद्ध । जो केवळ ब्रह्मानंदबोध । तयाच्या वचनीं भवच्छेद । निरसे भेद द्वैतबुद्धि ॥ २३ ॥ कृपादृष्टीं पाहे जया । पडे मिठी ब्रह्मीं तया । माया अविद्या जाते लया । होय सुख स्वानंदु ॥ २४ ॥ महावाक्यें तत्वमसि । हेंचि बीज उपदेशी । तत्त्वं पदार्थ गुह्य प्रकाशी । बोध मनासी उपजवी ॥ २५ ॥ ( गद्य चारी पांच घटिका रात्र उरली । तेव्हां उठोनि ' ब्रह्माहमस्मि ' [illegible] उगीच बैसावें । कांहींच नाठवावें । आठव त्यातीत आपण होवावें । अथवा पीतांबरधारी एकुचि जाणावें । विश्वाकारी एक धरावें । सर्व कर्म निरसावें । मग त्या अष्टमहा सिद्धि दासी होती । अष्ट सिद्धि ह्मणसी तरी कोण ते ऐका । प्रथम ' अणिमा ', दुसरी ' लघिमा ', तिसरी ' महिमा ', चौथी ' प्राप्तिइंद्रियें ', पांचवी दुरादूरसें ' प्रकाशी ', सहावी ' शक्तिप्रेरण ' । ' सर्वकामी ' सातवी, ' सर्ववशी ' आठवी । मग त्या अष्टमहासिद्धी आत्मसुखापुढें मृगजळ ह्मणोनि स्मरावें । आळस साधकें न करावें । विचारें साक्षात्कार घडे । हेच देहीं हेंच पावावें । हें अनुष्ठान नित्य करावें । वेदाचें शास्त्राचें पुराणाचें अंतर सद्गुरूनें प्रगट करूनि सांगितलें । यालागीं सदा आठवावें । पूर्ण प्राप्तीसी पावावें । जनकविदेही या समान सुख भोगावें । सिद्धियां धांवणें शिवणें, आध शिवणें मग पावणें नव्हे नव्हे मुक्त । सदा पावूं नेदी सिद्धी पद-सिद्ध-स्वानंदा । श्रीरमावल्लभदास ह्मणे, घे घे रे गुप्त सदा ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

ॐनमो भगवते वासुदेवाय ।